# दलित साहित्य
## – एक अभ्यास

११२
२

संपादक – अर्जुन डांगळे

साहित्य आणि संस्कृति मंडळ
महाराष्ट्र राज्य



# दलित साहित्य : एक अभ्यास

संपादक

अर्जुन डांगळे




महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति
मंडळ, मुंबई

—राहुल सांकृत्यायन यांना आदरपूर्वक

# निवेदन

समाज हा नेहमी गतीशील असतो. जडत्व हे त्याला कधीही मान्य नसते. अनेक विचारांनी, आचारांनी, घटनांनी तो प्रभावित होत असतो. समाजजीवनाच्या अनेक पातळयावर, व्यवहारांवर हया घटनांचा परिणाम होणे अपरिहार्य असते. माणूस हा समाजशील प्राणी आहे. साहित्य हे देखिल माणसांच्या समाजव्यवहाराचे एक अंग होय. आणि म्हणूनच समाजातील गतिशीलतेचा परिणाम साहित्यावर होणे अटळ असते. हया परिणामातून निरनिराळया साहित्यविषयक जाणिवा, प्रवाह साकार होत असताना दिसतात. हया गतीशीलतेची एक अपरिहार्य परिणती म्हणजे आजचे दलित साहित्य होय.

**'दलित साहित्य–एक अभ्यास'** हे माझे संकलित पुस्तक वाचकांसमोर ठेवताना मला आनंद होत आहे. दलितांच्या चळवळीतला एक कार्यकर्ता व दलित साहित्यिक या नात्याने मला नेहमी असे वाटत होते की, दलित साहित्याची भूमिका ही वेळोवेळी निरनिराळया नियतकालिकांतून मांडण्यात येते, तिच्यावर उलटसुलट चर्चाही होत असते. परंतु सगळेच लेख सर्वांकडून वाचलेच जातात असे नाही. परिणामी तीच चर्चा, तेच आरोप, तेच स्पष्टीकरण असा घोळ पाहावयाला मिळतो. हया पुस्तकाच्या रूपाने दलित साहित्याची भूमिका स्पष्ट होण्यास बरीचशी मदत होईल. अर्थात् याच्यातूनही काही प्रश्न उद्‌भवणार नाहीत असे नाही. परंतु जे प्रश्न उद्‌भवतील ते विधायकतेकडे नेणारे असतील. त्याच आवर्तात गुरफटणारे नसतील. हया पुस्तकामुळे दलित साहित्यविषयक विचारांना निश्चित गती मिळेल असा मला विश्वास आहे.

या पुस्तकाच्या निमित्ताने मी काही मुद्याना स्पर्श केला तर ती वावगी बाब ठरणार नाही तर ती आवश्यक अशीच गोष्ट ठरेल.

दलित साहित्य चळवळीचे उगमस्थान शोधण्याचा प्रयत्न अनेकांकडून विशेषतः दलित समाजातील विचारवंताकडून होत असतो. काहीजण तो उगम

बुद्धकालात शोधतात. काहीजण चोखामेळ्यापर्यंत जातात. काही क्रान्तीवीर फुल्यांपर्यंत पोहचतात. अलिकडे तर किसन फागोजी बनसोड नावाचा दलित कवी हाच दलित साहित्याचा जनक असे सूर दिसतात, तर काही श्री. म. माटयामध्ये उगमस्थान शोधण्याचा प्रयत्न करतात. या त्यांच्या विधानाच्या समर्थनासाठी ते अशी बाजू मांडतात की, जरी त्या वेळी दलित साहित्य हा शब्द वापरात नसला, तरी त्या त्या काळी त्यांनी दलितांविषयी, पिळल्या जाणाऱ्याविषयी, अन्यायाविरुद्ध आपल्या लेखणीद्वारे वाचा फोडली आहे. म्हणून ते खरेखुरे दलित साहित्यिक व त्याचे जनक होत. वास्तविक जे लोक हे विधान करतात त्यांनी त्यांची तार्किकता फारच ताणल्यासारखी वाटते. क्रांतीवीर फुले काय किंवा गौतमबुद्ध काय यांनी निश्चितच विषमसमाज-व्यवस्थेविरुद्ध बंडाचे निशाण रोवले. तिच्यावर हल्ले चढवून 'बहुजन हिताय् बहुजन सुखाय्' असा नारा लावला. त्यांची शिकवण त्यांचे आदर्श हे सतत प्रेरणादायक ठरतील याबद्दल शंका नाही. परंतु ऐतिहासिक दृष्टीने व वस्तु-निष्ठपणे विचार केल्यास असे दिसून येईल की, दलित साहित्याचे बीज किंवा उगमस्थान डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे विचार, त्यांची जीवन दृष्टी, त्या अनुषंगाने त्यांनी केलेल्या चळवळी, नवे विचार आणि विज्ञानयुग या सर्वात आपल्याला सापडते. म्हणजेच दलित साहित्याचे उगमस्थान शोधायचे असेल; किंवा जनकत्व द्यायचे असेल तर ते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांतच शोधावे लागेल किंवा द्यावे लगेल.

आजपर्यंतचा मराठी वाङमयाचा इतिहास पाहिला तर असे दिसून येईल की मराठीत जे जे नवीन वाङमयीन प्रवाह किंवा साहित्यविषयक जाणिवा आल्या त्याचे जनकत्व हे एखाद्या ललित साहित्यिकांकडे दिले गेले आहे. बाबासाहेबांनी त्या अर्थाने ललित लेखन केलेले नाही. किंबहुना त्यांनी जे वैचारिक ग्रंथ लिहिले आहेत ते सगळेच इंग्रजीमध्ये आहेत. 'मूकनायक', बहिष्कृत भारत', 'जनता', इत्यादी त्यांनी चालविलेल्या नियतकालिकां-तून त्यांनी मराठी लेखन केले आहे आणि त्याचे स्वरूप देखिल वैचारिक असेच आहे. सामाजिक क्रांती करू पाहणाऱ्या एका बंडखोराकडे दलित साहित्याचे जनकत्व जावे हाच दलित साहित्याचा लक्षणिय विशेष आहे. आणि ह्याच विशेषातून दलित साहित्याच्या वैचारिकतेचे अनेक पैलू स्पष्ट होत जातात. सामाजिकता आणि विषमतेविरुद्ध बंड उभारून एका नव्या जगाची निर्मिती हे दलित साहित्याचे मुख्य पैलू आहेत. त्या अनुषंगाने

येणारा नकार, विद्रोह आणि विज्ञाननिष्ठा हे देखिल तितकेच महत्वाचे आहेत. आणि म्हणूनच दलित साहित्याचा अभ्यास करतांना निव्वळ वाङ्मयीन किंवा विद्यापिठिय भूमिकेतून त्याचा अभ्यास करू लागल्यास त्या साहित्याकडे बघण्यास जी स्वच्छ दृष्टी लागते तीच गमावून बसल्यासारखे होईल. म्हणजेच दलित साहित्याचे मूल्यमापन करतांना समाजशास्त्रीय बैठक हवी. आजपर्यंतची मराठी साहित्य मूल्यमापनाची पद्धती पाहिली की हा अभाव विशेषत्वाने जाणवतो.

जर बाबासाहेब आंबेडकर हे दलित साहित्याचे जनक आहेत तर मग दलित साहित्याची चळवळ गेल्या तपासच का फोकावली हा प्रश्न साहजिकच उपस्थित होण्यासारखा आहे. याची कारणे अनेक आहेत. बाबासाहेब येईपर्यंत ह्या समाजाची नाळ शिक्षणापासून, ज्ञानापासून तोडण्यात आली होती. पाया-खाली जमीन आणि डोक्यावर छप्पर नव्हते. शहरात ते मोलमजूरी करून झोपडपट्टयात किंवा अंधाऱ्या चाळीत राहत होते. तर खेडेगावात ते सालकर किंवा येसकर म्हणून गावाबाहेर राहत होते. शिक्षणाचा अभाव, ज्ञानाचा अभाव, उत्पादन साधनांचा अभाव यापासून झालेले त्यांचे अभावपूर्ण जीवन लाचारीने वेढलेले होते. बाबासाहेब आले आणि त्यांनी हांक देऊन त्यांच्यातला माणूस जागा केला. हा दलित माणूस आपल्या सर्व सामर्थ्यानिशी आणि साहित्यानिशी या चळवळीत सामील झाला. त्यांना नुकतेच कुठे जागे केले गेले होते. माणुसकीचे जिणे ज्याना माहित नव्हते, त्यांना त्या काळात साहित्य-विषयक जाणिवा कशा काय येणार? किंबहुना तशी अपेक्षा करणे देखिल चुकीचे आहे. अर्थात् चळवळीच्या अनुषंगाने दलित कलावंतानी गाणी लिहिली, पोवाडे लिहिले, तमाशा-जलसा या आपल्या पारंपारिक वारसा असलेल्या लोककलेद्वारे त्यांनी चळवळीला साथ दिली. बाबासाहेबांच्या तत्वज्ञानाचा प्रथम वाङमयीन आविष्कार असा झाला. परंतु त्यातील प्रचारमूल्यांच्या प्रभावामुळे ते फार काल टिकू शकले नाही.

बाबासाहेबांच्या चळवळीच्या अनुषंगाने तिच्या प्रचारार्थ जसे साहित्य निर्माण झाले. त्याचप्रमाणे बाबासाहेबांची चळवळ सुरू होण्याअगोदर म्हणजे १९२० च्या आगे-मागे दलित समाजातील काही मंडळी आपल्या लेखणीद्वारे त्या वेळच्या सरकारला अस्पृश्य समाजाच्या दारुण अवस्थेची जाणिव करून देत होती. हिंदु धर्मातील दुष्ट चालिरितीवर, मनुस्मृतीवर ते आपल्या लेखणी-

द्वारे हल्ला चढवित होते. गोपाळ बाबा वलंगकर, पंडित कोंडीराम व किसन फागो बनसोडही त्यातली काही प्रमुख नावे. गोपाळ बाबा वलंगकर हे सैन्यात होते. इंग्रजीवर त्यांचे प्रभुत्व होते. अस्पृश्य जातीच्या तरुणांची जेव्हा सैन्यात भरती बंद केली त्यावेळी गोपाळ बाबांनी याविरुद्ध सह्यांची मोहिम सुरू केली व जनमत जागृत केले. बाबासाहेबांनी १९३५ साली येवले मुक्कामी जी धर्मांतराची घोषणा केली तिला जरी विरोध किसन फागो बनसोड यांनी केला असला तरी बनसोडची कविता ही हिंदुधर्मावर जोराचा प्रहार करणारी होती. अशा प्रकारे बाबासाहेबांच्या अगोदर छोटचाशा प्रमाणात का होईना साहित्य निर्माण केले जात होते.

बाबासाहेब हे विधायक दृष्टी असलेले कृतीप्रवण असे राजकारणी व समाजशास्त्रज्ञ होते. ज्ञान-विज्ञानापासून जे फायदे मिळतात, जी नवी दृष्टी मिळते ती दलित समाजाला लाभावी अशी त्यांची धारणा होती. आणि म्हणूनच त्यांनी मुंबईत १९४६ च्या सुमारास पीपल्स एज्युकेशन सोसायटीची स्थापना केली आणि तिच्या मार्फत 'सिद्धार्थ कॉलेज' सुरू केले. चळवळीच्या जोर वाढत होता. 'युनाईट, एज्युकेट अॅन्ड एजीटेट' हा बाबासाहेबांचा संदेश मूळ धरत होता. राजकीय, सामाजिक पातळीवर अनेक लढे लढविले जात होते. अन् याच वेळी सिद्धार्थ कॉलेजमधून तरुणांची एक पदवीधर पिढी बाहेर पडली. घनःशाम तळवटकर आदी तरुणांनी १९५० साली सिद्धार्थ साहित्य संघ ही सुशिक्षितांची वाङ्मयीन संस्था स्थापन केली. संस्थेच्या नावातले वेगळपण सोडले तर वाङ्मयनिर्मितीवर त्यावेळच्या पांढरपेशी वाङ्मयीन मूल्यांचा जबरदस्त प्रभाव आढळतो. पुढे यातूनच 'महाराष्ट्र दलित साहित्य संघ' या संस्थेची स्थापना करण्यात आली. आपले जीवन वेगळे, आपले प्रश्न वेगळे ही त्यावेळी त्यांच्यात भावना होतीच. पण आपले जीवन, आपले प्रश्न साहित्यरूप होऊ शकते काय? आपले लिखाण प्रस्थापितांच्या मूल्यांत बसेल काय? त्याला मान्यता मिळेल काय? इत्यादी प्रश्न त्यांच्या समोर होते.

ह्या काळातली वाङ्मयनिर्मिती ही मुख्यतः 'जनता', 'प्रबुद्ध भारत' या रिपब्लिकन पक्षाच्या मुखपत्रातून (पूर्वीचा 'शेडयूल्ड कास्ट फेडरेशन') आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंतीनिमित्त निघणाऱ्या दलितांच्या वार्षिकांतून झाली. त्या निर्मितीचे स्वरूप पाहिले म्हणजे आपला अनुभव किंवा

कथावस्तु जरी तिच्यात सामाजिक प्रश्न असला तरी ती फडके, खांडेकर यांच्या साच्यात कशी बसवता येईल हे कटाक्षाने पाळले जाऊ लागले. खांडेकर, फडके युगापासून त्या वेळचे दलितांचे साहित्य देखिल अलग राहू शकले नाही. काहींनी तर स्वतःचे 'ब्राह्मणीकरण' करून घेतले होते. आपण त्यांच्यासारखे बोलावे, लिहावे, वागावे अशी त्यांची इच्छा होती. त्याना आपला भूतकाळ नकोसा होता. समोरच्या उभ्या वास्तवाला टक्कर देण्याची देखिल त्यांच्यात हिंमत नव्हती. मनात खळबळ असेल किंवा नसेलही त्या वेळची दलित कथा-कविता तथाकथित 'सांस्कृतिक मूल्याना' बळी पडली. खरं म्हणजे त्यानाही तितका दोष देणे योग्य नाही. कारण त्यांची ही मानसिक अवस्था म्हणजे त्यांच्या अभावपूर्ण जीवनाची सहज स्वाभाविक प्रतिक्रिया होती. एवढे मात्र खरें की, आपले दलितांचे म्हणून असे एक वेगळे साहित्य आहे व ते असावे. ही जी भावना त्या वेळच्या काही साहित्यिकांमध्ये होती ती मात्र प्रामाणिक होती आणि ती त्यांनी आपल्या कुवतीनुसार रुजविण्याचा प्रयत्न केला.

याही काळात म्हणजे १९५३–५४ च्या आसपास दलित जीवनाचे समर्थ चित्रण करणारा त्यांच्या आशा, आकांक्षाना शब्दरूप देणारा एक कलावंत लिहित होता. आणि तो म्हणजे अण्णा भाऊ साठे. हाच दलितातला पहिला महान् लेखक होय. अण्णा भाऊ हे मार्क्सवादी होते. मॅक्झिम गॉर्कीचा त्यांचा-वर प्रभाव होता. मार्क्सवादामुळे आलेली साहित्यविषयक, जीवनविषयक दृष्टी, आंबेडकरी चळवळीशी दलित या नात्याने असलेला ओलावा, साहित्य आणि समाज याची सुस्पष्ट असलेली जाण, दलित जीवनाचा प्रत्यक्ष अनुभव या सर्व गोष्टींमुळे अण्णा भाऊ पोथीनिष्ठ मार्क्सवादी कलावंतापेक्षा म्हणजे त्या वेळेच्या पुरोगामी लेखकांपेक्षा खऱ्या अर्थाने वर्गीय जाणीवा घेऊन आलेले कलावंत होते.

या बाबतीत नेहमी असा एक प्रश्न पडतो की, मराठी साहित्यात समाजाभिमुख म्हणता येईल असे प्रवाह निर्माण झालेले आहेत. महात्मा गांधींच्या तत्वज्ञानातून उदयास आलेले गांधीवादी साहित्य आणि मार्क्सवादी विचार घेऊन आलेले पुरोगामी साहित्य. मार्क्सवादी तत्वज्ञान हे तसे शोषित-पीडितांच्या बाजूचे, समाजातील तळगाळाचा, दलितांचा विचार करणारे, त्यांना संघर्षशील करणारी विचारधारा असलेले पुरोगामी साहित्य हे त्या काळच्या दलित लेखकांना आपले कां वाटले नाही? ही आपली वाङ्मयीन परंपरा आहे असे त्यांनी कां मानले नाही, याची अनेक कारणे आहेत. राजकीय आहेत,

सामाजिक आहेत, सांस्कृतिक आहेत. कामगारांवर लादलेला जुलमी 'काळा-कायदा' रद्द व्हावा यासाठी कॉ. डांगे यांच्या बरोबर १९३६ डॉ. आंबेडकर रस्त्यात उतरतात आणि त्या लढ्याचे नेतृत्व करतात. १९३० च्या सुमारास स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना करणारे आणि पक्षाच्या जाहिरनाम्यात वर्गीय-दृष्टीने कार्यक्रम मांडणारे बाबासाहेब, नंतर 'शेडयूल्ड कास्ट फेडरेशन' कां स्थापन करतात, याचा विचार करावेसे त्यावेळी कोणाला वाटले नाहीं. रशियन क्रांतीने प्रभावित झालेल्या त्या वेळच्या मार्क्सवादी चळवळीच्या उच्चवर्गीय नेतृत्वाला सामाजिक क्रान्तीची, जातीयतेविरुद्ध बंड उभारून पिळल्या जाणाऱ्या वर्गातील अंतर्विरोध नष्ट करण्याची गरज वाटली नाहीं. शहरात कामगारवर्गीय चळवळ बांधली गेली. त्याचे तात्कालिक फायदेही मिळाले असतील. पण क्रान्तीप्रवण असा जनसमूह त्यातून साकार झाला नाहीं. जसा विचार नेतृत्व करीत होते त्याच प्रमाणे पुरोगामी साहित्याचे अग्रणी देखिल हाच ढोबळ विचार आपल्या साहित्यातून मांडीत गेले. हे लेखक कलावंत म्हणून कधी तळगाळात शिरले नाहीत. तिथल्या जाणिवांना कधी तीव्रतर स्वरूपात शब्दबद्ध केले नाहीं. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली महाडचा चवदार तळ्याचा सत्याग्रह झाला, काळाराम मंदिराचा सत्याग्रह झाला. मनुस्मृती जाळली गेली. इत्यादी क्रांतीकारक घटना घडत असतांना मराठीतील इतर लेखकांचे असू द्या, पण पुरोगामी म्हणविणाऱ्या लेखकांनी, मानवी स्वातंत्र्याच्या दृष्टीने महत्त्वाच्या असलेल्या ह्या विराट आंदोलनाचे आपल्या लेखणीद्वारे का चित्रण केले नाही याचे सरळ आणि साधेच उत्तर द्यायचे म्हणजे त्या वेळचा लेखक कलावंत मग तो कुठल्याही तत्वज्ञानाशी बांधलेला असो, त्याला संस्कारातून मुक्त होणे सहजासहजी जमले नाही. आजही जमत नाही. दोष तत्वज्ञानाचा नाहीं. असलाच तर मानसिक व सामाजिक कमजोरीचा होय. केवळ त्यांच्या जगण्यातूनच नव्हे तर त्यांच्या कलाकृतीतून देखिल हे 'संस्कार' अनेक संदर्भांनी व्यक्त होत असतात. तात्पर्य, त्या काळचे पुरोगामी वाङ्मय हे मालक–मजूर या संघर्षापुरतेचे मर्यादित राहिले. आणि त्यातही ते आपल्या वास्तव स्वरूपात न प्रगटता ते 'रोमँटीसिझमच्या' आवरणाखाली अवतरले. परिणामी पुरोगामी वाङ्मय चळवळ खुंटली गेली. आणि पुन्हा सुरू होण्यासाठी १९६० साल उजेडावे लागले.

तर 'महाराष्ट्र दलित साहित्य संघ' या संस्थेने दलित समाजातील साहित्यिकांचे पहिले संमेलन घडवून आणले. वेगळ्या साहित्य संमेलनाची

आवश्यकता क्रांतीवीर फुल्यांनी जवळ जवळ शंभर वर्षापूर्वीच नोंदवून ठेवली होती. 'मराठी ग्रंथकार सभेस' (साहित्य संमेलनास) त्यांनी जे पत्र पाठविले होते त्यात म्हटले होते की, ––तसल्या लोकांनी उपस्थित केलेल्या सभांनी व त्यांनी केलेल्या पुस्तकातील भावार्थाशी आमच्या सभांचा व पुस्तकांचा मेळ दिसत नाही. ––या वरून आम्हा शूद्रादी अतिशूद्रास काय काय विपत्ति व त्रास सोसावे लागतात हे त्यांच्यातील उंटावरून शेळ्या वळवणाऱ्या ग्रंथकारांस व मोठमोठ्या सभास्थानी आगांतूक भाषण करणांरास कोठून कळणार? (महात्मा फुले समग्र वाङ्मय, पृष्ठ ३०७). या संमेलनाची आवश्यकता काय आहे. संमेलन म्हणजे काय? या विषयीचा लेख "प्रबुद्ध भारतात" (१५ फेब्रुवारी १९५८) बन्धुमाधव यांनी लिहिला होता. त्यात त्यांनी म्हटले आहे की, लेनिनचे क्रान्तिकारक विचार जसे रशियन लेखकांनी आपल्या साहित्यातून मांडून क्रांतीला मदत केली, तसेच बाबासाहेबांचे विचार खेडोपाडी पोहचविणे आपल्या साहित्यिक कलावंताचे कार्य होय. याच लेखात त्यांनी अतिशय महत्वाचा व समंजस विचार मांडलेला आहे. ते म्हणतात, 'पण केवळ एक राजकारण म्हणजे समाजाच्या एकाच बाजूने विरोधी पक्षावर उठाव करण्याची पद्धती होय. पण 'उठाव' हा केव्हांही चौफेर झाला पाहिजे. त्या शिवाय आपल्यावर हजारो वर्षे अन्याय, जुलुम, जबरदस्ती करणारा प्रबळ विरोधी चारी मुंडे चीत होणार नाही.

ऑक्टोबर १९५६ मध्ये बाबासाहेबानी आपल्या लाखो अनुयायांसह केलेल्या बोद्ध धर्म स्विकाराचे महत्व केवळ धार्मिक असे नव्हते. तर त्याला एक सांस्कृतिक आशय देखिल होता. एका नव्या सांस्कृतिक जीवनाकडे दलितांची वाटचाल सुरू झाली होती आणि या वाटचालीतूनच दलित समाजातील लेखकांचे पहिले संमेलन आकाराला आले होते. खरं म्हणजे, हे संमेलन डिसेंबर १९५६ मध्ये डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या मार्गदर्शनाखाली होणार होते. परंतु त्यांच्या आकस्मिक महानिर्वाणामुळे हा संकल्प पुरा होऊ शकला नाही. (प्रबुद्ध भारत : १८-१-५८) हे संमेलन रविवार दि. २ मार्च १९५८ रोजी, बंगाली हायस्कूल हॉल, मोरबाग रोड, दादर येथे झाले. संमेलनाचे अध्यक्ष खासदार बापूसाहेब कांबळे हे होते. उद्घाटन आचार्य अत्रे यांच्या हस्ते व्हावयाचे होते. परंतु ते येऊ शकले नाहीत. मग उद्घाटक म्हणून शाहिर अण्णाभाऊ साठे यांची निवड झाली. स्वागताध्यक्ष घनःशाम तळवटकर हे होते. या समेंलनाच्या निमित्ताने 'दलित वर्गातील वाङमयाचा दृष्टिकोन काय असावा!' या विषयावर एक निबंध स्पर्धा देखिल आयोजित केली होती. 'प्रबुद्ध

भारत' या दलितांच्या एकमेव साप्ताहिकाने सम्मेलन विशेषांक देखिल काढला होता. त्यावेळी कार्यकारी संपादक म्हणून श्री. दा. ता. रुपवते हे काम बघत होते. संपादकियात म्हटले होते, 'या विचित्र समाजव्यवस्थेविरूद्ध दलित समाजाने सातत्याने बंड उभारले. या बंडाचा इतिहास म्हणजे दलित साहित्य'.

'दलित साहित्य' हा शब्द प्रयोग 'मराठवाडा (दि. अं १९६९) या मध्ये आयोजित केलेल्या परिसंवादामुळे रूळला असे काहीजण मानतात. या परिसंवादाने या शब्दाला भारदस्तपणा आला असला तरी तो पूर्वीपासून वापरात होता. पहिल्या संमेलनात ह्या संबंधी ठराव देखिल झाला होता. तो असा "ठराव ५–मराठी भाषा व साहित्यक्षेत्रात दलित लेखकांचे व अन्य लेखकांचे दलितांविषयींचे साहित्य 'दलित साहित्य' म्हणून स्वतंत्र विभाग मानण्यात यावा व त्यानुसार साहित्य संघ, विश्वविद्यालये यानी या विभागाचे सांस्कृतिक महत्व ओळखून त्यांची योग्य ती दखल घेतली पाहिजे (प्रबुद्ध . भारत ४-३-५८).

दलितांच्या या पहिल्या साहित्य संमेलनाची दखल 'दै. मराठा' सोडल्यास त्या काळच्या कुठल्याही वृत्तपत्राने, साप्ताहिकाने व मासिकाने घेतलेली दिसत नाही. त्यावेळी साहित्य क्षेत्रात धडपड करणारी काही ठळक नावे म्हणजे घन:शाम तळवटकर, कॉ. आर. बी. मोरे, दिनेश लखमापूरकर, टी. पी. अडसूळ, राम उपशाम, जनार्दन वाघमारे, अप्पा रणपिसे, दा. ता. रुपवते, बन्धुमाधव, भाई नरेंद्र मोरे, चोखा कांबळे, म. दु. ताम्हाणेकर, यादवराव गांगुर्डे, डि. वाय. कांबळे. इ. होत.

या संमेलनात झालेले अण्णा भाऊंचे भाषण दलित साहित्याला थोडी फार दिशा दाखविणारे होते. परंतु त्यांनी त्यावेळी मांडलेला साहित्य विचार हा विचारच राहिला. दलितांचे विश्व रंगविणारे निर्मितीक्षम वाङमय दमदार स्वरूपात प्रगटलेच नाही. पुढे-पुढे म्हणजे 'फकिरा' नंतर अण्णा भाऊ देखिल 'ग्रामीण रोमँटीसिझमला बळी पडले. याची वाङमयीन कारणे असतीलच पण अ-वाङमयीन देखिल आहेत.

'महाराष्ट्र दलित साहित्य संघ' ही दलितांच्या साहित्याचे व साहित्यिकांचे व्यासपीठ ठरु शकले नाही. या क्षेत्रात काम करणारी मंडळी ही रिपब्लिकन पक्षाचे देखिल कार्यकर्ते होते. हा काळ मोठा विचित्र होता. बाबासाहेबांचे निर्वाण होऊन दोन वर्ष झाली होती. समाजाचे धुरिणत्व करील अशा तोलामोलाचा नेता नव्हता. संयुक्त महाराष्ट्र समितीच्या रुपाने एक जनतेची मोठी ताकद उभी राहिली होती. रिपब्लिकन पक्षात व्यक्तीस्पर्धा सुरु झाली. परिणती पक्षाचे निरनिराळे गट झाले.

त्याचा परिणाम देखिल दलित साहित्य संघावर झाला. तो नष्ट झाला. त्यातून कुणी 'महाराष्ट्र बौद्ध परिषद' काढली तर कुणी 'महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभा' काढली. अण्णाभाऊ, शंकरराव खरात हे लिहितच होते. याच सुमारास बाबुराव बागुल हे लिहू लागले. १९६० च्या नतर मराठी वाङमयात अनेक नवीन प्रवाह सुरु झाले. नारायण सुर्वे यांची कामगारांची कथा, व्यथा, वेदना सांगणारी कविता याच काळात अवतरली. मराठीतील संतप्त तरुणांची 'अंग्री यंग मेन' ची अनियत-कालिकांची (लिट्ल मॅगझीन) ची चळवळ प्रस्थापितांविरुद्ध (अँटी इस्टॅब्लिशमेंट) बंडाचा झेंडा घेऊन उभी राहिली. विषमसमाजव्यवस्थेविरुद्ध विद्रोह पुकारुन दलितांचे दुःख घेऊन बागुलांची कथा याच काळात धडका देऊ लागली. कथेच्या अगोदर बाबूरावांनी कविता लिहिल्या आहेत. 'फक्त' या अनियतकालिकाने त्या 'विद्रोहाच्या कविता' या नांवाने सायक्लोस्टाईल स्वरुपात प्रसिद्ध केल्या. सतीश काळसेकर, प्रदिप नेरुरकर व नारायण बांदेकर यांनी त्याचे संकलन केले. त्यात पंधरा कविता आहेत. या कवितेत अस्पृश्यतेसंबंधी चीड, संताप हा अत्यंत दाहक स्वरुपात व्यक्त झालेला आढळतो.

'ज्यांनी चूक केली इथे जन्म घेण्याची
त्यांनीच तो सुधारली पाहिजे
देश सोडून अथवा भीषण युद्धे करुन'

या भाषेत त्यांनी विद्रोह पुकारला होता. संघर्षशील होण्याची तीव्रतम इच्छा त्यांची कविता बोलून दाखवित होती.

त्यांच्या 'जेव्हा मी जात चोरली होती' या कथासंग्रहाने तर अवघे मराठी विश्व हादरून टाकले होते. मराठीतील नियतकालिकांनी आणि समीक्षकांनी या कथासंग्रहांचे प्रचंड स्वागत केले. हा कथासंग्रह कुणाला निग्रोच्या झाज संगीतासारखा वाटला, तर कुणाला ते दलितांचे महाकाव्य वाटले, तर कुणाला त्यातील दहा कथा या दहा विजेचे फटके वाटले. वाचकांना अस्वस्थ करण्याची त्यांची ताकद या कथासंग्रहांत तर होतीच परंतु केवळ अस्वस्थपणाच निर्माण झाला असे नाही तर त्यांच्या 'विद्रोहाच्या कवितेने' व कथेने मराठी साहित्यात काही प्रश्न देखील निर्माण केले.

या अगोदर आपले अनुभव विश्व, आपले जीवन, आपले विद्रोही विचार साहित्यात मांडावेत, ते कथाविषय होऊन यावेत असे अनेकांना वाटत होते. परंतु कसे लिहावे, काय लिहावे हे प्रश्न मात्र भेडसावित होते. हे दाहक अनुभव पेलण्याची ताकद व त्याला सर्जनशील आकार देण्याचे कार्य बागुलांच्या या कथा संग्रहाने

केले. दलित साहित्याच्या त्या वेळच्या वैचारिकतेला बाबुरावांनी ही निर्मितिक्षम साथ देऊन दलित साहित्याला आकार देऊन अण्णाभाऊ, शंकरराव यांनी मांडलेली दलितांची वेदना अधिक बोलकी करून, अनेक तरूण दलित लेखकांना कृतीशील केले असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

खरे म्हणजे या काळातल्या, वर उल्लेखिलेल्या चळवळी म्हणजे 'प्रगत साहित्य सभेचे', पुरोगामी साहित्य, 'महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभेचे' 'दलित साहित्य' व 'संतप्त तरुणांची' प्रस्थापितांविरुद्धची अनियतकालीकांची चळवळ यामध्ये मुख्य सूत्र प्रस्थापितांविरूद्ध बंड असेच होते. आणि म्हणुनच या तिन्ही प्रवाहात एकमेकां-विषयीचे सामंजस्य व स्नेहभावांची वृत्ती दिसत होती. अनेक 'दलित लेखक', 'प्रगत' लेखक 'लिटील मॅगझीनमध्ये' लिहित होते. या संतप्त तरुणांचा देखिल ह्या दोन्ही प्रवाहांकडे बघण्याचा दृष्टिकोन स्नेहभावाचा होता. बागुलांच्या 'विद्रोहाच्या कविता' तर 'फक्त' सारख्या अनियतकालिकांच्या चळवळीनेच प्रकाशित केल्या, आहेत. सांगायचा मुद्दा हा की, ह्या चळवळी त्या अर्थाने परस्परविरोधी अशा नव्हत्या.

'लिटल मॅगझीन' ची चळवळ ही दाखवेगिरीची चळवळ आहे. ती एक वाङ्मयीन फालतूगीरी आहे असे बऱ्याच ठिकाणी बोलले जाते. परंतु ज्या तऱ्हेने आणि ज्या तथाकथित अच्चभ्रु दृष्टिने ह्या चळवळीकडे पाहिले जाते आणि तिला केवळ वाङ्मयीन भंकस' म्हणून ठरविले जाते. तशी ती मुळीच नाही, नव्हती. अर्थात 'सत्यकथा'सारखे मासिक जाळणें ,बसमध्ये, सार्वजनिक मूत्रीच्या ठिकाणी अथवा आसपास कवीसंमेलने भरविणे इ. फालतु गोष्टी त्यांनी केल्या. ह्या गोष्टी चळवळीत कराव्याही लागतात. पण विध्वंसनालाही किंवा नाविन्यालाही एक शिस्त लागते, बैठक लागते. ती या ठिकाणी मात्र दिसत नाही. परिणामी ती 'दाखवेगिरी' ठरते.

लि. म. ची चळवळ मूळ का धरू शकली नाही याची कारणे शोधल्यास दलित साहित्याची चळवळ जोमाने कां फोफावली व तिने मूळ कां धरले याची मात्र कारणे सापडतात.

लि. म. ही एक चळवळ होती. चळवळ म्हटली म्हणजे त्या मध्ये सांघिककृती अभिप्रेत असते. आपणाला कुणाविरुद्ध लढायचे आहे, आपला नेमका शत्रू कोण याचे भान असल्याशिवाय त्या कृतीला अधिष्ठान प्राप्त होऊ शकत नाही. आम्ही इस्टॅब्लिश्मेंट विरुद्ध लढतोय् असे त्यांचे म्हणणे होते. दुर्दैवाने, मात्र इस्टॉब्लिश्मेंट म्हणजे एखादे 'सत्यकथा' सारखे मासिक किंवा एखादा

वाचक प्रिय लेखक म्हणजेच इस्टॅब्लिश्मेंट ही भ्रामक व्याख्या उराशी बाळगल्यामुळे ही चळवळ व्यक्तिवादी आणि व्यक्तीकेंद्रित झाली चळवळीचा शत्रू व्यक्ती कधीच नसते. व्यवस्था असते. व्यवस्थेविरुद्ध लढण्यास आपणास पर्यायी व्यवस्था अभिप्रेत असावी लागते. इथे व्यापक लढ्याचा भाग सोडला तरी लि. मेगझीनवाल्यांनी जो वाङ्मयीन लढा सुरू केला होता तो मुख्यतः कलाकृतीच्या तंत्रांच्या बाबतीत होता, 'आम्हाला जे वाटतं तसं आम्ही लिहू', तुम्ही कोण टिक्कोजी राव? ही त्यांची भूमिका होती. कांही लिंग अवयव वाचक शब्द आणि आपण 'गांडूपिढीतील' या भावनेतून निर्माण झालेला 'अंधारमय' आशय या बाबतीत वेगळेपण सोडले तर त्या वेळच्या प्रस्तापितांमध्ये व संतप्त तुरुणांच्या वाङ्मयामध्ये ठळक भेदरेषा काढता येणे अशक्य आहे.

जर या चळवळीकडे सामाजिक बाबतीत कल्पनाशक्ती असती (सोशिऑलॉजिकल इमॅजिनेशन) तर त्यांनी स्वतःला 'गांडू' म्हणवून घेतले नसते. मराठी वाङ्मयातील साचलेपणांची त्यांनी ह्या दृष्टीने जर समीक्षा केली असती तर इथल्या समाज व्यवस्थेतून उद्‌भवणाऱ्या सांस्कृतिक मूल्य कल्पनांचे विच्छेदन केले असते तर त्यांचे वाङ्मय हे वेगळ्या आशयाचे, पर्यायाने वेगळ्या वाङ्मयीन मूल्यांच्या संदर्भात मांडता आले असते. समाजविन्मुखतेमुळे सर्जनशीलता कशी गोठली जाते हे इथे पहायला सापडते. शिवाय लिटील मेगझीन काढले ही एक आर्थिक दृष्टीने परवडणारी चळवळ. त्यामुळे कुणीही उठावे आणि चार मित्र आणि चार पैसे जमवून एखादे अनियतकालिक काढावे असे होत राहिले. त्यामुळे चळवळीचा जो दबदबा होता किंवा जे गांभीर्य होते ते पातळ होत गेले. प्रस्थापितांविरुद्ध लढता लढता प्रस्थापितांच्याच गोठ्यात जाऊन काहीजण संतप्त बसले. दि. पु. चित्रे, चंद्रकांत खोत, भाऊ पाध्ये ही काही ठळक नावें. ही चळवळ जरी मूळ धरू शकली नाहीं तर ह्या चळवळीमुळे अनेक वाङ्मयीन फायदे झाले. या पुढील तरूण कलावंत आपल्या साहित्य विषयक जाणिवा अधिक धीट होऊन मांडू लागले. उच्चभ्रू टिकाकारांची मते म्हणजे साहित्यातील शेवटचा शब्द ह्या समीकरणाला तडे दिले गेले. मराठी समीक्षकांच्या मते 'कोसला'सारखी चांगली कलाकृती मराठीला लाभली. या चळवळीतले अग्रणी लेखक आणि कवी सतीश काळसेकर, तुळशी परब आणि राजा ढाले हे आज दलित श्रमिक जनतेशी आपल्या साहित्याचा संबंध जोडीत आहेत. याचाच अर्थ असा की बंडखोरी मग ती वाङमयीन क्षेत्रात असो वा सांस्कृतिक क्षेत्रात असो वा आर्थिक क्षेत्रात असो तिच्यापासून

सामाजिकता अलग काढली तर ती निरर्थक व विषमव्यवस्थेला निरुपद्रवी ठरते. कलाकृतीची स्वायतता मानणाऱ्या मंडळींना हे जरा विचित्र वाटेल. कलाकृतीची स्वायतता म्हणजे तिला जीवनाच्या संघर्षातून वेगळे काढणे, किंवा समाजातून अथवा समाजापासून दूर ठेवणे असे मात्र नाही. एखाद्या भाटाची किंवा खुषमस्कऱ्याचीच जर भूमिका एखाद्या निर्मितीच्या मागे असेल तर त्या मर्यादेपर्यंत कलाकृतीची स्वायतता विचारात घेतली तर ती मान्य होण्यासारखी आहे.

'प्रगत साहित्य सभेच्या' म्हणजे पुरोगामी साहित्य चळवळीविषयी बोलायचे तर सुरुवातीच्या काळात अनेक पुस्तिका त्यांनी प्रकाशित केल्या. त्यापैकी डॉ. सदा कऱ्हाडे, यांचे 'अण्णाभाऊ साठे यांचे कथाविश्व' राजा राजवाडे यांचे' किलवेनमानीची रात्र' हे दीर्घ कवितेचे पुस्तक आणि सुधीर बेडेकर यांचा 'निशासूक्त का सूर्यगर्जना' हा लघु नियतकालिकावरील "महालेख" ही होत. परंतु नारायण सुर्वेचा 'ऐसा गा मी ब्रह्म, किंवा "माझे विद्यापीठ" मध्ये जी ताकद आहे ज्या ताकदीचा एकही लेखक किंवा लेखन या चळवळीने दिले नाही ही मात्र दुर्दैवाची गोष्ट आहे. मी हे विधान समीक्षात्मक, वैचारिक साहित्याच्या बाबतीत करीत नसून वाङमयीन कलाकृतीच्या संदर्भात करीत आहे. पुरोगामी चळवळ का अखंड चालू शकली नाही याची कारणे सुरुवातीच्या पुरोगामी चळवळीच्या संदर्भात जी कारणे दिली आहेत तीच थोड्याफार फरकाने सांगता येतील.

पुरोगामी साहित्य चळवळीत अखंड जिवंतपणा भासत नसला तरी या चळवळीने, जी मुख्यत्वे साम्यवादाच्या प्रभावाखाली वाढली होती तिने मराठी समीक्षेला गूढ आणि धूसर वलयातून बाहेर पडण्यास भाग पाडले. 'साहित्य आणि समाज जीवन हा लालजी पेंडसेंचा १९३७ साली प्रसिद्ध झालेला समीक्षाग्रंथ त्या दृष्टीने निश्चितच क्रांतीकारी आहे. प्राचीन वाङमयाकडे पाहण्याचा जो अलौकिक दृष्टिकोन होता तो बदलला जाऊन त्याकडे वस्तुनिष्ठपणे पाहण्यात येऊ लागले. वाङमयकृतीच्या आकलनाला त्यामुळे एक नवा अर्थ येऊ लागला. आस्वादन प्रक्रियेत गोडी येऊ लागली. ऐतिहासिक भौतिकवादाच्या आधारे केली गेलेली समीक्षा विशिष्ट कालखंडात विशिष्ट प्रकारचेच साहित्य का निर्माण होते याची समीक्षा करू लागले. तत्कालीन समाज, परिस्थिती आणि साहित्य याची सांगड घातली जाऊ लागली. साहित्या-

कडे बघण्याची समाजशास्त्रीय दृष्टी त्यामुळे लाभली. पुरोगामी साहित्य चळवळीतील समीक्षेने जीवनवादी समीक्षेस बळकटी तर आणलीच पण तिला एक प्रकारची प्रतिष्ठा देखिल मिळवून दिली. श्रीपाद अमृत डांगे, बा. रं. सुंखटणकर, गं. बा. सरदार, शरच्चंद्र मुक्तिबोध, दि. के. बेडेकर हे साम्यवादी समीक्षक काय किंवा ह्या समीक्षेच्या प्रभावाखाली असलेले, वि. स. खांडेकर, ग. त्र्यं. माडखोलकर, कुसुमावती देशपांडे इ. समीक्षक काय ह्या सर्वांनी मिळून मराठी साहित्याकडे बघण्याची एक विशिष्ट दृष्टी दिली हे नाकारून चालणार नाही.

दलित साहित्य चळवळीच्या समकालीन असलेल्या दोन साहित्यिक प्रवाहाचा आढावा घेतल्यावर परत दलित साहित्य चळवळीकडे वळू या. याच काळात मराठवाडा हे देखिल दलितांच्या सांस्कृतिक - साहित्यिक चळवळीचे केंद्र सुरू झाले होते. याचे कारण म्हणजे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी औरंगाबाद येथे सुरू केलेले मिलिंद कॉलेज होय. बहुसंख्य विद्यार्थी तेथे ग्रामीण भागातून आले होते. प्राध्यापक वर्ग हा देखिल दलित समाजातून आलेला होता. आपल्या साहित्यिक सांस्कृतिक चळवळीविषयी येथे विचार विनिमय होत होता. तिथल्या कॉलेजातील निघणाऱ्या वार्षिकातून दलितवर्गियांचे लिखाण प्रसिद्ध होऊ लागले होते. प्राचार्य म. भि. चिटणीस यांचे मार्गदर्शन लाभत होते. याच सुमारास अमेरिकेस उच्च शिक्षणासाठी गेलेले प्राचार्य म. ना. वानखडे हे निग्रो साहित्याची दाहकता, त्याची बंडखोरी त्यांचे कमालीचे हादरवून सोडणारे अनुभवविश्व, विचार मांडण्याची पद्धत ही सारी दाहकता घेऊन ते औरंगाबादला परत आले. दलित समाज व निग्रो समाज यांचा तुलनात्मक अभ्यास करू लागले.

खरं म्हणजे १९६७ साल हे दलित साहित्याच्या चळवळीच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचे असे वर्ष आहे. यांच वर्षी महाराष्ट्र बौद्ध साहित्य परिषदेने भुसावळला आपले साहित्य संमेलन भरविले होते. (३० एप्रिल १९६७) अध्यक्ष होते डॉ. म. ना. वानखडे. त्यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात अत्यंत मूलभूत प्रश्न उपस्थित केले होते. रामायण, महाभारत, संतकाव्य व अर्वाचीन मराठी साहित्यांची समीक्षा करून त्यांत दलितांच्या विश्वाला अजिबात स्थान नाही म्हणून दलित लेखकांनी बंडखोर बनून निग्रो वाङ्मयासारखे वाङ्मय निर्माण करून आपल्या प्रश्नांना वाचा फोडावी असे आवाहन त्यांनी केले.

मराठवाड्यातील म्हणजे मिलिंद महाविद्यालयातील तरुण विद्यार्थी व प्राध्यापकांना आपलेही साहित्यिक व्यासपीठ असावे असे वाटत होते. म्हणून त्यांनी मिलिंद साहित्य परिषदेची स्थापना केली, ह्या परिषदेचे उद्‌घाटन त्यावेळी मराठवाडा विद्यापीठाचे कुलसचिव असलेले प्रा. म. भि. चिटणीस ह्यांनी २७ नोव्हेंबर १९६७ ला केले अध्यक्षस्थानी शंकरराव खरात होते. या परिषदेचे सल्लागार म्हणून प्राचार्य डॉ. म. ना. वानखडे प्राचार्य आर. पी. नाथ व प्राचार्य शिंदे यांची नियुक्ती झाली. अध्यक्ष प्रा. गंगाधर पानतावणे हे होते. या परिषदेच्या कार्यकारिणीवर प्रा. रा. ग. जाधव, प्रा. ल. बा. रायमाने, सुखराम हिवराळे, प्रा. सौ. अरुणा लोखंडे इत्यादींची निवड झाली. यात महत्वाचा मुद्दा असा की याच प्रेरणेतून याच वर्षी विद्यार्थ्यांच्या सहाय्याने फंड उभारून 'अस्मिता' (सध्याचे) 'अस्मितादर्श' नावाचे एक त्रैमासिक सुरू करण्यात आले. ह्या त्रैमासिकाचे संपादक डॉ. म. ना. वानखडे हे होते प्रा. पानतावणे प्रा. रायमाने, वामन निंबाळकर व सुखराम हिवराळे यांनी संपादन सहकार्य केले. या त्रमासिकांच्या पहिल्याच अंकातील महाराष्ट्रातील सांस्कृतिक संघर्ष व वाङ्मयीन समस्या या विषयीची चर्चा ही दलित साहित्याची दिशा दाखविणारी होती. एकूण या त्रैमासिकाने दलित वर्गीय लेखकांची जी कोंडी होत होती ती फोडण्याचे मोठे काम केले. 'अस्मितादर्श' ने नव्या दमाच्या दलित साहित्यिकांच्या निर्मिती क्षमतेला व सर्जनशीलतेला आपलेपणाने जवळ करून त्यांच्या कलाकृतींना प्रकाशात आणण्याचे काम केले. ह्या त्रैमासिकाने तरूण लेखकांमध्ये आपल्या जाणिवांसंबंधी जो आत्मविश्वास उत्पन्न केला तो दलित साहित्याच्या चळवळीला पुढे नेणारा ठरला. बाबुराव बागुल, प्रा. केशव मेश्राम या सारखे नावारूपाला आलेले सामाजिक जाणिवा पुढे नेणारे लेखक कवी हे लिहितच होते परंतु त्या प्रवाहात अनेक नवीन समृद्ध चेहरे येऊन मिळाले. या नव्या जाणिवेने व प्रेरणेने दमदार झालेल्या प्रवाहाचा आलेख दया पवार यानी 'उपेक्षितांच्या नव्या जाणिवा' या लेखात ('युगसंवाद' वर्ष १, अंक २ : पुनर्मुद्रण' प्रतिष्ठान, जुलै १९६९) अतिशय स्पष्टपणे चितारला आहे. 'अस्मितादर्श' ने सुरुवातीला जो वाङ्मयीन दबदबा व आदर निर्माण केला होता त्यात जसा दलित साहित्यिक विचारवंताचा वाटा आहे तसाच शरच्चंद्र मुक्तिबोध, वामन इंगळे, प्र. श्री. नेरूरकर, डॉ. सदा कऱ्हाडे, नारायण सुर्वे, इ. पुरोगामी मार्क्सवादी समीक्षकांच्या कलावंताचा देखिल आहे 'अस्मितादर्श' चे अंक चाळल्यास हे दिसून येईल.

१९६७ च्या अखेरीसची आणखी एक महत्वाची घटना म्हणजे 'महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभे' तर्फे मुंबई येथे आयोजित करण्यात आलेले साहित्य संमेलन होय. याचे महत्वाचे कारण म्हणजे मुंबई, औरंगाबाद, नागपूर, नाशिक, इ. ठिकाणी ज्या नव्या जाणिवांतून साहित्यिक चळवळी आकार घेत होत्या, ती मधील साहित्यिक, कलावंताना एकत्र येण्याचा योग आला. या संमेलनाचे अध्यक्ष प्रा. म. भि. चिटणीस हे होते. स्वागताध्यक्ष बौद्ध साहित्य सभेचे अध्यक्ष घन:शाम तळवटकर हे होते. या संमेलनात दलितांच्या साहित्याविषयी विधायक चर्चा झाली. परिसंवाद झाले. कविसंमेलन झाले. आणि यातूनच अनेक साहित्यविषयक प्रश्नांना उत्तरे सापडत गेली. संमेलनाच्या निमित्ताने बाबुराव बागुल, डॉ. म. ना. वानखडे, प्रा. म. भि. चिटणीस, घन:शाम तळवटकर, वामन निंबाळकर, दया पवार, सुखराम हिवराळे, दिनेश लखमापूरकर इ. साहित्यक्षेत्रात काम करणाऱ्या कार्यकर्त्यांची जी चर्चा झाली. त्यात दलित साहित्य चळवळीचे बरेच धागे जुळून आले. या संमेलनाचा आणखी एक विशेष म्हणजे या निमित्ताने प्रकाशित करण्यात आलेला दलित वर्गातील कवींचा प्रतिनिधिक कविता संग्रह 'आकार' हा होय. संमेलनात कविवर्य वा. रा. कान्त यांच्या हस्ते त्याचे प्रकाशन करण्यात आले. बाबूराव बागूल, दया पवार, अर्जुन डांगळे, प्रा. यादवराव गांगुर्डे, हरीश बुकाणे, चोखा कांबळे बंधुमाधव, सौ. हिरा बनसोड इ. कवीं-कवयित्रीच्या कविता त्यांत समाविष्ट करण्यात आल्या आहेत. बाबुराव बागूल व इतर दोन एक कवी सोडल्यास बाकीच्या कवितेला सामाजिकतेचे भान नसल्यासारखे वाटते. पारंपारिक पांढरपेशीच अनुकरणातच ती घुटमळताना दिसते. त्यामुळे हा प्रातिनिधिक कवितासंग्रह चर्चेचा किंवा आदराचा विषय होऊ शकला नाही. मात्र पुस्तकरूपाने पहिल्यांदा दलित वर्गातील कवींची कविता एकत्र आणण्याचे कार्य या कवितासंग्रहाने केले. १९६८ साली बागुलांचा दुसरा कथा संग्रह 'मरण स्वस्त होत आहे' प्रकाशित झाला. राज्यपुरस्कार मिळाल्यामुळे मोठ्या प्रमाणात चर्चिला जाऊ लागला. मराठीच्या कथा साहित्याच्या इतिहासातील एक घटना म्हणून त्या कथासंग्रहाला मान मिळाला. त्या वेळच्या पांढरपेशीच लेखकांच्या कथा कादंबऱ्यात झोपडपट्टीतील जीवन पांढरपेशीच किंवा त्याचा अनुभव नसलेल्या, त्या जीवनाकडे 'कलात्मकतेने' बघणाऱ्या लेखकांकडून वाचकप्रिय अनुभवातून रेखाटले जाऊ लागले होते. मध्यमवर्गीय मनोरंजनात्मक अभिरुचीने व त्यावेळच्या उच्चभ्रू समीक्षकांनी त्यांना एकदम वेगळ्या

वाटलेल्या आशयाच्या गाभ्यात आपली लेखणी न घुसविता आशयाच्या आवरणालाच गोजारीत राहिली. मराठीतील समीक्षक देखिल पांढरपेशी अनुभवात वाढलेला, मध्यमवर्गीय जीवनामूल्यांनी वेढलेला. त्यांच्याकडून अशा कलाकृतीच्या संदर्भात आविष्काराच्या तंत्रापलिकडे कलाकृतीची तळापासून समीक्षा करण्याची अपेक्षा चुकीची ठरेल. आणि म्हणूनच बागुलांच्या कथेसंबंधी लिहितांना मी म्हटले होते 'बाबुरावांच्या कथेबद्दल लिहिणे हे एक अवघड काम होय. त्यांच्या भाषेतील बेरकी रांगडेपण व हादरवून सोडणारे अनुभवविश्व संपूर्ण कथेला ओलांडून पुढे जाणारे आहे आणि म्हणूनच पारंपारिक कलामूल्यांच्या चौकटीत ती बसू शकत नाही. दलित साहित्याला वेगळ्या समीक्षेची गरज का आहे याचे उत्तर इथे सापडते. (दलितसाहित्य पुरवणी : "महाराष्ट्र टाईम्स" : १५ ऑक्टोबर, १९७२)

उच्चभ्रू टीकाकार कलाकृतींच्या संदर्भात कसाही विचार करीत असले तरी एवढे मात्र मान्य करावे लागेल की, त्यांनी जसे 'चक्र', 'माहिमच्या खाडीचे' स्वागत केले त्याचप्रमाणे किंबहुना त्यापेक्षाही जास्त त्यांनी बागुलांच्या कथेचे केले आहे. ही वस्तुस्थिती आहे. बाबुरावांच्या कथांचे किंवा एकूण दलित साहित्याचे प्रचंड स्वागत पांढरपेशीय टीकाकाराकडून समीक्षकांकडून सुरुवातीला केले गेले. याचे एकमेव कारण म्हणजे त्याच्यात येणारे अनुभवविश्व होय. ते इतके वेगळे तरंगमय आणि बोलके होते की, कसेही आडवे तिडवे फेकले तरी ते एकजीव होत असे. या पार्श्वभूमीवर त्यावेळच्या मराठी कादंबऱ्यातील–कवितेतील एकसूरी क्षीण अनुभवातून साकार होणाऱ्या आशयाच्या सांगाड्याची कल्पना येऊ शकते. माझे हे विधान त्या वेळच्या काही निवडक कलाकृतींना स्पर्श करू शकणार नाही याची मला पूर्ण कल्पना आहे.

ज्याअर्थी उच्चभ्रू समीक्षकांनी बागुलांच्या कथेचे स्वागत केले त्याअर्थी त्यांची साहित्याकडे बघण्याची दृष्टी निकोप आहे असे समीकरण मांडणे चुकीचे ठरेल. त्या समीक्षकांना किंवा टीकाकारांना जोपर्यंत दलित साहित्याच्या किंवा बागुलांच्या कथेतील भेदक अनुभवविश्व दिसू लागले होते तोपर्यंत ती कथा किंवा ते साहित्य उच्च दर्जाचे होते. परंतु बागुल जेव्हां दलित साहित्याची, आपल्या कथावस्तुची निर्मिती सांगू लागले. त्या निर्मितीचा उगम विशिष्ट सामाजिक परिस्थितीत आहे असे सांगू लागले, त्यांची वैचारिकता जेव्हां बदलाची भाषा बोलू लागली. ती परंपरा नाकारू लागली.

विद्रोह, नकार आणि विज्ञाननिष्ठा या मूल्यांचा स्विकार करू लागली, हिंदु मानसिकतेच्या विरोधात उभी राहिली. तेव्हां त्यांची श्रेष्ठ कथा त्याच समीक्षकांना मूल्यहीन व प्रचारी वाटू लागली. पुढे नामदेव ढसाळ या दलित कवीच्या बाबतीत देखिल हाच प्रकार आढळून येईल.

१९६८ नंतर दलित साहित्याचा विचार व त्याची भूमिका दलित समाजातील विचारवंत समीक्षकांकडून मांडली जाऊ लागली होती. नव्या जाणिवांनी भारावलेले अनेक तरूण लेखक कवी लिहू लागले होते. रिपब्लिकन पक्षातील गटबाजी, त्यांची निष्क्रियता, त्या निष्क्रियतेतून उद्भवलेला समाजाचा मरगळलेपणा आणि प्रचलित प्रश्नांतून दाहक होत जाणारे सामाजिक वास्तव ही सगळी पार्श्वभूमी दलित लेखकांना होती. अस्मितादर्शमध्ये हे शब्दबद्ध होत होते. अनेक नवीन चेहरे मराठी साहित्यावर आपल्या पाऊलखुणा उमटवीत होते. याचवेळी मुंबईतून दलित कवींनी 'विद्रोह' नावाचे अनियतकालिक सुरू केले. केशव मेश्राम, दया पवार हे आपल्या संवेदनेला शब्दरुप देत होतेच. त्याच बरोबर वामन निम्बाळकर, त्र्यंबक सपकाळे, अर्जुन डांगळे, नामदेव ढसाळ, उमाकांत रणधीर, ज. वि. पवार इ. कवी व ताराचंद खांडेकर, योगीराज वाघमारे, अविनाश डोळस, योगेन्द्र मेश्राम, भास्कर चंदनशिव भिमराव शिरवाळे या सारखे कथा लेखक आकार घेत होते. बहुतेक सगळेच तरूण दलित साहित्यिक आपली कविताच घेऊन प्रथम आले. अनेक पातळीवरून आपल्या भाषित अनुभवाचे अनेक पदर उलगडून दाखविले.

दलित साहित्याची प्रभावी व तीक्ष्ण भूमिका 'मराठवाडा' (दिवाळी अंक, १९६९) ह्यात आयोजित केलेल्या परिसंवादात सापडते. डॉ. म. ना वानखडे, प्रा. म. भि. चिटणीस, दया पवार, बाबुराव बागूल यांनी आपल्या लेखातून जो इथल्या साहित्य परंपरेला नकार दिला, जो विद्रोह पुकारला तो इतका परिणामकारक ठरला की' परंपरेचा अभिमान बाळगणाऱ्या अनेक समीक्षक विचारवंताना देखिल त्याचे हादरे बसायला सुरुवात झाली. आणि मराठी साहित्य क्षेत्रात पुन्हा एकदा वादळी चर्चेला तोंड फुटले. दलित साहित्य विचाराला एकजात पांढरपेशीय किंवा उच्चवर्णीय समीक्षकांनी नाकारले असे म्हणणे चूक होईल. या उलट वा. ल. कुलकर्णी, दि. के. बेडेकर, रा. ग. जाधव, शरच्चंद्र मुक्तिबोध इत्यादिनीं ह्या विचारांचे त्या काळात समर्थन केल्याचे आढळेल. त्यांच्या समर्थनामध्ये निरनिराळ्या छटा असल्यातरी तरी

त्यांची सहानुभूती प्रामाणिक होती. तरी बहुसंख्य उच्चवर्णीय समीक्षकांची दलित साहित्याकडे बघण्याची दृष्टी सवतीची होती. त्यांच्या ह्या दृष्टीचे दर्शन महाबळेश्वर येथे नोव्हेंबर १९६९ ला झालेल्या म. सा. परिषदेच्या दुसऱ्या विभागीय संमेलनात घडले. या संमेलनात दलित साहित्यावर जो परिसंवाद आयोजित करण्यात आला होता त्या परिसंवादात पुणेरी प्राध्यापकांनी घेतलेली भूमिका ही त्यांच्या पांढरपेशीच मनोवृत्तीचीच द्योतक होय. (महाबळेश्वर संमेलनातील गारठा : प्रल्हाद वडेर : सत्यकथा : जानेवारी, १९७१) परंतु ज्यांना आपला भूतकाळ नको होता. भोवतालचे दाहक सामाजिक वास्तव नको होते. जे न्यूनगंडाने पछाडले होते. अशा दलित ब्राह्मणांना' देखिल दलित साहित्य म्हणजे काही तरी गलिच्छ, आपल्या समाजाची बदनामी करणारे वाटत होते. आजही तसे वाटते. आंबेडकरी आंदोलनातून मिळालेल्या सवलतीचा उपयोग त्यांनी पुरेपूर घेतला. पण आंबेडकरी आंदोलनाची आग मात्र त्यांना हृदयात साठवून ठेवता आली नाही. आपल्या वैयक्तिक उत्कर्षाबरोबर सगळयाच समाजाचा उत्कर्ष झाला आहे असा त्यांचा समज होता. आता आपण ब्राह्मणांसारखे लिहिले पाहिजे, बोलले पाहिजे, वागले पाहिजे असे वाटत होते. संधी मिळेल तिथे दलित साहित्याची टवाळी ते करत होते. आणि याचीच परिणती म्हणजे या लोकांनी बागुलांच्या 'पावश्या' या 'आम्ही' मासिकात क्रमशः प्रसिद्ध होणाऱ्या कादंबरीविरुद्ध व प्र. ई. सोनकांबळे यांच्या 'आठवणींचे पक्षी' या ललित लेखमालेविषयी प्रचार मोहिम होय. दलितांची दयनीय अवस्था रंगविणे म्हणजे दलितांची बदनामी किंवा गलिच्छपणा असे समीकरण मानण्याच्या 'डी. बी.' ची (दलित ब्राह्मण) समाजधारणा, समाजव्यवस्था, ती बदलण्याकरीता लागणारी साधने, क्रान्तिकारक लढे व चळवळी इत्यादीविषयींची मते पाहिल्यास त्यांच्या मध्यमवर्गीय मनोवृत्तीची कल्पना तर येतेच, पण त्यांच्या मानसिक नपुंसकत्वाचे देखिल दर्शन घडते. तसा दलितांतील बहुतेक सुशिक्षित वर्ग ह्या मनोवृत्तीचा नाही. सांगायच मुद्दा हा की, जसा काही दलितेतरांचा दलित साहित्याकडे बघण्याचा दृष्टीकोन हिनत्वाचा आहे तसाच दृष्टिकोन दलितांच्या एका छोटया गटाचा का होईना आहे. याच्यातील विनोद म्हणजे दलित साहित्य लिहिणे म्हणजे 'मांगवाडेमहारवाडे माजविणे होय' अशी ज्यांची भूमिका होती, स्वतःला दलित साहित्यिक म्हणून घेणे ज्यांना जातीयवादाचे लक्षण वाटत होते अशी काही मंडळी तर 'आपण' दलित साहित्याला स्वतःचा असा वैशिष्टयपूर्ण तोंडावळा मिळवून दिला असे स्वतःविषयी लिहवून घेताना आढळतात. आणि यापुढेही जाऊन

'दलित साहित्याची अँथालॉजी देखिल संपादन करतात. हा त्यांचा संधिसाधूपणा असेलही पण चळवळींच्या जबरदस्त रेट्याचा परिणाम नाकारता येत नाही. तर अशा या ऐन धामधुमीच्या काळात "महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभेने आपले दुसरे साहित्य संमेलन १३ व १४ फेब्रुवारी रोजी महाड येथे आयोजित केले. हे संमेलन त्या अर्थाने ऐतिहासिकच झाले. या संमेलनाचे उद्घाटन मराठीतील समीक्षक प्रा. वा. ल. कुलकर्णी ह्यांचे हस्ते झाले. अर्वाचीन साहित्याविरुद्ध दलित साहित्यिकांनी बंड करावे असे त्यांनी उद्घाटनाच्या भाषणात सांगितले. म. बौ. सा. सभेने बाबुराव बागुलांची अध्यक्ष म्हणून निवड करून त्यांचा यथोचित असा सन्मान केला. बाबुरावांनी आपला सन्मान-किती योग्य आहे. हे अध्यक्षीय भाषणानी दाखवून दिले. त्यांनी त्यांच्या भाषणात अत्यंत धीटपणे आणि आत्मविश्वासपूर्वक इथल्या राजकीय व सामाजिक परिस्थितीत दलित साहित्याची आवश्यकता प्रतिपादन केली. दलित साहित्य म्हणजे नेमके काय हे त्यानी फाफटपसारा न मांडता मोजक्या आणि अर्थपूर्ण शब्दांत सांगितले. दलित साहित्य विषयीच्या वैचारिकतेची आणि चिंतनाची सखोलता इथे सापडते. दलित साहित्य म्हणजे महारा-मागांचे साहित्य असे विचार मोडीत निघाले. आपल्या अध्यक्षीय मांडलेल्या अर्थपूर्ण भूमिकेचा दलित विचारवंत समीक्षकांनी तर आदर केला. पण इतरत्रही त्याचे चांगले स्वागत झाले. संमेलनाच्या निमित्ताने आयोजित केलेल्या परिसंवादातून जी वैचारिक घुसळण झाली ती देखिल महत्वाची होती. "म. बौ. सा. सभेने महाड येथे आयोजित केलेले संमेलन हे दलित साहित्य चळवळीत क्रांतिकारक ठरते असे म्हटल्यास अतिशयोक्ति ठरू नये. आपले जीवन वेगळे, आपले प्रश्न वेगळे, म्हणून आपले साहित्य वेगळे हा जो विचार होता त्या विचाराच्या अनेक अंगांची मांडणी करून, इथल्या राजकीय, सामाजिक सांस्कृतिक चळवळीच्या संदर्भात दलित साहित्याची जी वैचारिक बैठक मांडण्यात आली ती फारच भक्कम होती. म्हणूनच काहींना ते भाषण म्हणजे दलित साहित्याचा जाहिर-नामाच वाटला.

दलित साहित्य चळवळींचे व साहित्यिकांचे चाचपडणे आता संपले होते. आत्मविश्वासपूर्वक जाणिवा ह्या त्यांच्या निर्मितीतून दिसत होत्या. बागुलांची १९७० साली प्रसिद्ध झालेली दीर्घकथा 'सूड' व तिला डॉ. वानखडे यानी जी प्रस्तावना लिहिली होती तीत उपस्थित केलेल्या मुद्याबद्दल चर्चा सुरू झाली होती. चर्चेचा मुख्य रोख होता, 'दलितांनी दलितांविषयी संतापाने,

लिहिलेले साहित्य म्हणजे 'दलित साहित्य' ह्या प्रस्तावनेतील मुद्यावर. अर्थात् डॉ. वानखेडे ह्यानीं ह्या मुद्याबाबत आपल्या मुलाखतीत (दै. मराठा दिवाळी अंक, १९७३) जो खुलासा केला आहे तो अतिशय समजूतदार व गैर-समज दूर करणारा आहे. महाडच्या साहित्य संमेलनाचे पडसाद उमटत होते. 'अस्मितादर्श' हे त्रैमासिक महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाने दिलेल्या अनुदानाच्या सहाय्याने प्रा. पानतावणे निष्ठेने काढत होते. अनेक दलित साहित्यिक व पुरोगामी साहित्यिक आपापल्या परिने हातभार लाविते होते 'सत्यकथा' 'प्रतिष्ठान' 'मराठवाडा' इ. नियतकालिकांतून तरुण दलित साहित्यिक लिहू लागले होते. तरीही 'अस्मितादर्श' काय किंवा इतर मासिके काय ह्या वाढत्या प्रवाहाला सामावून घेऊ शकत नव्हती. आणखी एखाद्या दलित साहित्य चळवळीला वाहिलेल्या दलित समाजाचा सर्वांगीण विचार करणाऱ्या मासिकाची नितांत गरज होती. 'अस्मितादर्श' च्या मर्यादित जाणिवेबरोबर जाणिवे-तला देखिल मर्यादितपणा सिद्ध झाला होता. याच विचारातून मुंबईतील आपल्या सर्व थरातील मित्रांच्या सहाय्याने बाबुराव बागुल यांनी मे १९७१ मध्ये 'आम्ही' नावाचे मासिक सुरू केले. मासिकातील टोकदार व्यापकता आणि चळवळीच्या संदर्भातील सर्वस्पर्शी विचाराची भूमिका यापुळे उभ्या महाराष्ट्रा-तून चांगला प्रतिसाद मिळाला. अनेक नवे कोरे चेहरे दलित साहित्य चळवळीत सामील झाले. तुलसी परब, राजा ढाले, अर्जुन डांगळे अशा अनेक तरुणांनी अहोरात्र मेहनत घेतली. आंबेडकर चरित्रकार दिवंगत चां. भ. खैरमोडे यानी देखिल मदतीचा हात दिला. परंतु बागुलांसारख्या सर्जनशील कलावंताला मासिकाच्या संदर्भात त्याची व्यावहारिक बाजू सांभाळता न आल्याने मासिक वर्षभरातच बंद पडले. परंतु ही जी पोकळी निर्माण झाली होती. ती थोड्या फार प्रमाणांत शहाद्यांच्या आदिवासी चळवळीतील वळ आणि बळ घेऊन एप्रिल १९७२ मध्ये अवतरलेल्या 'मागोवा' या मासिकाने भरून काढली. दलितेतरांच्या कुठच्याही मासिकापेक्षा दलित साहित्याकडे, चळवळीकडे 'मागोवा' ने स्वच्छ समंजस आणि आपलेपणाच्या भूमिकेतून पाहिले. सुधीर बेडेकर हे संपादक असलेल्या ह्या मासिकाने प्रारंभी महाराष्ट्रातील सांस्कृतिक चळवळ, परंपरागत वाङमयीन मूल्ये यांची समीक्षा करून ती किती ठिसुळ अणि फसवी आहेत हे दाखवून दिले. मूलभूत आणि समाजशास्त्रीय वैचारिक बैठक लाभल्यामुळे 'मागोवा' विषयी दलित तरुणात आपलेपणाची भावना निर्माण झाली होती. नंतर नंतर मागोवाने घेतलेल्या प्रचलित परिस्थितीत

न पेलवणाऱ्या अतिडाव्या टोकाच्या भूमिकेमुळे 'मागोवा' अलगतावादाने पछाडला गेला. त्याच्या ह्या अलगतावादाने अनेक मित्रांना दूर लोटले. त्यात दलित साहित्यिकांचा देखिल अपवाद नव्हता.

याच काळात म्हणजे १९७२ साली मराठी काव्य क्षेत्राला, तिच्या सर्व पाळीव मूल्यांना हादरा देणारी एक वाङ्मयीन घटना घडली. आणि ती म्हणजे तरूण दलित कवी नामदेव ढसाळ यांच्या 'गोलपिठा' ह्या कविता संग्रहाचे प्रकाशन होय. आपली भाषा आपले अनुभव आपली जाणिव अतिशय आक्रमक स्वरूपात घेउन हा कवी अवतरला होता. वामन निंबाळकराच्या 'गांवकुलसा-बाहेरील कविता' च्या संबंधात चर्चा चालू असतानाच ह्या दलितांच्या वेदनांच्या स्फोटक आविष्कार करणाऱ्या ह्या कविता संग्रहाने मराठी साहित्यातील वाङ्मयीन मूल्यासंबंधी भाषेसंबंधीचे प्रश्न निर्माण केले असे नाही, तर मराठी-तील शब्दकोशांविषयी देखिल प्रश्न निर्माण केले आहेत. आणि म्हणूनच दलित साहित्याच्या संदर्भात जशी नव्या समीक्षेची गरज आहे तशी शब्दकोशाची देखिल आहे. याचे आणखी एक उदाहरण म्हणजे प्र. ई. सोनकांबळे यांचे 'आठवणींचे पक्षी' या शीर्षकाखाली प्रसिद्ध झालेले ललित लेख. गावकुसाबाहेर राहून अनुभव घेतलेले कितीतरी जीवघेणे प्रसंग आणि आठवणी त्यांनी अस्सल 'महारी' भाषेत मांडले आहेत. अस्पृश्य जातीत जन्मलेल्या व्यक्तीचे बालपण किती खडतर आणि लाचार असते याचे हृदयस्पर्शी पण तितकेच प्रत्ययकारी दर्शन सोनकांबळे घडवितात. श्रीनिवास कुलकर्णी ह्यांनी त्यांच्या 'डोह' मधील ललित लेखांतून जे बालपणाचे दर्शन घडविले आहे. जी निसर्गाची वेगवेगळी मनोहर दृश्यें त्यांना दिसली. तशी दृश्यें किंवा निसर्ग सोनकांबळ्यांच्या लेखात सापडत नाहीत. जगण्याच्या संघर्षात हरवून बसलेले त्यांचे बालमन निसर्गाच्या विविध रूपाकडे कसे ओढले जाणार? जर एखाद्या उच्चभ्रू समीक्षकाला या संघर्षाची कल्पना नसेल. त्या अनुभवातील भाषेतील कंगोरे शोधता आले नाही. तर त्या कलाकृतीची तो समीक्षा कशी करणार! जर कलाकृतीची मूळ प्रकृतीच आकळली नाही तर त्या कलाकृतीतील लय, तिच्या अनुभवाचा घाट, तिचा आकृतिबंध अनुभवाची प्रसरणशीलता इत्यादी, .... इत्यादींचे कसे आकलन होणार! ग्रेसच्या कवितेत पडणारे 'परदेशी बर्फ' किंवा दि. पु. चित्रेच्या कवितेतील ग्रीक प्रतिमा समजावून घेण्यास आमचे समीक्षक जसा खटाटोप करतात तसाच प्रयत्न इथल्या मातीतून उमलणाले सामाजिक वास्तव आणि त्यांचा वाङ्मयीन आविष्कार समजावून घेतल्यास

दलित साहित्याच्या संदर्भात होणारे पुष्कळसे गैरसमज टाळता येतील. 'डोह' मध्ये आणि 'आठवणीचे पक्षी' यामध्ये कुठेतरी भिंत उभी असलेली दिसते. जाणिवेची पातळी, अनुभवाची पातळी, विचारांची पातळी, सामाजिक पातळी असे किती तरी थर ह्या भींतीत दिसतात. आणि मग कला ही वर्गातीत असते, तिच्यावर कुठचेही बंधन नसते या प्रचारातील ठिसूळपणा जाणवू लागतो. मराठी समीक्षकांनी ह्या साऱ्या जीवनाचा अनुभव घ्यावा आणि मगच समीक्षा करावी असे कुणी म्हणणार नाही. पण किमान भारतीय समाजव्यवस्था, जातीव्यवस्था, तिच्यातील अंतर्विरोध, खेडेगांवातील आर्थिक, सामाजिक चित्र भारतीय मन-संस्कृतीचा इ. गोष्टींचा अभ्यास करावा, किंबहुना भारतातील प्रचलित राजकारण समजावून घ्यावे म्हणजेच समाजशास्त्रीय अभ्यास करावा ही अपेक्षा केल्यास त्यात काही वावगे ठरणार नाही.

तर खेडेगावातील बदललेल्या आर्थिक चित्रामुळे दलितांची परवड आणखी वाढत होती. सधन श्रीमंत शेतकरी आणि त्यांच्या हातात असलेली नोकरशाही यांच्याकडून दलितांवर अत्याचाराची मालिका सुरू झाली होती. दलित, मग तो कधी अस्पृश्य म्हणून नागवला जात होता. कधी भूमिहिन शेतमजूर म्हणून नागवला जात होता. कधी कधी तो केवळ उच्चवर्णीय इच्छेखातर नागवला जात होता. शहरात देखिल भांडवलशाही अर्थव्यवस्थेची परिणती म्हणून बेकारांचे तांडेच्या तांडे वाढत होते. दिशाहीन फिरत होते. जिल्हा पातळीवर शाळा कॉलेजची संख्या वाढल्याने तिथेही सुशिक्षित दलित तरुण तयार झाला होता. हा ग्रामीण सुशिक्षित तरुण तिथल्या एकूण आर्थिक, सामाजिक राजकीय व्यवस्थेपासून दूर ठेवला गेला होता. ग्रामीण भागात काम करणाऱ्या डाव्या चळवळीतील कार्यकर्त्यांचा सहवास आणि परिस्थिती यामुळे सबंध व्यवस्थेचा अन्वयार्थ लावण्याची ताकद त्याच्यात आली होती. मुंबईत बाबुराव बागुल आपल्या अनेक तरूण दलित साहित्यिक मित्रासमवेत तास-तास दादरच्या इराण्याच्या हॉटेलात बसत त्यामध्ये दया पवार, अर्जुन डांगळे, नामदेव ढसाळ, ज. वि. पवार, उमाकांत रणधीर, रामदास, सोरटे, कोंडिबा थोरात, अर्जुन कसबे, प्रल्हाद चेंदवणकर इ. तरुण असत. बागुल तसे दलित श्रमिकांच्या चळवळीत प्रत्यक्ष भाग घेतलेले लेखक. ते दलित चळवळीबद्दल आपले विचार मांडत. त्यांची विचारसरणी त्या वेळच्या तरुण दलित साहित्यिकांना प्रभावित करीत होती. सामाजिक अन्याय अत्याचाराच्या पार्श्वभूमीवर रिपब्लिकन पक्षातील सर्व गटांची निष्क्रियता जाणवत

होती. इतर डावे पक्ष तर सामाजिक प्रश्नांबद्दल त्यांच्या जन्मापासूनच उदासीन आहेत. त्या पक्षातील एखादी दुसरी व्यक्ती या प्रश्नांच्या मागे ठामपणे उभी राहताना दिसत होती. परंतु पक्ष म्हणून डाव्या संघटनांनी–पक्षांनी आपली संपूर्ण ताकद उभी केली नाही. आजही करीत नाहीत. या अन्यायाविरुद्ध केवळ प्रक्षोभक कविता लिहून भागणार नाही अशी भावना तरूण दलित साहित्यिकांत निर्माण झाली होती. बावड्याचे सामाजिक बहिष्काराचे प्रकरण गाजत होते. सिद्धार्थ कॉलेजातील वसतीगृहात राहाणाऱ्या विद्यार्थ्यांनी या विरुद्ध 'युवक आघाडी' नावाची एक संघटना काढली. यात तरुण दलित साहित्यिकही होते. एक मोर्चाही त्या वेळच्या मुख्यमंत्र्यांच्या निवास स्थानावर काढण्यात आला होता. परंतु आंदोलनाचे स्वरूप काय असावे या विषयावर मतभेद होउन युवक आघाडी फुटली. अमेरिकन निग्रो वाङमयाची व चळवळींची ओळख वाढली होती. आकर्षणही वाढत चालले होते. आणि यातूनच नामदेव ढसाळ, अर्जुन डांगळे, ज. वि. पवार या तरूण साहित्यिकांनी पुढाकार घेउन ९ जुलै १९७२ रोजी 'दलित पँथरची' स्थापना केली याच वर्षी 'साधना' साप्ताहिकाने स्वातंत्र्याच्या रौप्यमहोत्सवी वर्षानिमित्त एक खास दलित विशेषांक डॉ. अनिल अवचट यांच्या संपादनाखाली काढला होता. दलित पँथरने दलितांवरच्या अत्याचाराच्या निषेधार्थ हा स्वातंत्र्य दिन 'काळा दिन' म्हणून पाळला होता. मुंबईच्या भागाभागातून नामदेव ढसाळ यांच्या नेतृत्वाखाली पँथरचे जे काही त्यावेळी कार्यकर्ते होते ते काळे झेंडे घेउन फिरले. तर या 'साधने' च्या विशेषकांत दया पवार, प्रल्हाद चेंदवणकर जगदीश करंजगावकर (अर्जुन डांगळे), राजा ढाले इ. तरुणांचे जळजळीत लेख होते. साधनेतील ढालेचा लेख 'राष्ट्रध्वजा' बद्दल गाजला. महाराष्ट्रात एक वादळ उठले. 'दलित पँथरने ढाले व साधना' याना आपल्या पुऱ्या शक्तीनीशी पाठिंबा दिला. महाराष्ट्रातील दलित तरुणांना 'दलित पँथरची' ओळख झाली. आणि उभ्या महाराष्ट्रांत पँथर चळवळ पोहचली. अनेक वर्षे साठून राहिलेला असंतोष उफाळून बाहेर येऊ लागला होता. त्याला वाट मिळाली होती.

पँथरच्या चळवळीची जडणघडण तिची वैचारिक बैठक, भवितव्य या विषयी मला इथे चर्चा करावयाची नाही. मूळ मुद्दा असा की, दलित साहित्याच्या चळवळीतून दलित पँथरचा जन्म झाला. दलित पँथरचे नेतृत्व करणारी आणि तिला सहानुभूती मार्गदर्शन करणारी मंडळी बहुतांशी साहित्यिकच

होती, परिणामी सबंध महाराष्ट्रात आपले अनुभव आपले विचार एका प्रक्षोभक भाषेत मांडण्याची लाट उसळली आणि पुन्हा एकदा दलित चळवळ दलित साहित्य, भाषा इत्यादीच्या संदर्भात वैचारिक वणवा महाराष्ट्रांत पेटला गेला. साहित्यिकांनी मिळून चळवळीत सक्रिय होऊन नेतृत्व करावे ही भारतातील पहिलीच घटना असावी.

'अस्मितादर्श' या त्रैमासिकाने लेखक मेळावे भरविण्यास सुरुवात केली होती. या मेळाव्यातून चर्चा, परिसंवाद कविसंमेलन भरविले जात होते. याच काळात केशव मेश्राम, चोखा कांबळे, दया पवार, गंगाधर पानतावणे, वामन कर्डक इत्यादिंच्या कलाकृती प्रसिद्ध झाल्या होत्या. या सगळ्यामुळे दलित साहित्याला बळ मिळत होते. त्याच्यातले अनेक पैलू स्पष्ट होत जात होते. केशव मेश्राम यांचे 'हकिकत व जटायू' हे दोन दीर्घ कथांचे पुस्तक व दया पवार यांचा 'कोंडवाडा' हा कविता संग्रह ही महत्वाची पुस्तके होत. स्वतः दया पवारांनी 'कोंडवाड्याला' लिहिलेली प्रस्तावना ही अत्यंत अनुभवसिद्ध असून चळवळींतील वळणे दाखविणारी आहे.

या काळात कथा, कविता जशी फुलत होती त्याचप्रमाणे वैचारिक आणि समीक्षात्मक लिखाणाची प्रवृत्ती देखिल वाढत होती. डॉ. भाऊ लोखंडे, दया पवार, राजा ढाले, प्रा. रावसाहेब कसबे, प्रा. केशव मेश्राम, अर्जुन डांगळे, प्रा. रत्नाकर गणवीर, ताराचंद खांडेकर, प्रा. गंगाधर पानतावणे, प्रा. यशवंत मनोहर, प्रा. मा. फ. गांजरे ही त्यातली काही नावे होत. पैकी प्रा. गंगाधर पानतावणे यांचा परिक्षणात्मक स्वरूप असलेला 'मूल्यवेध' नावाचा समीक्षाग्रंथ प्रसिद्ध झाला आहे.

१९७२ ते १९७६ हा काळ दलित साहित्य चळवळीच्या दृष्टीने अनेक अर्थानी महत्वपूर्ण असा आहे. 'मागोवा' सारखे मासिक अतिडाव्या टोकाला जाऊन बंद पडले होते. 'अस्मितादर्श' ने उजव्या टोकाकडे सुरुवात केली होती. दलित पँथरच्या चळवळीतील फुटीची परिणती दलित साहित्य चळवळीत तणाव व अंतर्विरोध निर्माण करण्यात झाली. परंतु ह्या अंतर्विरोधाची बैठक वैचारिकतेपेक्षा वैयक्तिक द्वेषावरच उभारलेली दिसते. आंबेडकरवाद विरुद्ध मार्क्सवाद हा तणाव ताणण्यात आला. हा नसलेला वाद हितसंबंधीयाकडून एक डाव म्हणून लढविण्यात आला. परंतु नामदेव ढसाळ, बाबुराव बागूल, दया पवार, डॉ. वानखडे, प्रा. रावसाहेब कसबे यांची सर्जनशीलता व त्यांनी

आंबेडकरी तत्वज्ञानाची पटवून दिलेली व्यापकता, त्याची सखोलता यामुळे 'वादग्रस्त' मंडळी मावळू लागली. या मंडळीना पूरक असलेला एक अ-साहित्यिक गट 'दलित साहित्य विरुद्ध बौद्ध साहित्य' असा नवा वाद घेऊन पुढे आला. त्यांच्या मते आम्ही आता दलित नाही, आम्ही बौद्ध झालो आहोत म्हणून बौद्ध साहित्य निर्माण करू या'. परंतु या मंडळीनी 'बौद्ध साहित्य' म्हणजे काय नेमके हे केव्हाही सांगितले नाही. अर्थात् सर्जनशीलतेचा अभाव व निर्मितीशून्य प्रचार त्यामुळे हे तथाकथित 'बौद्ध साहित्यिक देखिल प्रभावहीन ठरले.

देशातल्या राजकीय अस्थिर परिस्थितीतून आणीबाणीचा जन्म झाला. वर्तमानपत्रे, नियतकालिके यांच्यावर लिखाणाच्या संदर्भात बंधने आली. लेखन सेन्सॉर होऊ लागले. कुठचेही सरकार आपले सरकार टिकवू पाहते. मग ते पुरोगामी असो वा प्रतिगामी असो किंवा अन्य कोणतेही असो. या आणीबाणीच्या पार्श्वभूमीवर कऱ्हाड येथे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन झाले. संमेलनाच्या अध्यक्ष या नात्यानी श्रीमती दुर्गा भागवत यांनी विचारस्वातंत्र्याचा व लेखन स्वातंत्र्याचा जोरदार उच्चार केला. दुर्गाबाई ह्या त्यांच्या निर्भयतेबद्दल अभिनंदनास निश्चितच पात्र आहेत. या बाबतीत मला एक प्रश्न उपस्थित करावासा वाटतो की, दुर्गाबाईनीं आतापर्यंत जे लिखाण केले आहे त्यात त्यांनी कधी जनतेच्या राजकीय, सामाजिक चळवळींचा विचार केलेला नाही आपली अमुक तत्वज्ञानाशी बांधिलकी आहे असेही कधी सांगितले नाहीं. राजकीय किंवा सामाजिक प्रक्षोभातून एखादा लेख लिहिलेला नाही. म्हणजे त्यांच्या लिखाणाचे स्वरूप निखळ वाङमयीन, संशोधनपर किंवा भाषांतरित स्वरूपाचे आहे. भारतात कोणत्याही विचाराचे, पक्षाचे सरकार आले तरी त्यांच्या त्या लिखाणावर बंदी घातली जाणार नाही. इतके ते निरुपद्रवी आहे. मग दुर्गाबाईनी लेखनस्वातंत्र्य, विचार स्वातंत्र्य यांचा जोरदार उच्चार का करावा! दुर्गाबाईंची खाजगी मते पुरोगामी आहेत की मार्क्सवादी आहेत की हिंदुत्ववादी आहेत, कीं अहंवादी आहेत हे मला माहित नाही. माझ्या सांगण्याचा उद्देश हाच की, भोवतालच्या राजकीय, सामाजिक परिस्थितीचा घटनांचा, राजकारणाचा परिणाम हा कलावंतावर होणे अपरिहार्य व अटळ असते. साहित्याचे क्षेत्र संपूर्णपणे स्वायत्त असते हा विचार किती खोटा आहे हे यावरून दिसून येते. दुर्गाबाईंच्या विद्वतेबद्दल मला पूर्ण आदर आहे. केवळ माझा मुद्दा स्पष्ट व्हावा म्हणून त्यांचा संदर्भ घेतला इतकेच. तर महत्त्वाचा मुद्दा हा की, कलावंताला राजकीय, सामाजिक मते ही असतात.

कारण तो देखिल इतरांसारखा प्रथम माणूस असतो. फक्त काही कलावंत त्याचा आपल्या साहित्याशी संबंध आणीत नाहीत. केवळ कल्पनाशक्तीच्या जोरावर त्यांची अव्याहत साहित्यनिर्मिती चालू असते. कऱ्हाडच्या साहित्य-संमेलनात श्री. जयप्रकाश नारायण यांच्या प्रकृतीला आराम पडावा म्हणून प्रार्थनेचा आदेश देण्यात आला, अध्यक्षीय भाषणात महाराष्ट्रातील विचारवंत, समाज सुधारक यांच्या यादीतून बाबासाहेब आंबेडकरांचे नाव गाळण्यात आले. ह्या गोष्टी जरी साहित्य संमेलनाच्या व्यासपिठावरून घडल्या असल्या तरी त्यांचा कार्यकारणभाव कोणत्याही वाङमयीन मूल्यांनी समजावून घेता येणार नाही. त्यासाठी राजकीय व सामाजिक मूल्येच परिमाण म्हणून वापरावी लागतील.

याच्या पाठोपाठ नागपूरला ऐतिहासिक दलित साहित्य संमेलन जानेवारी १९७६ ला पार पडले. संमेलनाध्यक्ष डॉ. म. ना. वानखडे यांनी जेव्हां दलित, पिडीत, शोषितांचे उत्थान, विचारस्वातंत्र्य, मराठी साहित्य यावर आपले सडेतोड विचार मांडले, तेव्हां त्यात काहिना राजकीय वास आला. म्हणजेच जेव्हां दलित साहित्यक जेव्हां आपली काही ठाम मते मांडतो तेव्हां त्याकडे संशयाने पाहिले जाते. त्यांच्यावर शिक्के बसू लागतात. हाच नियम इतरांच्याही बाबतीत कां लागू केला जात नाही?

नागपूरचे दलित साहित्य संमेलन अनेक अर्थांनी गाजले. डॉ. वानखडे यांचे अध्यक्षीय भाषण व बाबुराव बागुल यांचे उद्घाटकीय भाषण दलित साहित्य चळवळीचा ठाम आणि निश्चित विचार सिद्ध करतात या संमेलनातून निष्पन्न झालेल्या दोन विधायक गोष्टी म्हणजे, 'दलित साहित्य संसद' या महाराष्ट्रव्यापी संस्थेचा जन्म व डॉ. मधुकरराव वासनिक व डॉ. प्रा भाऊ लोखंडे यांच्या संपादनाखाली निघालेले 'निकाय' हे द्वैमासिक होय.

१९७६–७७ ही वर्षे दलित साहित्याला व चळवळीला वाहिलेल्या नियतकालिके – अनियतकालिकांच्या प्रकाशनाने व दलित साहित्यिकांच्या कलाकृतींच्या प्रकाशनाने गाजलेली म्हणावी लागतील. 'निकाय' हे द्वैमासिक सुरू झालेच होते. या काळात आणखी सुरू झालेली नियतकालिके म्हणजे औरंगाबादहून प्रा. अविनाश डोळस यांच्या संपादनाखाली निघालेले 'अस्तित्व' हे द्वैमासिक, नागपूरहुन 'मुक्तीवाहिनीच्या वतीने निघालेले 'प्रमेय', 'दलित क्रान्ती संसद' च्या वतीने निघालेले 'दलित क्रान्ती' ही त्रैमासिके, मुंबईहून

राजा ढाले हे संपादक असलेले 'जातक', ही मासिके होत. दलित साहित्य चळवळीला वाहिलेले पहिले अनियतकालिक म्हणजे नामदेव ढसाळ व ज. वि. पवार यानी सुरू केलेले 'विद्रोह' हे होय. या दोन वर्षात जन्माला आलेली आणखी अनियतकालिके म्हणजे प्रबोध करंदीकर व सुरेश कदम यांनी सुरू केलेले 'संसद' व अविनाश महातेकर यांचे 'समाज' ही होत.

या काळात प्रकाशित झालेली पुस्तके अनेक अर्थांनी महत्वाची अशी आहेत. बागुलांच्या जेव्हां मी जात चोरली होती' ह्या कथा संग्रहाच्या दुसऱ्या आवृत्तीचे प्रकाशन, प्रा. रत्नाकर गणवीर यांनी संपादित केलेले 'बहिष्कृत भारतातील अग्रलेख' ही दोन महत्वाची पुस्तके होत. पुस्तकांच्या निमित्ताने लिहिलेले बागुलांचे 'स्वागत' व गणवीरांची प्रस्तावना त्यांच्या अभ्यासू व वस्तुनिष्ठ प्रवृतींची निदर्शक आहे. गेल्या काही वर्षात जे दलित कवी सातत्याने कविता लेखन करीत होते त्यापैकी बऱ्याचशा कवींचे कविता संग्रह प्रकाशित झाले. ती अशी, त्र्यंबक सपकाळे यांचा 'सुरुंग' प्रल्हाद चेंदवणकरांचा 'ऑडिट' ज. वि. पवार यांचा 'नाकेबंदी', अर्जुन डांगळे यांचा 'छावणी हलते' आहे, नामदेव ढसाळ, यांचे तिसरे दीर्घ कवितेचे पुस्तक 'आमच्या इतिहासातील एक अपरिहार्य पात्र : प्रियदर्शिनी', हा कविता संग्रह हे होत. याशिवाय प्रा. पानतावणे यांनी 'विद्रोहाचे पाणी पेटले आहे' या पुस्तकाद्वारे दलित प्रज्ञावंताचा परिचय करून दिला आहे. काही पुस्तके प्रकाशनाच्या मार्गावर आहेत. ती सर्व पुस्तके दलित साहित्य चळवळीची दृढता आणि एकूण प्रवाह समृद्ध करणारी आहेत

मध्यंतरी म्हणजे नागपूरच्या, 'दलित साहित्य संमेलनानंतर' 'अस्मितादर्शचा जनक कोण' हा वाद माजविण्यात आला. पुणे, औरंगाबाद, नागपूर येथील वृत्तपत्रांतून तो बराच गाजला. या निमित्ताने 'अस्मितादर्श' चे एक माजी संपादक वामन निंबाळकर यांनी 'अस्मितादर्शची नऊ वर्षे' ही पुस्तिका प्रकाशित केली आहे. त्यांच्या ह्या पुस्तकीने बऱ्याच घटनांवर प्रकाश टाकला आहे. तसेच महाडच्या सत्याग्रहाच्या सुवर्ण महोत्सवानिमित्त अनेक पुस्तिका, स्मरणिका प्रकाशित करण्यात आल्या. त्यापैकी महाडच्या सत्याग्रहाचे संघटक दिवंगत कॉ. आर. बी. मोरे यांच्या 'महाडच्या दोन ऐतिहासिक परिषदा' ह्या लेखांचे पुस्तिकेच्या स्वरूपात पुनर्मुद्रण हे होय. या व्यतिरिक्त या काळात घडलेल्या दोन महत्वाच्या घटना म्हणजे 'दलित साहित्य संसद' मुंबईच्या वतीने जानेवारी १९७७ मध्ये लोणावळ्याला दोन दिवसांचे दलित साहित्य-

कांचे एक चर्चा शिबिर भरविण्यात आले होते. जवळ जवळ पन्नास साहित्यिक उपस्थित असलेल्या या चर्चा शिबिरात 'दलित साहित्यातील अंर्तविरोध, 'लोकसाहित्य' या विषयावर महत्वपूर्ण चर्चा झाली. या शिबिरांचा विशेष म्हणजे अनेक नव्यानेच लिहू लागलेल्या लेखक कवींनी दलित साहित्यातील अनिष्ट प्रवाहावर बोट ठेवून आपली मते ठामपणे मांडली साहित्य संमेलनात होणारा उत्सव इथे नसल्यामुळे सगळयांना मुक्त चर्चा केल्याचे समाधान मिळाले.

दलित साहित्याचे वेगळेपण लक्षांत घेऊन गेल्या चार-पांच वर्षात 'महाराष्ट्र टाईम्स, ' टाईम्स ऑफ इंडिया 'सारिका' माय मराठी' सिंहगर्जना या नियत कालिकांनी विशेषांक काढले आहेत.

बाबासाहेबांनी मुंबईत स्थापन केलेल्या 'सिद्धार्थ कॉलेज' ची स्थापना व त्यातून शिकून तयार झालेली दलितांची तरूण पिढी म्हणजे साधारणतः १९५० ते १९७७ च्या मध्यापर्यंतच्या कालखंडाचा हा धावता आढावा. हा आढावा घेत असताना दलित साहित्याचा किंवा साहित्यिकांचा इतिहास लिहिणे, हा हेतू नजरेसमोर नाही किंवा नव्हता तर दलित साहित्य चळवळीतील टप्पे, त्या टप्प्यांच्या अनुषंगाने येत गेलेली वैचारिकता, तिला आलेली गती, तिची भूमिका चळवळीतील अंर्तविरोध हे सर्व स्पष्टपणे मांडून दलित साहित्य चळवळीचा संपूर्ण तोंडावळा समजण्यास मदत व्हावी हाच हेतू होता. शिवाय हा आढावा या पुस्तकांतील लेखांच्या संदर्भात किंवा त्यांचा अभ्यास करताना उपयोगी पडावा हे देखिल नजरेसमोर होते. हे टप्पे स्पष्ट करीत असताना काही बारीकसारीक तपशील राहून गेल्याची शक्यता नाकारता येत नाही. राहून गेलेला संदर्भ किंवा तपशील नजरेला आला किंवा आणला गेला आणि जर तो चळवळीच्या संदर्भात यथार्थ असेल तर पुढे मागे संधी मिळाल्यास त्याची दखल निश्चितच घेतली जाईल.

या पुस्तकात समाविष्ट केलेले लेख हे मुद्दाम पुस्तकांसाठी लिहवून घेतले नाहीत. हे वेळीवेळी ज्या ज्या नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले किंवा ज्या वेळी मेळावे, साहित्य संमेलने झाली व त्यातून जी चर्चा, भाषणे, परिसंवाद झाले ते त्याच स्वरूपात दिले गेले आहेत. दलित साहित्याविषयी विपुल लेखन झाले आहे. निव्वळ प्रतिक्रियात्मक, दलित साहित्याला केलेला काल्पनिक विरोध, किंवा काल्पनिक स्तुती, अशास्त्रीय एकांगी चिकित्सा, व्यक्तिद्वेषातून आलेले आक्रस्ताळीपण या सारखे गुणविशेष लाभलेले लेख कटाक्षाने टाळले आहेत. याचा

अर्थ असा नव्हे की, जे लेख यात समाविष्ट केलेले नाहीत ते सर्वच वरील प्रमाणे आहेत. प्रा. केशव मेश्राम, डॉ. प्रा. भाऊ लोखंडे, ताराचंद खांडेकर प्रा. गंगाधर पानतावणे, प्रा. रावसाहेब कसबे, प्रा. ल. बा. रायमाने, राजा ढाले डॉ. डी. टी. माने इ. दलित विचारवंत समिक्षकांनी लेखाद्वारे जे विचार मांडले आहेत त्यांत या सर्वांची साहित्य समाज-विषयक खोल जाणिव दिसून येते.

संकलन करीत असताना आटोपशीर बांधीवपणा, पुनरुक्ती टाळणे, दलित साहित्य चळवळ एकांगी न मांडता सर्वांगीण स्वरुपात मांडणे इत्यादी गोष्टींचा निश्चितच विचार केला आहे. तरी यात विचारांची पुनरावृत्ती झालेली आढळेल याचे कारण म्हणजे वर सांगितल्याप्रमाणे मुद्दाम लेख किंवा भाषणे लिहवून घेतले नाहीत.

या पुस्तकांतील लेख, परिसंवाद किंवा भाषणे यांचा अभ्यास केल्यास साधारणतः दलित साहित्याच्या संदर्भात पुढील गोष्टींचा विचार केलेला दिसून येईल.

(१) भारतीय समाजव्यवस्थेतील अस्पृश्यता आणि तिचे सामाजिक, सांस्कृतिक परिणाम.
(२) महाराष्ट्रातील डॉ. आंबेडकरांची चळवळ व इतर चळवळी.
(३) अस्पृश्यानी केलेला बौद्ध धर्माचा स्वीकार.
(४) मराठी साहित्य परंपरेत दलित साहित्य.
(५) दलित साहित्याची आवश्यकता, वेगळेपण व त्या अनुषंगाने वेगळया साहित्य संस्था मासिके व संमेलने यांची गरज.
(६) दलित म्हणजे कोण ?
(७) नवी समीक्षामूल्यें आणि सौंदर्य मूल्यें.
(८) नवीन पुराण कथा.
(९) अनुभवातील आविष्कारातील तोच तोच पणा.
(१०) कलात्मक तटस्थता.
(११) साहित्य आणि समाजक्रान्ती.
(१२) दलित साहित्य आणि निग्रो साहित्य.
(१३) बुद्ध-मार्क्स-आंबेडकर यांचे तत्वज्ञान.
(१४) दलित साहित्य अलगतावादी नाही. मराठी साहित्य प्रवाहाचाच एक प्रवाह आहे.

दलित साहित्य निर्मितीची प्रक्रिया जोरदारपणे सुरू आहे. शरच्चंद्र मुक्तिबोध म्हणतात त्या प्रमाणे दलित साहित्य ही निर्मितीशील व सर्जनशील कलावंताची चळवळ आहे. ह्या प्रक्रियेच्या काळात ह्या सर्जनशीलतेने सशक्त वाट चोखाळायला हवी. आणि म्हणूनच ह्या चळवळीतले बळ कायम टिकवून धरायचे असेल पुढील काही गोष्टींचा विचार या संदर्भात व्हायला हवा

(१) दलित साहित्याच्या नावाखाली अतिशय आक्रस्ताळी, बटबटीत भाषेत सामाजिक अन्याय अत्याचाराच्या कथा मांडल्या जातात. कवितेच्या संदर्भात हे विशेषत्वाने जाणवते. नागपूरच्या दलित साहित्य संमेलनातील कवि संमेलनाचा अध्यक्ष म्हणून मला आणि इतर सर्व प्रतिनिधींना जो 'काव्यानुभव' आला तो फारच विषण्ण करणारा होता.

(२) दलित साहित्याची चळवळ ही केवळ (नव) बौद्धांचीच न राहता तिची व्यापकता वाढायला हवी.

(३) एखादी कथा किंवा कविता एखाद्या वादात बसविणे.

(४) दलित जीवनातील अनुभवांची भावनात्मक प्रतिक्रिया व्यक्त व्यक्त करताना तिच्या अनेक पातळ्यांच्या संदर्भात तिचा आविष्कार होणे जरूर आहे.

(५) दलित साहित्यातील क्रांतिकारक जाणीव ही वैश्विक साहित्यातील क्रान्तीकारक जाणिवेशी जोडली जाणे अत्यावश्यक आहे.

(६) दलित साहित्याचा केंद्र बिंदु हा शोषित पिडित असा माणूस म्हणजे सामान्य माणूस आहे. दलित साहित्यिकाने स्वतःला वेगळे समजणे म्हणजे सामान्यजनांपासून स्वतःला अलग काढून शाब्दिक भुसा काढण्याचे प्रकारही ह्या काळात घडलेले आहेत. हे टाळण्यासाठी आपण लेखक आहोत, या बरोबर आपण सामान्य माणसांपैकी एक आहोत ही भावना सतत जागृत ठेवली पाहिजे. म्हणजेच 'पोज घेणे' टाळले पाहिजे.

वर उपस्थित केलेले मुद्दे कुणाला फारच 'कलावादी' वाटण्याचा संभव आहे. परंतु ते तसे नाहीत. साहित्य आणि समाज याचे अतूट नाते असते. समाजपरिवर्तनाच्या संदर्भात जर आपण साहित्याचा विचार केला तर आपणाला असे दिसून येईल की, समाजपरिवर्तनाचे एकमेव माध्यम किंवा साधन म्हणजे साहित्य नव्हे. ते अनेक माध्यमांपैकी एक माध्यम असू शकते

प्रत्येक माध्यमाची स्वतःची अशी अंगीभूत ताकद असते. जिवंत साहित्यातून जीवनमुल्यांचा प्रचार होणे अपरिहार्य असते. आणि हा प्रचार साहित्यातून अधिक ताकदवान करावयाचा असेल तर त्या माध्यमाची अंगीभूत ताकद ही नेमकी कशांत आहे याचा नेमका विचार केला नाही तर, त्या माध्यमाचा परिणामकारक वापर करता येणार नाही. केवळ साहित्यामुळे क्रांती होते हा निव्वळ भ्रम आहे. क्रान्तीसाठी क्रान्तीकारी तत्वज्ञान, चळवळ व क्रांतीकारी समूह असावे लागतात.

सुरुवातीला जे मुद्दे मांडले गेले आहेत त्यापैकी दुसऱ्या व तिसऱ्या मुद्यांचा विस्तार करण्याची गरज आहे असे मला विचारपूर्वक वाटते. याचे महत्वाचे कारण म्हणजे हे दोन प्रश्न जसे दलित साहित्य चळवळ व तिच्या भवितव्याशी निगडित आहेत तसेच दलित चळवळीशी देखिल आहेत. इथे फक्त साहित्याच्या संदर्भात त्याचा विचार करू या.

पैकी पहिला जो मुद्दा आहे, म्हणजे, दलित साहित्य चळवळ ही केवळ (नव) बौद्धांचीच होऊ न देता तिची व्यापकता वाढवायला हवी. हा जो प्रश्न निर्माण झाला आहे तो कुणाच्या वैचारिक क्षयातून किंवा एकांगी भूमिकेतून उद्‌भवला नाही. त्याचे मूळ राजकीय आणि सामाजिकही आहे. कसे ते आपण पाहू या.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्रात अस्पृश्यांचा मानवमुक्तीचा लढा झाला. संख्येने अधिक व संघटीत अशी अस्पृश्यातील मोठी जमात म्हणजे महार समाज. हा समाज बाबासाहेबांच्या पाठिमागे निष्ठेने उभा राहिला. मांग, चांभार, ढोर, विमुक्त भटक्या जातीजमाती हे अस्पृश्यांतील घटक बाबासाहेबांच्या चळवळीपासून दूर राहिले. या त्यांच्या अलगपणाचे एक मूळ महात्मा गांधीच्या नेतृत्वाखाली वाढत असलेल्या राष्ट्रीय चळवळीमध्ये व त्यांच्या दलितोध्दाराच्या कार्यात सापडेल तर दुसरे इथल्या समाजव्यवस्थेने निर्माण केलेल्या अस्पृश्य समाज घटकांतील अंतर्विरोधात सापडेल. तर बाबासाहेबांच्या चळवळीतील क्रांतिकारी ताकद घेऊन आलेला व वाढलेला बौद्ध समाज (पूर्वीचा महार) जीवनातील अनेक क्षेत्रात तो आपले स्वत्व घेऊन अभिमानाने झळकू लागला. साहजिकच महाराष्ट्रात जो सांस्कृतिक संघर्ष झाला, त्यात बौद्ध तरुणच आघाडीवर राहिला. बाबासाहेबांनी केलेल्या बौद्ध धम्माचा स्विकार ही दलितांच्या जीवनातील एक क्रान्तिकारी

परिवर्तन होते. त्यांच्या सामाजिक सांस्कृतिक जीवनात, मनोरचनेत झालेला बदल हा विलोभनीय होता. परंतु सगळयाच अस्पृश्यातील घटकांनी बौद्ध धर्माचा स्विकार केला नाही ही दुर्दैवाची गोष्ट आहे. आजही दलित साहित्याच्या चळवळीत एक दोन नावे सोडली तर प्रामुख्याने बौद्ध समाजातीलच लेखक कलावंत आढळतील. यामुळे आज जे दलित साहित्य आहे हे जितके व्यापक व्हायला हवे तितके तो होत नाही. व्यापकता अर्थात् भूमिकेच्या दृष्टीने नव्हे. दलित साहित्याची व्यापक भूमिका ही वेळोवेळी मांडली गेली आहेच, परंतु माझी व्यापकता ही अनुभवाच्या संदर्भात आहे. चांभार, मांग, ढोर, होलार, भटके, नंदीवाले, उचले रामोशी, भिल्ल, आदिवासी इत्यादी दलित घटक आहेत. त्यांचेही जीवन, अनुभवविश्व मानसिकता दलित साहित्यात चित्रित केली पाहिजे. हे काम बौद्ध लेखकही करू शकतील. कारण सगळेच गावकुसाबाहेर राहणारे, अत्याचारित होणारे शहरातील झोपडपट्टयात किंवा अंधाऱ्या चाळीत राहणारे. परंतु आज या घटकांतून सुशिक्षित वर्ग तयार झाला आहे. त्यांनी हे काम केले पाहिजे. काही दोन चार अपवाद वगळता तो हे करतांना दिसत नाही. एकतर महारेतर दलित घटकांना क्रांतिकारी जाणिवा असलेले नेतृत्व लाभलेले नाही. जे लाभले ते सदासर्वकाळ शासन व्यवस्थेशी जमवून स्वतःसाठी काहीतरी मिळविण्याच्या घडपडीत रमलेले. साहजिकच बौद्ध तरुणांजवळ असलेली आक्रमक निर्भयता त्याच्याजवळ नाही. आज बौद्धेतर तरुणांनी न्यूनगंड न बाळगता आपला आवाज, आपली वेदना आपले जगणे शब्दबद्ध करून दलित साहित्य अधिक समृद्ध करावे.

दलित साहित्य चळवळीचे नेतृत्व आज जरी बौद्ध समाजाकडे असले तरी या चळवळीचे अग्रणी व आजच्या सर्व दलित साहित्यिकांना आदरणीय वाटणारे दिवंगत अण्णा भाऊ साठे हे मातंग समाजातीलच होते. अण्णा भाऊ सारख्या वर्गलढयावर नितांत श्रद्धा असलेल्या कलावंताला असे जातीत बसविणे मला इष्ट वाटत नाही. परंतु सांगण्याचा मुद्दा असा की, आजच्या दलित साहित्यिकांजवळ व्यापक संदर्भात विचार करण्याची दृष्टी आहे. अर्थात् बौद्ध धर्माचा अतिरेकी अभिमान बाळगून इतरांना तुच्छ लेखणारा एक गट जसा बौद्धात आहे, तसा तो बौद्धांच्या बाबतीत बौद्धेतरांत देखिल आहे. परंतु साहित्य व सर्जनशीलतेच्या संदर्भात अशा ह्या पूर्वग्रह दूषित दृष्टीचा जास्त विचार केला नाही तरी चालेल. कारण ह्यात गंभीरता किंवा वैचारिकता नाही. वर मांडलेल्या मुद्याविषयी दलित साहित्यिक, दलित साहित्य संस्था,

प्रकाशन संस्था व बौद्धेतर सुशिक्षित तरुण यानी विचार करणे आवश्यक आहे असे मला वाटते.

दलित साहित्याच्या संदर्भात आज आणखी एक खटाटोप काही लोक करतांना दिसतात. याची सुरुवात, दलित पँथरमध्ये ज्या वेळी आंबेडकर वाद हा आहे त्या स्वरूपात मांडायचा म्हणजे व्यापक किंवा वर्गीय स्वरूपात मांडायचा कि तो विकृत करून जातीयवादी संकुचित स्वरूपाचा मांडायचा ह्या प्रश्नावर जेव्हां फूट पडली तेव्हां झालेली दिसते. एखादी कथा, कविता कलाकृती किंवा कलावंत हा मार्क्सवादी आहे हा, आंबेडकरवादी आहे. हा बौद्धवादी आहे अशा आरोपाच्या फैरी झडू लागल्या विशेषतः बाबूराव बागूल, दया पवार, अर्जुन डांगळे, नामदेव ढसाळ या लेखकांवर 'मार्क्सवादी' हे लेबल चिटकवून विकृत हल्ले होऊ लागले. बागुल व पवार यांचे लेख या पुस्तकात आहेत. ढसाळ, डांगळे यांनीही वेळोवेळी आपापली भूमिका मांडली आहे. या पुस्तकातील लेखात देखिल 'मार्क्सवाद व आबेडकर-वाद यांचा समन्वय झाला पाहिजे' ह्या विधानाच्या संदर्भात 'हा समन्वय कसा होऊ शकतो' ह्याबद्दल चिंताही व्यक्त केलेली दिसते. मला वाटते ह्या बाबतीत चिंताजनक होण्याचे काही कारण नाही. प्रचलित राज-कारणातील संदर्भ व घटना टाळून कलाकृतीच्या संदर्भात एखाद्या वादाचा तत्वज्ञान या दृष्टीने विचार केला आणि त्याच्याशी जवळीक दाखविली तर त्यात गैर जसे काही नाही. दलित साहित्याच्या संदर्भात केवळ आंबेडकरवाद, मार्क्सवाद किंवा बौद्ध धर्म यांच्या विषयीच वैचारिक घुसळण कां चालू आहे यांचाही विचार करणे आवश्यक आहे. गोळवलकर गुरूजी किंवा राम-स्वामी आयकर यांच्या तत्वज्ञानाबद्दल कां विचार केला जात नाही याचाही अन्वयार्थ लावला गेला पाहिजे. याचे उत्तर साधे आहे. दलित साहित्याचे प्रेरणास्तोत्र म्हणजे आंबेडकरवादाचा केंद्रबिंदू हा सामान्य माणूस आहे. जो शोषित, पिडित, दलित आहे. ज्यांचे सामाजिक, आर्थिक, धार्मिक, सांस्कृतिक शोषण केले गेले आहे असा हा माणूस आहे. मार्क्सवादाचा केंद्रबिंदु देखिल शोषित-पिडित असा सामान्य माणूस आहे. बौद्ध तत्वज्ञान देखिल माणसाचा व त्याच्या शोषणाचा विचार करते. या तत्वज्ञानात त्याकाळी होत असलेल्या शोषणाविरुद्ध व पिळवणुकीविषयी बंडखोर प्रतिक्रिया आहे. माणसाची महात्मता कशी वाढेल याचाच विचार त्यांनी सातत्याने केला आहे. स्थल-कालांनी निर्माण केलेल्या समाजव्यवस्थेच्या संदर्भात हे जरी वेगवेगळ्या स्वरूपात

दिसत असले तरी त्यांच्या तत्वज्ञानाचा गाभा हा एकच आहे आणि तो म्हणजे माणसाची शोषणापासून मुक्ती हा होय. दलित साहित्य देखिल शोषणाविरुद्ध आहे. ते मानवमुक्तीचा पुरस्कार करतांना दिसते. ही तीनही तत्वज्ञाने परस्पर-विरोधी अशी नसून परस्परपूरक अशीच आहेत. मी हे मांडत असतांना इथली मार्क्सवादी चळवळ आणि भारतीय मार्क्सवाद्यांची संस्कारीत मनोवृत्ती विचारात घेतलेली नाही. मार्क्सवादाचा मी एक शास्त्रीय तत्वज्ञान आणि समाजशास्त्र याच्यापुरताच विचार करीत आहे. एवढेच नव्हे तर या तिन्ही व्यतिरिक्त शोषणप्रक्रियेविरुद्ध लढणारे कुठलेही तत्वज्ञान किंवा विचार हा दलित साहित्य विचाराला पूरक असाच आहे. सर्जनशील कलाकृतीच्या संदर्भात तत्वज्ञानाचा विचार करतांना हे लक्षात ठेवले पाहिजे की, कलाकृतीत आपण तत्वज्ञानाची सूत्रे किंवा तपशील जशाच्या तसा मांडत नाही. त्या तत्वज्ञानाच्या किंवा विचाराच्या बांधिलकीने कलावंताच्या दृष्टीकोनाचा किंवा जाणिवेचा पिंड पोसला गेलेला असतो. त्यातून साकार झालेली निर्मिती ही वेगळ्याच स्वरूपात अवतरत असते. ह्या निर्मितीला स्वतःचे असे एक व्यक्तिमत्व असते. आणि हा जो निर्मितीच्या व्यक्तिमत्वाचा हत्ती आहे त्याला आंधळे आपापल्या कुवतीनुसार आजमावित असतात. जोपर्यंत आंधळ्यांना दृष्टी येत नाही तोपर्यंत हा घोळ चालूच राहणार. संपूर्ण हत्ती आणि त्याचे बळ हे त्यांच्या चाचपडणाऱ्या हातांना कसे उमजणार! ह्या संदर्भात उदाहरण अण्णा भाऊंचे उदाहरण विचारांत घेण्यासारखे आहे. अण्णाभाऊ हे दलित जातीत जन्मले आणि मार्क्सवादी विचार घेऊन वाढले. 'जग बदल घालूनि घाव, सांगून गेले मला भिमराव' हे लिहिणारे अण्णाभाऊ 'लाल झेंडा घेऊनि हाती कराधला इथे क्रांती' मजुरांची पिढी नवी पाऊल टाकीती ।। हे सुद्धा लिहितात. मग अण्णा भाऊंना आपण नेमक्या कोणत्या तत्वज्ञानात बसविणार आहोत?

आणि म्हणूनच दलित साहित्य निर्मितीच्या संदर्भात विचार करतांना आंबेडकरवादाचा जो गाभा आहे म्हणजे शोषणाविरुद्ध बंडखोर प्रतिक्रिया आणि मानवमुक्तीचा पुरस्कार या गाभ्याची त्या निर्मितीच्या व्यक्तिमत्वाची नाळ जोडलेली आहे की नाही हे पाहणे म्हणजे दलित साहित्य कृतीला न्याय देण्यासारखे होईल. सामाजिक क्रान्ती करू इच्छिणाऱ्या कलावंताने कोणत्याही क्रान्तीकारी तत्वज्ञानाकडे झापडबंद वृतीने पाहू नये. आणि तो जर तसा पाहत असेल तर त्याला क्रांतीचा नेमका अर्थ कळला नाही असे होईल.

दलित साहित्याची चळवळ ही निखळ साहित्यिक चळवळ नाही तर ती सांस्कृतिक देखिल आहे. गेली हजारो वर्षे ह्या समाजाला ज्ञानापासून वंचित करण्यात आले होते. लिहिण्याचा वाचण्याचा-बोलण्याचा त्याचा अधिकार हिरावून घेण्यात आला होता. धर्माच्या नावांवर त्याच्यावर घातली गेलेली 'सेन्सॉरशिप' ह्या शतकात थोडी ढिली झाली आहे. त्याचा परिणाम म्हणून आज तो लिहू बोलू लागला आहे. कलेची जी वेगवेगळी माध्यमे आहेत त्या माध्यमांचा वापर करून तो आपले भावजीवन इच्छा आकांक्षा आणि स्वप्नांना कलारूप देऊ लागला आहे. अर्थात् नाटक या माध्यमाचा पाहिजे त्या प्रमाणात स्विकार झालेला नाही. परन्तु दलित रंगभूमीचे स्वरूप काय असावे. यासंबंधी चर्चा व आराखडे तयार केले जात आहे. हे नाटक जेव्हां मराठी रंगभूमीवर येईल तेव्हां मराठी नाट्य हे अधिक समृद्ध आणि संपन्न होईल ह्यात शंका नाही. हे नाटक आजवरच्या मराठी नाटकांपेक्षा निश्चितपणे वेगळे असणार आहे. जगण्यासाठी आणि माणूसपणासाठी करराव्या लागणाऱ्या आत्यंतिक संघर्षामुळे त्याच्या दृष्टिकोनात आणि पांढरपेशीय दृष्टीकोनात मूलतः फरक आहे. आणि हा फरक त्याला जसा पारंपारिक साहित्यिक अभिरुचीपासून जास्त वेगळा करीत असतो. तसाच पारंपारिक रूढ अशा सांस्कृतिक जीवनापासून देखिल करीत असतो. म्हणूनच आजवरच्या सांस्कृतिक जीवनात जे एकारलेपण आहे ते दलित साहित्याच्या चळवळीमुळे आणि ती ज्या प्रमाणात वाढत जाईल त्या प्रमाणात ते कमी होण्याची शक्यता आहे.

आजवरच्या साहित्यिक सांस्कृतिक, चळवळीची सूत्रे सामान्यतः उच्चवर्णीयांच्या हातात होती. या सूत्रांशी तळगातील सामान्य माणूस बांधला गेला नव्हता. त्यांनी ठरवून दिलेले निकष किंवा मूल्ये हेच प्रमाण म्हणून मानले जात आहे. सामान्य माणूस आणि त्याचे प्रश्न साहित्यबाह्य ठरविण्यात आले होते. आजही या विचारांच्या मुशीतून तयार झालेली आपली समीक्षा पद्धती आणि समीक्षक पाहिले तर याचे प्रत्यंतर येते. उदाहरणासाठी आपण 'नटसम्राट' 'उध्वस्त धर्मशाळा' 'जुलूस' ही नाटके व 'सामना' हा चित्रपट घेऊ या. पैकी आमचे समीक्षक 'नट सम्राट'चे किंवा 'उध्वस्त धर्मशाळेचे' जेवढे उदात्तीकरण करतील तेवढे ते 'जुलूस' चे किंवा 'सामना' चे करणार नाहीत. कारण पहिल्यात बुद्धिमंतांची किंवा कलावंतांची शोकांतिका आहे तर दुसऱ्यात जनसामान्यांची शोकांतिका आहे. पहिला तात्विक, अध्यात्मिक व गूढ भाषेत बोलत असतो म्हणून तो आमच्या समीक्षकांना श्रेष्ठ वाटतो. अशा

भाषेत बोलणारानाच जीवनाचा अर्थ कळलेला आहे अशी त्यांची समजूत असते. तर दुसरा जमीनीवर पाय रोवून आपल्या भाषेत आपल्या दैनंदिन जीवनातल्या व्यथा सांगत असतो, म्हणून समीक्षकांना तो कमी दर्जाचा वाटत असतो. म्हणजेच एखाद्या कलाकृतीत बुद्धिमंताची शोकांतिका असेल तर ती कलाकृती श्रेष्ठ ठरविली जाते आणि जर एखाद्या कलाकृतीत सामान्य माणसांची शोकांतिका असली तर ती सामान्य ठरविली जाते हे जे समीक्षेचे सूत्र आहे ते साहित्याच्या व्याप्तीचा गळा आवळणारे आहे.

दलित साहित्य देखिल जनसामान्यांच्या शोषित, पिडितांच्या इच्छा आकांक्षाचे चित्रण करणारे साहित्य आहे आणि म्हणूनच सामान्य माणसाचा जगण्यासाठी चाललेला झगडा, त्याचे दैनंदिन प्रश्न त्याचा पदोपदी होणारा अपमान, त्याचे अनुभव आणि या सगळ्या घटनांकडे पाहण्याचा त्याचा जो दृष्टिकोन आहे त्या सर्वांचे प्रतिबिंब साहित्यात पडणे अपरिहार्य असेच आहे. अध्यात्म, गूढता आणि पारलौकिक आनंदावर तरंगणाऱ्या आजवरच्या मराठी साहित्याला लौकिक विषय हे साहित्यबाह्च आणि विशुद्ध कलेला बाधा आणतात असे वाटणे सहज स्वाभाविक आहे. लेखक हा प्रथम सामाजिक प्राणी असतो. एखाद्या घटनेकडे पाहण्याचा दृष्टिकोन आणि तिचा विविध अंगानी अन्वयार्थ लावण्याची विचारशक्ती त्याच्याजवळ असते. याचा विचारच कधी केला जात नव्हता. जेव्हां दलित साहित्य ह्या दाहक सामाजिक वास्तवांचा विचार करून त्यावर आक्रमक कडवट प्रतिक्रिया व्यक्त करते तेव्हां त्यावर भडक किंवा प्रचारी हा शिक्का मारला जातो. म्हणजेच एखादा लेखक कलावंत जनताभिमुख विचारसरणीला बांधील असतो, बदलाची मागणी करतो तेव्हा तो प्रचारकी ठरविला जातो. त्याला प्रचारकी ठरवितांना देखिल एक स्वतःची का होईना विचारसरणी असते. त्या विचारसरणीतूनच तो दुसऱ्यांना प्रचारकी ठरवित असतो. मूलतः सगळेच साहित्य हे प्रचारी असते. फरक एवढाच कुणी लेखकिय मूल्यांचा आग्रह धरतो तर कुणी जीवनमूल्यांवर अधिक भर देत असतो.

परंपरेच्या संदर्भात ह्या ग्रंथात समाविष्ट केलेल्या लेखातून आणि चर्चेतून दोन प्रवाह स्पष्ट दिसतात. परंपरेला संपूर्ण नकार हा दलित साहित्यिक विचारवंताचा प्रवाह, तर जे त्याज्य आहे ते टाकून द्यावे किंवा परंपरा नाकारू नये, ती नाकारताच येणे शक्य नाही हा दलितेतर साहित्यिक विचारवंताचा

दुसरा प्रवाह होय. ज्या वेळी दलितांकडून परंपरा नाकारली जाते, त्या वेळी असाही एक प्रश्न उपस्थित करण्यात येतो की परंपरा ही नाकारायची नसते तर ती समृद्ध करावयाची असते. या संदर्भात बाबुराव बागुलांनी 'माय मराठी' च्या दलित साहित्य विशेषांकात जी मुलाखत दिली आहे ती अत्यंत स्पष्ट आणि महत्वपूर्ण आहे.

परंपरा टिकवायची किंवा समृद्ध करावयाची म्हणजे नेमके काय करायचे हे समजून घेणे अत्यावश्यक आहे. एखादी परंपरा किंवा प्रवाह टिकतो किंवा समृद्ध होतो तो त्या परंपरेने स्वकारलेल्या विचारामुळे. वैचारिक तात्विक अधिष्ठान असल्याशिवाय कुठचीही परंपरा जन्मत नाही आणि जगत नाही परंपरेला हे अधिष्ठान मिळते ते तत्कालिन समाजव्यवस्था आणि भोवतालच्या परिस्थितीच्या घुसळणीतूनच मिळत असते. प्रस्थापित वर्ग किंवा शोषक वर्ग आपणाला सोयीची असलेली आपल्या वर्गीय संबंधाला धक्का न लागेल अशी परंपरा निर्माण करीत असतो आणि त्या परंपरेच्या खुंट्याला समाजातील इतर लहान सहान घटकांना जे पूर्णतया दुर्बळ असतात त्यांना बांधून ठेवले जाते. खरं म्हणजे आजवरच्या आपल्या परंपरा मग ती धार्मिक असो, साहित्यिक असो वा सांस्कृतिक असो ती मूठभर हितसंबंधीयांनी बहुसंख्याकांच्या माथी मारलेली आहे.

दलित साहित्यिकांनीं परंपरा स्विकारायाची किंवा समृद्ध करावयाची म्हणजे नेमके काय करायचे! संत कवींचा विठोबा घरोघर पोहचवायचा की पंडित कवींनी केलेली जेवणावळीची, राजे महाराजे यांची वर्णने करायची की तारे, फुले-वारे कातरवेळ ह्यात अडकून शाब्दिक कोलांटया मारायच्या की माणसाला जंतू किंवा नियतीच्या हातातले बाहुले मानायचे की मनो विशलेषणाच्या नावाखाली लैंगिक पिसाट वर्णने करायची? दलित साहित्याची वैचारिकता तिचा नकार, विद्रोह, विज्ञाननिष्ठ भूमिका आणि समाजशास्त्रीय दृष्टी विचारात घेतली तर मराठीत वेगवेगळया कालखंडात ज्या परंपरा किंवा प्रवाह जिवंत ठेवले गेले ते आपोआप गळून पडतात. सामाजिक प्रबोधनाच्या हेतूतून कविता लिहिणारे केशवसुत किवा हरिभाऊ सारखे कादंबरीकार यांच्यापर्यंत दलित साहित्य परंपरेचा धागा ताणत नेल्यास तो तुटण्याचीच जास्त शक्यता आहे.

खरं म्हणजे, इथे परंपरा हा शब्दच फसवा आहे. तिचा पोथीवाद बनत जाऊन स्थितिवादाचे ते एक लक्षण बनत जाते. ज्या वेळी

नव्या जाणिवा, नवी मूल्ये, नवे विचार रुजू पाहतात त्या वेळी ही परंपरेची ढाल पुढे करण्यात येते. ज्ञानेश्वरापासून मराठी साहित्याची परंपरा येथे मानणाऱ्यांपुढे नऊशे वर्षाचा कालखंड असतो, तर दलित साहित्यिक विचारवंत जेव्हां त्याच्या परंपरेचे वय शोधू लागतो, तेव्हां पन्नास-पाउणशेच्या पुढे गेलेले नसते. भारतात जेव्हां यंत्रयुग आले, नवे ज्ञानविज्ञान आले नवे आचार-विचार आले, क्रांतिकारक तत्वज्ञान घेऊन लढे झाले, चळवळी झाल्या, त्याच्यातील स्वत्व जेव्हां जागे केले तेव्हां हा दलित माणूस आपलीही काही परंपरा असते असे मानू लागला. नवी जीवनमूल्ये, सांस्कृतिक मूल्ये व सामाजिक मूल्ये जी कालसापेक्ष आहे, तिचा स्विकार करण्याच्या धडपडीस लागला. दलित साहित्यिक विचारवंताची नऊशे वर्षापासूनच्या मराठी साहित्य परंपराशी नाळ तोडण्याची भूमिका काहींना अलगतावादी वाटेल. पण मला वाटते, दलित साहित्यिक हे अलगतावाद जोपासत नाहीत. अलगतावाद जोपासत आली आहे आपली नऊशे वर्षाची परंपरा. जी थेट आणखी मागे कालिदासा-पर्यंत नेता येईल. मराठी समीक्षेत जो वैचारिक किंवा समाजशास्त्रीय दृष्टीचा अभाव आहे. त्यामुळे ह्या परंपरेत आणखी एक मजेदार प्रसंग आढळतो, काही मराठी समीक्षक सरळ ज्ञानेश्वर बालकवी-आरती प्रभू किंवा तुकाराम केशवसुत, मर्ढेकर अशी साहित्यिक परंपरा सांगून मोकळे होतात. ही परंपरा सांगत असताना ते फक्त वरवरची शब्दकळाच (dictions) नजरे समोर ठेवतात. ह्या परंपरेत काही विचारसूत्र आहे की नाही याचा विचारसुद्धा त्यांच्या मनाला शिवत नाही.

परंपरा नाकारण्याच्या दृष्टीतून दलित साहित्याला नवीन पुराण कथांची (myths) आवश्यकता आहे, असे दलित साहित्यिक प्रतिपादन करीत असतात. आजवरचा मराठी साहित्यापुढील किंवा समीक्षेपुढील समस्या आणि दलित साहित्य चळवळी पुढील समस्या यात मूलभूत असा फरक आहे. 'ज्ञानेश्वरी', 'स्मृतीचित्रे', 'रणांगण', 'कोसला' या पलिकडे मराठी समीक्षेचा विचार का जात नाही. पुन्हा पुन्हा 'रणांगणाभोवती का चकरा माराव्या लागतात. याचे कारण मराठी साहित्यिक आणि समीक्षक यांनी वास्तव जीवनाची साहित्याशी केलेली फारकत होय. साहित्यिक जसजसा जीवनाचा समाजशास्त्रीय दृष्टचा, भौतिकदृष्टचा विचार करत जाईल, त्या त्या प्रमाणात जीवनातील प्रश्न, त्यांचे भीषण स्वरूप, त्या विरुद्धचा संघर्ष, ह्या सर्वांचा आविष्कार साहित्यात होईल. यासाठी कलावंताने समाजमनाविषयी तुच्छता न बाळगता

आपुलकी दाखविली पाहिजे. आजचे मराठी साहित्य जीवनापासून दूर आहे किंवा वास्तवतेपासून दूर आहे हे म्हणत असतांना हे सांगायचे असते की, आजच्या साहित्यात मूठभरांचे चरित्र चित्रण, त्यांच्या इच्छा आकांक्षाचे कल्पनारम्य चित्रण आढळते. कल्पनारम्य या अर्थाने की आजचे मराठी लेखक हे बहुतेक मध्यमवर्गातले आहेत. सध्याच्या आर्थिक व्यवस्थेमुळे मध्यमवर्गासमोर देखिल अनेक प्रश्न उभे आहेत. कुटुंबसंस्था, ढासळत जाणारी मूल्ये, पदोपदी होणारा अपमान, अवहेलना, संघर्षाची भावना असे अनेक प्रश्न आहेत. दलित जीवनाच्या संदर्भात सोडून द्या निदान मध्यमवर्गीयांचे त्यांच्या भावभावनांचे, त्यांच्यात वाढू लागलेल्या संघर्षशील वृत्तीचे चित्रण किती प्रमाणात प्रामाणिक झालेले आहे. मध्यमवर्गातील अनेक तरूण आज क्रान्तिकारक चळवळीत आहेत. संघर्षात उभे आहेत. दलित आदिवासी शेतमजूरांमध्ये ते काम करताहेत. किती मराठी लेखकांनी त्यांना आपल्या कथा-कादंबऱ्यांचे नायकत्व दिलेले आहे? सांगायचा मुद्दा हा की आजचे बहुतेक मराठी साहित्य जीवनाशी समांतर नाही. तळगाळातील दुःखाचा, भोवतालच्या वास्तवाचा गंभीरपणे विचार केला जात नाही. या उलट दलित साहित्य हे जीवनाशी समांतर असे आहे. भोवतालच्या वास्तवाचा डोळसपणे विचार करते. आणि म्हणूनच इतिहासाकडेही पाहण्याची दलित साहित्यिकांची दृष्टी डोळस वस्तुनिष्ठ व समाजशास्त्रीय असते यातूनच दलित साहित्यिक समीक्षकांपुढे अनेक समस्या उभ्या राहतात आणि वर उल्लेखिलेले प्रश्न म्हणजे पुराणकथांचा (myths) उपस्थित होतो. नवीन पुराण कथांची आवश्यकता कां आहे? दलित साहित्य हे शोषणाच्या अत्याचाराच्या विरुद्ध आहे. शोषणव्यवस्थेने निर्माण केलेली सामाजिक मूल्ये ही जीवनामूल्ये मानून त्यानुसार वागणारा हा दलित साहित्याचा आदर्श कसा काय होऊ शकेल? डॉ. वानखडे यानी जे रामाचे उदाहरण दिले आहे ते योग्यच आहे. शंबूकाचा वध करणारा आणि सीतेचा त्याग करणारा राम हा दलित साहित्यिकांना (myths) म्हणून कसा काय परवडणार? या संदर्भात असा एक प्रवाह आहे की दलित साहित्यिकांनी बौद्ध धर्माचा अभ्यास करावा. त्यांचे चिंतन करावे आणि त्यातून myths शोधून काढाव्यात. आता इथे प्रश्न असा येतो की बाबासाहेबांनी विज्ञाननिष्ठ अशा भूमिकेतून बौद्ध धर्माचे विश्लेषण करून त्याचा स्विकार केला आहे. संपूर्ण बौद्ध वाङ्मय हे अशा प्रकारचे आहे काय? बुद्धाचा अनात्मवाद अनिश्वरवाद गतीवाद हे सगळे घेऊन बौद्धांचे सगळेच ग्रंथ पुढे जातात

काय ? खुद्द बाबासाहेब बुद्धवचन आणि त्यानंतरचा बौद्धधर्म यामध्ये फरक करतात. बुद्धानंतर बौद्ध धर्मात जे कर्मकांड आणि अनाचार माजला आणि त्याला पोषक असे जे वाङ्मय तयार झाले त्या वाङ्मयाचा स्विकार बाबासाहेब करीत नाहीत. दलित साहित्यिकांना करता येणार नाही. शिवाय जी प्राचीन भारतीय परंपरा आणि संकृती सांगितली जाते, तिच्याबद्दल अभिमान बाळगावा, ती परंपरा आपली आहे असे गोरवाने एखाद्या दलिताने सांगावे असे त्यात काही नाही. पुराणात, इतिहासात किंवा बौद्ध धर्मातून काही पुराणकथांचा स्विकार दलितांना थोडा फार करता येईल नाही असे मुळीच नाही. आणि म्हणूनच खऱ्या अर्थाने दलित साहित्याला आपल्या पुराणकथा उभ्या करावयाच्या असतील तर त्यांनी त्या आपल्या परंपरेत शोधणे अत्यावश्यक आहे. जिथे वर सांगितल्याप्रमाणे शंभरवर्षापलिकडे वय गेले नाही. म्हणजेच ज्या कालखंडात दलितांच्या मुक्तीचे लढे, झाले क्रांति कारक तत्वज्ञान घेऊन लढे झाले, लोकशाही समाजवादाचे तत्वज्ञान आले आणि क्रांतिकारक पुरुष झाले. पुराणांचा किंवा धार्मिक वाङ्मयाचा अभ्यास करण्याऐवजी क्रांतिकारी इतिहासाचे अध्ययन आणि चिंतन करून त्यातून नवीन myths शोधून काढणे हेच जास्त सयुक्तिक ठरेल.

दलित साहित्य चर्चेला ज्या वेळी तोंड फुटले त्या वेळी अनेक गैरसमज, आरोप आणि आडाखे बांधले जात होते. कुणाला तर हे जातीयवादाचे लक्षण वाटत होते. 'मराठवाड्यांच्या' परिसंवादात तर कोसलाकार भालचंद्र नेमाडे यांनी असे दालन (म्हणजे दलित साहित्याचे) मराठीत उघडण्याची शक्यता नाही असे स्पष्ट विधान केले होते. परंतु त्यांच्या ह्या विधानाचा फोलपणा सिद्ध झाला असून हे दालन मराठी साहित्यविश्व आणखी समृद्ध करीत आहे. त्याच प्रमाणे प्रा. वा. ल. कुलकर्णी 'ह्या लिखाणात बुजरेपणा आढळतो तो जावयास हवा' हे त्या काळी योग्य असलेले मत होते. आज दलित लेखकां-मधील बुजरेपणा निश्चितपणे गेलेला असून तो अगदी खुल्या मनाने व बेडर-पणे लिहित आहे. सुरुवातीच्या चर्चा, परिसंवाद वाचले म्हणजे मराराष्ट्रात जो एक नवदिक्षित बौद्धांचा वर्ग होता त्यांच्याच भोवती ही चर्चा घुटमळ ताना दिसते. याचे कारण मागे चर्चिले आहे. पुढे पुढे दलित विचारवतांची भूमिका व्यापक व विकसित झालेली दिसेल. त्यामुळे दलित साहित्य म्हणजे नेमके कोणते साहित्य याला आपोआप उत्तर मिळालेले आहे. दलित जातीत

जन्माला आलेल्याने लिहिलेले साहित्य म्हणजे दलित साहित्य कां ? की दलितांविषयी लिहिलेले साहित्य म्हणजे दलित साहित्य कां ? दलित साहित्याचा पुरस्कार करणाऱ्या विचारवंत, समीक्षकांनी अशी भूमिका कधीच घेतली नव्हती. भारतीय समाजातील जातीव्यवस्था अस्पृश्यतेसारखे तिचे भीषण स्वरूप, इथली शोषणव्यवस्था या सगळयांची जाणिव होऊन ती विरुद्धची कठोर प्रतिक्रिया म्हणजे दलित साहित्य. म्हणजेच दलित साहित्याच्या संदर्भात दलित ही एक जात नसून ती एक जाणिव आहे. समाजातील तळागाळतील अनुभवाशी, त्यांच्या सुखदुःखाशी, त्यांच्या संघर्षावर असीम श्रद्धा आणि निष्ठा बाळगणारी ही जाणिव समाजशास्त्रीय दृष्टिकोनामुळे अधिक प्रगल्भ आणि शास्त्रीय होत जाते. म्हणूनच ती विद्रोह, नकार आणि विज्ञाननिष्ठा या सूत्रांशी बांधली जाऊन ती अंतिमतः क्रांतिकारी होते. याच जाणिवेमुळे दलित जीवनाकडे बघण्याच्या एक वेगळा दृष्टिकोन येऊन दलित जीवनातील केवळ अनुभव न मांडता त्या अनुभवाचा अर्थ सांगितला जातो. याच जाणिवेतून निर्माण झालेल्या नारायण सुर्वेंच्या कविता, बाबा आढावांचा 'एक गांव एक पाणवठा,' किंवा गोदावरी बाईंचे 'जेव्हां माणूस जागा होतो' या सारखी पुस्तके दलित साहित्यिकांना आपलीच वाटू लागतात. हिंदीतील समांतर साहित्याच्या चळवळीतील लेखकांच्या कथा ही त्याला आपली कथा वाटू लागते. तर उलट दलित जातीत जन्माला आलेल्या काही लेखकांच्या कलाकृती ह्या पांढरपेशीय किंवा पारंपारिक कलामूल्यांच्या खाली गुदमरताना आढळून येतात. हा जो दोन लेखकांच्या कलाकृतींतील फरक आहे तो जातीमुळे पडत नसून जाणिवेमुळे आणि त्या जाणिवेला असलेल्या अनुभवाच्या जोडीमुळे पडतो. दलित या संज्ञेला जो पारंपारिक अर्थ चिकटविला जातो. आणि त्या अर्थातून लाचारी, दारिद्र्य, अपमान असे अनेक पदर सूचित केले जातात. त्यामुळे दलित हा हा शब्दच मुळी अपमानकारक आहे. आपण स्वतःला दलित काय म्हणून घ्यायचे ? असा एक प्रवाह दलितांतील सुरक्षित सुशिक्षितांमध्ये आढळतो. परंतु दलित साहित्याच्या संदर्भात हा पारंपारिक अर्थ घेतलेला नसून त्याला एक नवीन आशय प्राप्त झाला आहे. दलित म्हणजे शोषित. पिडित असा समाज. धर्माच्या नावाखाली व अन्य कारणाने ज्याचे आर्थिक-सामाजिक, सांस्कृतिक शोषण केले जाते तो माणूस आणि हाच माणूस क्रांती करू शकेल असा दलित साहित्यिकांचा विश्वास आहे. या शतकाने दलितांना अनेक शस्त्रे दिली आहेत. या शस्त्रांनिशी आज दलित संघर्षात उभा आहे. आणि म्हणूनच

दलित म्हणजे क्रान्तिकारक समूह हा जो नवा आशय या संज्ञेला प्राप्त झाला आहे. तो समजावून घेणे अत्यावश्यक आहे.

माझ्या निवेदनात कलेची स्वायतता आणि परंपरेला संपूर्ण नकार या दोन गोष्टींच्या केलेल्या पुरस्काराबद्दल मला थोडेसे सांगावेसे वाटते. ह्या दोन प्रश्नांबाबत, म्हणजे कलेची स्वायतत्ता संपूर्ण अमान्य करून कसे चालेल किंवा परंपरेला संपूर्ण नकार कसा काय चालेल असे समजूतदार प्रतिप्रश्न उपस्थित होण्याची शक्यता नाकारता येत नाही. ठीक आहे. उदाहरणार्थ युद्ध छेडले गेले आहे. 'अ' सैन्य 'ब' सैन्यावर चाल करून येत आहे. प्रचंड फौजफाटा आहे. 'ब' सैन्याला 'अ' सैन्यातील काही मोजके सैनिक फार चांगले आहेत हे माहीत आहे. त्यांची 'अ' सैन्याशी सहानुभूती आहे. म्हणून 'ब' सैन्य हे संपूर्ण फौजेचे शस्त्र न उचलता स्वागत करण्यास सिद्ध राहील हे अशक्य आहे. ते जरी सहानुभूतीदार असले तरी ज्या फळीतून ते येत आहेत ती संपूर्ण फळी अशा निर्णायकीच्या वेळी महत्वाची असते. ती संपूर्ण फळी अशा वेळी लक्ष्य ठरविले जाते हे लक्षात घेणे अत्यंत महत्वाचे आहे. जशा समाजपरिवर्तनाच्या घोषणा स्वागतार्ह असल्या तरी त्या कोण आणि कोणत्या व्यासपीठावरून करतो याला जसे महत्व आहे तसे सहानुभूतीदार कोणत्या फळीत आहे त्यांची जागा कोणती याला देखिल महत्व आहे.

"दलित साहित्याची निर्मिती थोडी पण चर्चा फार" हा मराठीतील एक वाचकप्रिय कादंबरीकार जयवंत दळवी यांनी घेतलेला संख्यात्मक आक्षेप हा गुणवत्तेकडे कानाडोळा करून चाललेला वाटतो. या उलट 'रणांगण' सारखी एकुलती एक कादंबरी लिहिणाऱ्या विश्राम बेडेकरांना मराठीतील श्रेष्ठ कादंबरीकार ठरविणारांना आणि त्या कादंबरीवर वर्षानुवर्षे न कंटाळता नव्या जोमाने केल्या गेलेल्या चर्चेवर असा आक्षेप घेताना कुणी दिसत नाही. या उलट दलित साहित्यावर जे निश्चितच एक नवे बळ घेऊन येत आहे त्यावर हा आक्षेप घेतला जातो. साधी गोष्ट आहे, एक नवीन वाङ्मयीन प्रवाह म्हणून त्यावर चर्चा होणे साहजिकच आहे. शिवाय दलित साहित्याची निर्मिती थोडी का होते (अर्थात् पुस्तक रूपाने) यांचीही कारणमिमांसा करणे आवश्यक ठरते. आज अनेक तरूण दलित साहित्यिक मोठ्या संख्येने त्यांच्या नियतकालिकांतून लिहित आहेत. परंतु प्रकाशन संस्थेचा अभाव असल्यामुळे त्या सगळ्यांच्याच कलाकृती पुस्तक रुपाने बाहेर पडू शकत नाहीत. परंतु जी काही

पुस्तके प्रकाशित झाली आहेत त्याचीच अनेक अंगानी चर्चा व समीक्षा व्हावयाची आहे.

दलित साहित्याची निर्मिती थोडी आणि चर्चा फार असा आक्षेप एकीकडे घेतला जातो तर त्याचवेळी दलित साहित्याचे भवितव्य काय? असाही प्रश्न विचारला जातो. या प्रश्नांतील उपहासाचा पडदा दूर सारून सांगावेसे वाटते की, दलित साहित्यातील अनुभवाची जी भूमी आहे तिच्यावर अजून कोणी पाय ठेवला नव्हता. तो प्रथम दलित साहित्यिकांनी ठेवला आहे. दुसरी गोष्ट दलित साहित्य हे काही कल्पनारम्य आणि मनोरंजनप्रधान असे साहित्यक नाही. सामाजिक वास्तवाशी त्याचे अतूट असे नाते आहे. जोपर्यंत ह्या दाहक सामाजिक वास्तवाच्या रूपात काही बदल होत नाही तोपर्यंत दलित साहित्याची निर्मिती ही अटळ आणि अपरिहार्य आहे. दलित साहित्य म्हणून जे लिहिले जाईल ते श्रेष्ठ साहित्य असे मी मानत नाही आणि कुणी मानू नये. परंतु एक मात्र निश्चित मराठीला आंतराष्ट्रीय मान्यता मिळवून देण्याची मोठी जबाबदारी ही निखालस दलित साहित्यावर व साहित्यिकांवर येऊन पडलेली आहे.

'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने पुस्तक प्रकाशित केल्याबद्दल मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी, सचिव श्री. द. य. राजाध्यक्ष, सहसचिव श्री. पंढरीनाथ पाटील व मंडळाचे सदस्य यांचा मी आभारी आहे. विशेषतः दलित साहित्य चळवळीतील विचारवंत डॉ. म. ना. वानखडे यानी जे सहकार्य आणि मार्गदर्शन केले ते अत्यंत मोलाचे आहे.

शिवाय ज्या विचारवंत समीक्षकांचे लेख या पुस्तकात समाविष्ट केले आहेत, त्यांचा व ज्या नियतकालिकांतून हे लेख पूर्वी प्रसिद्ध झाले होते त्या सर्व नियतकालिकांच्या संपादकांचा मी अत्यंत ऋणी आहे.

२८ जून १९७७ —अर्जुन डांगळे

७/१३४, जयविक्रान्त, सहकार नगर नं. ५
चेंबूर, मुंबई-४०००७१.

# अनुक्रम

## १ : चर्चा



---

## २ : लेख

## ३ : भाषणें

# १

## चर्चा

म. ना. वानखडे

वा. ल. कुलकर्णी

रा. ग. जाधव

मे. पुं. रेगे

म. भि. चिटणीस

वि. वा. शिरवाडकर

बाबुराव बागुल

दया पवार

भालचंद्र नेमाडे

नरहर कुरुंदकर

# महाराष्ट्रातील आजउद्याचा सांस्कृतिक संघर्ष आणि वाङमयीन समस्या

* म. ना. वानखडे * वा. ल. कुलकर्णी * रा. ग. जाधव
* मे. पुं. रेगे * म. भि. चिटणीस

जाधवः—ललित वाङ्मयाच्या अधिष्ठानी सांस्कृतिक मूल्यकल्पना असतात आणि ललित वाङमयाचे अध्ययन-अध्यापन व रसग्रहण-मूल्यमापन ही अशा मूल्यकल्पनांच्या यथार्थ अभिज्ञतेवर अवलंबून असतात, असे मला वाटते. या विचाराच्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील गेल्या तपभरातील नव-बौद्ध आंदोलनातून मूळ धरू लागलेल्या नवीन सांस्कृतिक मूल्य कल्पना लक्षात घेतल्यास, प्राचीन व अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या अध्ययन-अध्यापनासंबंधी व रसग्रहण-मूल्यमापनाविषयी काही प्रश्न निर्माण झाले आहेत, असे आपणास वाटते काय? हे प्रश्न नेमके कोणते असू शकतात? त्यांची सोडवणूक करण्यासाठी काही मार्ग आपण सुचवू शकाल काय?

रेगेः—हा जो नव-बौद्धांच्या आंदोलनातून निघालेला प्रश्न आहे तो अधिक व्यापक भूमिकेतूनही मांडता येईल. म्हणजे असे की, ज्याने आधुनिकता (modernity) स्वीकारलेली आहे असा माणूस, आपल्या परंपरागत मूल्यांविरुद्ध बंड करीलच. दुर्दैवाने आपल्या समाजात प्रामाणिक बंड असं झालंच नाहीं. जेव्हां जेव्हां बंडाचा प्रयत्न झाला, उदाहरणार्थ बुद्धाचा किंवा असंही म्हणता येईल की, साधुसंतांचा तेव्हां तेव्हां त्या बंडाचे प्रयत्न नेटाने तडीला कुणी पोहोचविलेच नाहींत. दर वेळेला एक प्रकारचे (compromise) करून जुनी मूल्ये तशीच ठेवून, वरवरचा देखावा पालटून, किंवा ह्या मूल्यांना

आध्यात्मिक स्वरूप देऊन, ऐहिक जीवनाच्या संदर्भातून वेगळं करून अशा रीतीने ही जी एक विरोधी विचारसरणी प्रसृत होत होती ती आणि परंपरागत मूल्यांचा समन्वय साधण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. पण नव-बौद्धांना त्यांच्या सामाजिक परिस्थितीमुळे जे बंड करावे लागते, त्या प्रकारचं नाहीं परंतु असं म्हणू की, आधुनिक विचाराचा वारसा ज्यांनी स्वीकारलेला आहे त्यांना वैचारिक दृष्टीनेसुद्धा जे बंड करावसं वाटतं, त्या दोन्हीं बंडाची भूमिका एकच राहील, मग तो सर्वांचा प्रश्न राहील, केवळ नव-बौद्धांचा नव्हे आता एक गोष्ट खरी की या नव-बौद्धांच्या साहित्यात वास्तविक सामाजिक चित्रण जर प्रामाणिकपणे, प्रभावीपणे चित्रित झालं, तर एक नव्या प्रकारचं साहित्य मराठीत निर्माण होईल. या प्रकारचं साहित्य कोणताही वर्ग निर्माण करू शकणार नाही. पण कुठे तरी या साहित्याचा आणि जे परंपरागत मूल्यांविरुद्ध बंड करून उठले आहेत, उदाहरणार्थ दिलीप चित्रे यांचा संबंध जुळून येईल. पुढची पंचवीस, पन्नास कदाचित एक शतक वर्षे ही विद्रोहाची राहतील. जर भारतीय समाजाची पुनर्घटना व्हावयाची असेल, तर हा कालखंड विद्रोहाचा राहिला पाहिजे मग मराठी, संस्कृत साहित्य शिकवितानां शिकवणारांनी प्रामाणिकपणे विरोधाची भूमिका पत्करावी त्यात गैर नाहीं. आता जर कुणी म्हणेल की, या वाङ्मयातसुद्धा एक (universal) आशय आहे, म्हणून तो स्वीकारला पाहिजे. ह्याच्यात आणि विद्रोह करणाऱ्यात काहीं विसंवाद आहे असं मला वाटत नाही, कारण आपण असं दाखवू शकू की, हा जो (universal) आशय आहे, तो प्रामाणिकपणे व्यक्त झालेला नाहीं. आणि जर तसा तो झाला तर मग बंड करायचं कारणही उरलं नसते. उदाहरणार्थ Feudal litrature कोणतं की ज्यात त्या समाजाचं प्रामाणिक प्रतिबिंब पडलं आहे ते. तर त्याच्यात व्यक्ति-व्यक्तींमधले संबंध, प्रामाणिकपणें वाटलेल्या भावनांचं प्रतिबिंब आहे हे आपण स्वीकारू शकूं परंतु ह्याचा अर्थ असा नाहीं की ज्या मूल्यांवर तो समाज आधारलेला आहे, ती मूल्यं स्वीकारली पाहिजेत. उलट आपण असं दाखवू शकू की, ही मूल्ये स्वीकारल्यामुळें त्या व्यक्तीच्या प्रामाणिकपणे जगण्याच्या प्रयत्नात कुठंतरी कमतरता, न्यून राहाते. तर मला या दृष्टीनें काही अवघड वाटत नाही. मी असे म्हणेन की, खंबीरपणे

परंपरागत साहित्यावर टीका करावी. कोणत्या दृष्टीनें त्यातील मूल्ये त्याज्य आहेत हे दाखवून द्यावे. कारण अशा प्रकारचा robustness असल्याशिवाय जिवंत साहित्य निर्माण होणार नाही. नव-बौद्धांनी एक समजावं की त्याच्या स्वतःच्या निरोगी वृत्तीसाठी त्यांनी अशी कल्पना करून घेऊ नये की ते एकाकी आहेत. आणि एकंदर सगळा समाज त्यांच्याविरुद्ध आहे. एका दृष्टीने संबंध समाज त्यांच्याविरुद्ध आहे. पण जो हा परंपरागत समाजाचा त्याग करायला उभा आहे, तो त्यांच्याविरुद्ध नाही. त्यांची म्हणजे नव-बौद्धांची परिस्थिती अती-बिकट आहे. आणि वरवरचे व फसवे असे अनेक प्रयत्न की जणू काही त्यांची परिस्थिती पालटली आहे किंवा खरोखर यांच्यात बदल घडतो आहे असे दाखविण्यासाठी होतात आणि ह्यांचा त्यांना त्वेष येणं नैसर्गिक आहे. पण यातून एक प्रकारची masochist अशी वृत्ती निर्माण होण्याचा संभव आहे असा धोका वाटतो. तो धोका टाळण्यासाठी परंपरागत समाजातील जे वर्ग आहेत त्यांच्यातील व्यक्तींनी ही जबाबदारी स्वीकारली पाहिजे. म्हणजे त्यांनी आपणहून एकंदर ह्या आंदोलनाला हातभार लावला पाहिजे. असं जर झालं तर आत्मपीडकवृत्ती निर्माण होण्याचा कमी धोका आहे.

**वानखडे**:- पण तुम्ही असे म्हटले की हा जो पददलित समाज आहे, त्यांच्या-जवळ त्यांचे वाङ्मयाच्याबाबत काही स्वतःचे असे आहे, जे वरच्या वर्गाजवळ नाहीं. तर वरच्या वर्गाला त्याची जाणीव वा भूमिका कशी येऊ शकेल? Honesty to experience हे जर वाङ्मयाचं गमक असेल तर नवबौद्धांची भूमिका हा वरच्या थरातील समाज वा टीकाकार कसा समजू शकेल?

**रेगे**:-तुमचं म्हणणं मला मान्य आहे. मी एवढं म्हणेन की, दलित वा नवबौद्ध समाजाचा जिवंत अनुभव जर साहित्यात पडायचा असेल तर तो त्यांच्याकडूनच पडला पाहिजे. पण मला याबद्दल एक भीती वाटते की प्रामाणिकपणे आपल्या ह्या अनुभवाकडे पाहण्यासाठी जी एक शिस्त व संयम लागतो, ती जर या लेखकांकडे नसेलतर साने गुरूजी सारखच sentimental वाङ्मय निर्माण होण्याचा धोका आहे. यासाठी कठोर आत्मनिरीक्षण करावं लागेल. ते जर

करायचं असेल तर एक प्रकारची तटस्थ वृत्ती लागेल. त्यासाठी प्रगत वर्गाने वैचारिक भूमिका घेतली पाहिजे. मी असे म्हणेन नवीन प्रकारचं वैचारिक वातावरण प्रगत वर्ग निर्माण करू शकेल, प्रत्यक्ष निर्मिती मात्र करू शकणार नाही.

**वानखडे**:– मान्य आहे. परंतु ह्यांच्या लिखाणाचं नीट मूल्यमापन करण्यासाठी साहित्यातील आडाखे नवीन लागणारच.

**रेगे**:–हे मान्य, मात्र नवीन टीकाकारने व वर्गाने हे समजावून घ्यावयास पाहिजे आणि हे पांढरपेशे टीकाकार करू शकतील. मी दिलीप चित्रेचं पुन्हा उदाहरण घेतो. कारण दिलीप चित्रे ज्या वर्गाचा प्रतिनिधी आहे असं म्हणता येईल हा वर्ग अस्तित्वात आहे असं मानायला मी तयारच नव्हतो, त्यांची ओळख होईपर्यंत ? ही एक 'पोज' आहे असे मला वाटत होतं. पण ते तसं नाहीं. मी आता अनेकांना पाहतो, त्यांची वृत्ती चित्रेची आहे.

चित्रेच्या लिखाणाने जो 'शॉक' बसतो, त्यापासून धोका आहे की 'शॉक' साठी चित्रे लिहित राहील. That will be bad for him. तसंच आपली दयनीय स्थिती व तिच्याविषयी अनुकंपा वा चीड निर्माण करण्यासाठी, effect साधण्यासाठी नवबौद्धांनी लिहिलेलं वाङमय sentimental वाङमय होईल. पण त्याचं मूल्यमापन करण्यासाठी वानखडे म्हणतात त्याप्रमाणे वेगळे आडाखे बसवावे लागतील ज्या-प्रमाणे चित्रेचं मूल्यमापन करण्यासाठी वेगळे आडाखे बसवावे लागतील. ही जबाबदारी टीकाकारांची आहे व ते पार पाडू शकतील. पण ह्या टीकाकारांनी modern झालं पाहिजे. त्यासाठी त्यांनी परंपरागत निष्ठांतून बाहेर आलं पाहिजे. ह्या निष्ठा किती चिवट असतात, हे त्यातून बाहेर येण्याचा प्रयत्न केल्याशिवाय कळत नाही.

**चिटणीस**:–आता तुम्ही म्हटलं त्याप्रमाणे टीकाकारांच्या जबाबदारीकडे वळू. सौंदर्यग्रहणाच्या बाबतीत गुलाबाच्या फुलाला हे फूल म्हणून आपण त्याचे सौंदर्य ग्रहण करू शकतो, पण ही भूमिका आपल्याला काव्याच्या बाबतीत घेता येणार नाही. कारण काव्यात शेवटी अर्थ असतोच ज्या वेळेस आपण कवितेचं appreciation करतो, त्यावेळेस कवीच्या मनात निर्मितीच्या वेळेला जी भूमिका असते त्याची स्पष्टास्पष्ट

वलये म्हणा, संस्कार म्हणा, निर्माण होत असतात व मगच ती आपल्या मनावर ठसते. तसे गुलाबाच्या फुलाच्या बाबतीत होत नाहीं. तेव्हां फक्त poem for its ownsake अशी भूमिका टीकाकाराने घेणे बरोबर नाही. कवीची जी निर्मितीची भूमिका असते ती फक्त contextual असू शकत नाही; ती referential सुद्धा असू शकते. पाश्चात्य वाङमयात Formalist-criticsचा वर्ग निर्माण झाला T. S. Eliot पासून अर्थात् ज्याने Waste Land सारखी कविता लिहिली व पाश्चात्य जीवनाचा पौर्वात्य तत्वज्ञानाशी सांगड घालण्याचा प्रयत्न केला, त्या T. S. Eliot ला formalist मी म्हणणार नाही. परंतु एवढ खरं की, त्या वेळेपासून formalist किंवा contextualist टीका निर्माण झाली व ह्या टीकाकाराने जीवनाचा कलाकृतीशी काही संबंध नाही असं प्रतिपादन करण्यास सुरूवात केली.

**वानखडे**:–हे जे New Critics म्हणून ओळखले जाते, त्यांचा थोडाफार संबंध Croce शी आहे. क्रोशेने प्रतिपादलं की, Art is an entity in itself, so much so that even outward expression is not necessary for it शिवाय हे formalist बंड Victorian Criticism च्या विरुद्ध होतं त्यावेळेस टीकाकार कवितेकडे कमी बघायचे व त्यातील content वर जास्त भर द्यायचे. Tennyson व Browning ह्यांच्या philosophy वरून त्यांची उंची ठरविली जात असे. हे अर्थात चुकीचे होते. परंतु कवितेकडे, तिच्याकडे दुर्लक्ष झाले. ते या formalists टीकाकारांनी दाखवून दिले. कविता ही कशी Self-contained artifact आहे, त्यातील प्रत्येक शब्द कसा योजून वापरला आहे, त्यातील अलंकार, irony, paradox वगैरेमुळे संबंध कविता कशी one whole organic unitझाली आहे, यावर हे टीकाकार जास्त भर देऊ लागले.

**चिटणीस**:–पण त्यांनी एक निकषही ठरवून दिला की, जीवनाचा वा समाजाचा कलाकृतीशी काही संबंध नाही. हे आता सगळं आपल्याइकडेही दिसतं. कुठल्याही कादंबरीवर टीका करतांना जो कादंबरीतील अनुभव व्यक्त झाला आहे व टीकाकाराला जीवनाचा जो अनुभव आहे, ह्या दोघांचा संघर्ष वा समन्वय म्हणा, असं काही कुठेही मी जे थोडेफार मराठी मासिकातून reviews वगैरे वाचतो, त्यावरून

दिसत नाही. पूर्वी निदान असं म्हणत की, ह्या कादंबरी-सारखं जीवनांत काही दिसत नाही. आता अव्यांसारखे जुन्या-पद्धतीचे टीकाकार अद्यापी म्हणतात की, 'वासूनाका' ही गोष्ट कल्पित आहे. अशा विचारांची वा संस्कृतीची माणसंच असणं अशक्य आहे, जीवनांत दिसूच शकत नाहीं. पण जे आज अग्रेसर असे टीकाकार समजले जातात, ते आपला समाजविषयक अनुभव व कथा कादंबऱ्यातून व्यक्त झालेला अनुभव ह्या दोघांची कधीही सांगड घालण्याचा प्रयत्न करीत नाही. म्हणजे कथेचे मूल्यमापन करतांना जीवनाचा कुठल्याही प्रकारचा निकष लावत नाहीत.

**रेगे**:–मला वाटतं आपल्याकडे मर्ढेकरापासून निर्माण झाली असल्या प्रकारची टीका.

**जाधव**:–व ती आता Fashion झाली आहे.

**रेगे**:–शक्य आहे, पण टीकाकारांनी जो अनुभव कलाकृतीत व्यक्त झालेला आहे तो कितपत adequately, Precisely व्यक्त झाला आहे एवढचं पाहायला पाहिजे. त्या अनुभवाचं मूल्यमापन करायचं कारण नाही. पण ही भूमिका चिटणीस म्हणतात, त्याप्रमाणे शेवटपर्यंत सांभाळता यायची नाहीं. कारण अशी कलाकृतीची जीवनाच्या अनुभवांपासून फारकत करता येणार नाही.

**जाधव**:–आपण मागे वळू या. आपल्या समाजाचे खरेखुरे प्रामाणिकपणे दर्शन घडवू शकेल असा हा जो एक नवीन लेखकाचा वर्ग तयार होणार आहे, त्याला रेगे म्हणतात संयम, शिस्त बाळगावी लागेल. ही शिस्त ज्या शाळांमधून शक्य आहे त्या शाळा म्हणजे सध्याची महाविद्यालये किंवा विद्यापीठे ह्या मधूनच हा नवीन वर्ग किंवा टीका वाङ्मय किंबहुना सर्जनशील असे वाङ्मय निर्माण व्हायचे आहे. हे जे वाङ्मयाचे academisation होत आहे किंवा ही जी academisation ची process आहे, त्यामधून ही नवी अभिरुची निर्माण करावयाची आहे. पण ह्याला विद्यार्थ्यांचा एक प्रकारचा resistance असतो व तो अध्यापनाचा एक मोठा प्रश्न आहे असं मला वाटतं Formative stage मध्ये असलेल्या या विद्यार्थ्यांसाठी काही Plannvd programme पाहिजे असं वाटतं.

चिटणीसः-त्यात एक अडचण अशी आहे, की सध्याच्या टीकाकारात आपल्याला जो एक Social anthropological approach पाहिजे तो कुठेच दिसून यंत नाहीं. आज नवीन नवीन प्रकारच्या कथा, कादंबऱ्या निर्माण होत आहेत, पण त्यांच्यातले norms हे पुष्कळ अंशी जुनेच आहेत. Myths निर्माण होत आहेत, तीसुद्धा जुनीच आहे. ही एक जाणीव ठेवली तर पुष्कळच फायदा होण्यासारखा आहे. आता ज्ञानेश्वरीचा प्रश्न घ्या. नवबौद्धांना ज्ञानेश्वरी शिकवतांना मी असं शिकवेन की, शंकराचार्यांनीं जेव्हां भगवद्गीतेवर टीका लिहिली, त्यावेळी त्यांनी त्यांतला जो नैतिक भाग आहे, त्याला मुळीच प्राधान्य दिले नांहीं. 'अहिंसा' ह्याचा त्याने संस्कृतमध्ये अर्थ सांगितला आहे की, हिंसा न करणे आणि त्याच्यावर सहज अगदी काव्यमय अशा म्हणजे जणू काहीं स्वतःचा अनुभव व्यक्त करणाऱ्या चारशे ओव्या ज्ञानेश्वर लिहू शकतो. स्थितप्रज्ञाचे वर्णन करतानां त्यातला नैतिक असा जो भाग आहे, की चालतांनासुद्धा मुंगीला दुखवू नये. आणखी खाली आपले हृदय आंथरून जो चालत असतो हे जे काही आहे ते आलं कुठून? तर मीं म्हणेन हा सगळा वारसा म्हणंजे बौद्ध संस्कृतीचा वारसा. तुकारामाच्या बाबतीतही मी हेच सांगेन की, नैतिक गुणांना जीवनांत महत्त्व देणे म्हणजे आचरणाला, नुसत्या विचाराला किंवा ज्ञानाला नव्हे, तर सामाजिक आचरणाला जे महत्त्व मिळालेलं आहे, हे बौद्ध वाङ्मयापासून मिळालेले आहे. साधुसंत हे बौद्धांच्या शिकवणीचे Lower plane वर म्हणा किंवा महायान period मधले म्हणा वाटलं तर-असे पडसाद आहेत. साधुसंताचे जर काही महत्त्व असेल त्या काळामध्ये, किंवा आता आपल्याला वाटत असेल, तर ते केवळ बौद्ध वाङ्मयाचे पडसाद आहेत म्हणून असे मीं म्हणेन.

रेगे:-हे मान्य. मी असं म्हणेन की, या संबंध वाङ्मयात सार्वत्रिकरित्या प्रमाण होऊ शकेल, असा जो काही अंश आहे तो कोणालाही पटवून देता येईल. मग साधुसंतांच्या वाङ्मयाच्या मर्यादा कुठे आहेत? हे विचार जर प्रामाणिकपणे स्वीकारले तर त्याचा एक आवश्यक परिणाम असा होतो की, सबंध समाजाची पुनर्घटना करावी. परंतु हे होणं आवश्यक आहे असं कुणीही म्हटलेलं नाहीं, किंवा म्हटलं

असेल तर, त्यांनी ज्या इतर गोष्टी म्हटल्या आहेत त्यांत हे बुडून गेलेलं आहे. हे आपल्याला बाहेर काढता येईल. मी अगोदर म्हटल्या-प्रमाणे परंपरागत मूल्यांविरुद्ध बंड करण्याऱ्यांची व नवबौद्धांची भूमिका एक राहील.

**वानखडे**:–या नवीन लेखकांना नवीन myths ही तयार कराव्या लागतील.

**रेगे**:–त्या होणारच. त्या होत आहेत. याची दखल टीकाकारांनी घेतली पाहिजे. चिटणीसांचा टीकाकाराविषयी जो social anthropology चा मुद्दा आहे तो अत्यंत महत्वाचा आहे.

**जाधव**:–आता हे खरं आहे की आज मराठीत formalist टीकेचा पगडा आहे. पण 'वासुनाक्या' संबंधी जे प्रश्न निर्माण झाले, ते जीवनाच्या संदर्भात केलेलं 'वासुनाक्या' चं आकलनच आहे, नाहीं कां?

**चिटणीस**:–'वासूनाक्या' च्या सदर्भात बोलायचं म्हणजे 'वासुनाक्या' मध्ये एका वरच्या थरातील लेखकाने समाजाच्या अगदी खालच्या थरातील जीवन जे पुढे मागें उसळून वर येईल ते जीवन प्रामाणिकपणे रंगविण्याचे धाडस केले. असलं धाडस नवबौद्धांमधील कितीशा लेखकांना करता येईल? माझा पूर्वीच्या Scheduled Caste असलेल्या बऱ्याच विद्यार्थ्यांशी संबंध आलेला आहे. त्यातील एक आता Ph. D. करीत आहे. त्याला वयाच्या बारा वर्षापर्यंत एकही मूळाक्षराची ओळख नव्हती. तो मेलेली ढोरे फाडायचा. प्रेतावर फेकले जाणारे पैसे गोळा करायचा. त्याचा बाप त्याला हे करायला सांगायचा. अगदी लहान वयात त्याच्या बापाने त्याला दारू पिणे शिकविले. हे जे काही त्याचे जीवन आहे, हे जर त्याने लिहून काढले तर किती बहारदार होईल. पण हे सगळं तो विसरण्याचा प्रयत्न करतो कारण वरच्या थरातील जीवन हे त्याच्या जीवनाचे आदर्श तर हे जे काही उच्चवर्णियांच्या वाङ्मयामुळे inhibition निर्माण झाले आहे, ते नाहीसे झाले पाहिजे. दुसरं म्हणजे कुठल्याही वाङ्मयाला परंपरा लागते. नुसत्या कोकिळेचा आवाज ऐकून कोणी संगीत शिकू वा गाऊ शकणार नाही. त्याला परंपरा लागते. नवबौद्ध लेखकाला ही अडचण भासणारच. तो त्याचा अनुभव लिहिण्यासाठी मध्यमवर्गाचेच forms, genre घेणार, त्याचं काय? त्याला सांस्कृतिक दृष्टया

आपण हीन आहोत असे जोपर्यंत वाटते तोपर्यंत त्याला नवीन वाट मिळणार नाही व त्याच्या लिखाणात जिवंतपणा येणार नाही. निग्रोंच्या Protest literature चे उदाहरण घेण्यासारखं आहे. त्यांना आपले सगळ्या प्रकारचे अनुभव सांगतांना लाज, भीड वाटत नाही. ते त्यांनी बेदरकारपणे सांगितलेले आहेत.

**रेगे**:–बरोबर आहे. नवबौद्धांचं वाङमय हे विद्रोहाचं वाङमयच राहील. पण त्यांची परंपरा संताची नाही असं मला वाटतं. ती अस्सल मराठी परंपरा राहील. त्यांची भाषाही अगदी मराठमोळा असेल हा माझा तर्क आहे. त्यांनी मध्यमवर्गीय वाङमयाचं अनुकरण कधीही करू नये. त्यांनी वकिली करू नये. प्रामाणिकपणे, बेडरपणे सत्य दाखविण्यासाठी आपलं जीवन रंगविले पाहिजे. मुंबई-पुण्याच्या मध्यमवर्गाच्या वाङ्मयाचा मोह त्यांनी सोडावा. Myths बद्दल म्हणाल तर मध्यमवर्गाला तो Sophisticated अशा अवस्थेत पोहोचल्यामुळे myths ची आता गरज नाहीं. नवबौद्धातून जे निर्माण होईल, ते इतकं intimate असेल की ते primitive राहील. त्यांना myths लागतील तर ते स्वतः निर्माण करतील.

**जाधव**:–या मराठी वाङ्मयाच्या संदर्भात एखादी workable tradition निर्माण करता येणार नाही का? महानुभाव वगैरे.

**रेगे**:–पण ह्या tradition चा नवबौद्धांना मोह पडण्याचं काही कारण नाही. डॉ. केतकर म्हणाले की मराठी काव्य बुडवलं तर कुणाचंही नुकसान होणार नाही.

**चिटणीस**:–मला आठवतं की, बाबासाहेब आंबेडकरांनी एकदा व्याख्यानात म्हटलं होत, "काय तुमचं वाङमय? हांक मारून सांगे तुका नाम नाम घेतल्याविना राहु नका॥ ह्या पलिकडे काय आहे? व नाम घेऊन तुमच काय काम होणार आहे?" असा त्यांनी एक प्रश्न केला होता. पण मला असं वाटत की, त्याचा अभ्यास हा पाहिजेच.

**जाधव**:–बरोबर आहे. suddenly वाङ्मय हे निर्माण होऊ शकत नाही, कारण भाषा traditional आहे.

**रेगे**:–भाषा काय, भावनाही traditional च आहेत.

**जाधव**:–हो. व मराठी भाषेला ज्या काही associations आहेत त्यांच्या विरुद्ध एकदम revolt करता यायचं नाहीं. नवीन भाषा बनवितांना crisis मधून जावं लागेल.

**चिटणीस**:–Tradition बद्दल बोलायचं झालं तर नवबौद्धांना केशवसुत पूर्णपणे मान्य करता येईल. त्यांनी म्हटल्याप्रमाणे "गत शतकाची पापे घोरे। क्षालायाला हवीत रुधिरे॥" ही जाणीव आगरकरामध्ये-सुद्धा नाही. आगरकर नुसते बुद्धीच्या व लोकशाहीच्या भूमिकेवर ही समाज व्यवस्था टिकणारी नाही असं म्हणतात. परंतु गुन्ह्याची व पापाची जाणीव जर प्रथम कुठे व्यक्त झाली असेल तर ती सबंध भारताच्या वाङ्मयामध्ये केशवसुतामध्ये आहे, रवींद्रनाथ टागोरामध्येही नाही.

**जाधव**:–पण केशवसुतांनी जो एक अंत्यज्याच्या मुलाचा प्रश्न मांडला आहे तो एक middle class दृष्टीकोन व्यक्त करणाराच आहे. Pure sympathy, that is all.

**चिटणीस**:–इथे anecdotal कविता व rhetorical असा वेगळा फरक केला पाहिजे. वाटलं तर rhetorical ला तुम्हीं खरी कविता म्हणू नका. तुतारी rhetorical आहे पण त्यात तुम्हाला या पापाची तीव्र जाणीव असलेला माणूस भेटतो. ही केशवसुतातील जाणीव तुम्हाला कुठल्याच समाज सुधारकामध्ये सापडत नाहीं. तेव्हां केशवसुत तुम्हाला नवबौद्धांसाठी tradition म्हणून accept करता येईल. बालकवीही बाल अशा प्रतिभेचा फुलोरा म्हणून accept करता येईल. आता नवबौद्ध लेखकाचे दोन approaches असू शकतील एक म्हणजे तुम्हाला या स्थितीला नेऊन पोहोच-विण्याला तुमचा समाज जबाबदार आहे, म्हणून डोळ्यासमोर केवळ हा एक समाज आहे, त्याच्याविरुद्ध revolt literature लिहिणे. दुसरा म्हणजे माझं जीवन दुसऱ्यापेक्षा वेगळं आहे, ते सांगण्या-सारखं आहे हा. कदाचित ह्या दुसऱ्या approach मधून जास्त उत्कृष्ट निर्मिती होऊ शकेल.

**जाधव**:–मला वाटतं हे दोन्ही एकाचवेळी चालू राहतील व त्यांच्या देव-घेवीतूनच नवीन प्रभावी वाङ्मय निर्माण होईल.

# : २ :

**वानखडे:**–महाराष्ट्रातील नवबौद्ध आंदोलनाच्या मूल्यकल्पनांनी प्रभावित झालेल्या नवीन लेखक कवींच्या वाङमयनिर्मितीचे स्वरूप, साध्य व साधने कशा प्रकारची असू शकतील? त्यांच्या वाङमयीन अभिरुचीचे वळण हे कशा प्रकारचे असू शकेल?

**कुलकर्णी:**–ह्या संबंधाने आपण काही निर्णयात्मक सांगणे बरोबर नाहीं. ते कोणत्या स्वरूपाचे असेल ह्याचा आपण थोडा फार विचार करु शकू. परंतु ज्या प्रमाणामध्ये पददलितांची अस्मिता ही जागृत होणार आहे आणि अस्मिता जागृत होणे ह्याचा मी अर्थ असा समजतो की, एक प्रकारचा आत्मविश्वास निर्माण होणे, म्हणजे मला समाजामध्ये निश्चित स्थान आहे, लोकांनी मान्य केले वा न केले तरी आहे, मी स्वतःच्या पायावर निश्चित उभा राहू शकेन, एवढेच नव्हे तर सामाजिक प्रतिष्ठेची जी स्थाने आहेत ती स्थानेदेखील प्राप्त करून घेण्याचा मला पूर्णपणे अधिकार आहे आणि मी ती निश्चितपणे माझ्या कर्तृत्वाने प्राप्त करून घेऊ शकेन अशा प्रकारचा आत्मविश्वास निर्माण होईल त्या प्रमाणामध्ये हे पददलित आपोआपच बोलू लागतील. त्यातून खरे साहित्य निर्माण होणार आहे. आता ह्या साहित्याचे स्वरूप थोडेफार revolt स्वरूपाचे राहील. ह्यात संशय नाही. दुसरे असे की, मला साहित्याच्या क्षेत्रात आज असे दिसते की, उद्या राहील की नाही आणि ते राहू नये असे मला वाटते ह्या विशिष्ट वर्गातून जे लेखक वर येताहेत त्यांच्या लेखनात मला ही भूमिका दिसत नाही. त्या लेखकांच्या लेखनांमध्ये अजूनही प्रतिष्ठित वर्गाचे जे साहित्य आहे, त्या साहित्याची मूल्ये, त्याचे आदर्श, त्याचे norms हे अप्रत्यक्षपणे किंवा प्रत्यक्षपणे, स्वीकारण्याची प्रवृत्ती आहे. उदाहरणार्थ अण्णाभाऊ साठे घ्या, शंकरराव खरात घ्या, मला त्यांच्या लेखनामध्ये हे त्यांचं लेखन आहे की, ज्या वर्गाने एका विशिष्ट प्रकारचे अनुभव घेतलेले आहेत ही जाणीव प्रभावीपणे व्यक्त होत नाही. शंकरराव खरातांच्या लेखनामध्ये आणि दुसरे जे बरेचसे ग्रामीण लेखक आहेत त्यांच्या

प्रकृतीत मला तरी विशेष फरक दिसत नाहीं. हा फरक निर्माण का होत नाही असा मी विचार करतो.

**वानखडे:**—शंकरराव खरात किंवा अण्णाभाऊ साठे यांच्या लिखाणासारखे वरच्या वर्गातील लेखक करू शकतील असे तुम्हाला वाटते काय?

**कुलकर्णी:**—मला काय म्हणावयाचे की, त्यांच्यामध्ये ज्या काही व्यक्तींची किंवा ज्या व्यक्तीसमूहांची चित्रे आली आहेत, ती नुसती चित्रे येऊन भागवणार नाही. त्याविषयी सहानुभूती निर्माण करणारे चित्र किंवा सहानुभूतीने काढलेले चित्र काढून भागणार नाहीं १७ त्यांच्या जीवनामध्ये जो एक विलक्षण अंतःसमर आहे. कुठे तरी ते जीवन दडपले गेले आहे. इतके दडपले गेले आहे की, त्याची त्यांना जवळ जवळ संवयच झालेली आहे आणि ह्याच्यापेक्षा काही वेगळे जीवन असते हे सुद्धा ते आज शतकानुशतके विसरले आहेत—ह्याची जी काही एक गुदमरलेपणाची जाणीव आहे, ती अजून मला व्यक्त होताना दिसत नाही. हे वाङमय, मला वाटते, अजूनही पांढरपेशा वर्गासाठी म्हणजे त्याच्या सहानुभूतीसाठी निर्माण होत आहे. परंतु हे बरोबर नाही, ते लेखन कमी दर्जाचे आहे असे मला म्हणायचे नाही, परंतु ह्याच्यापेक्षा एका वेगळ्या लेखनाची मी आता अपेक्षा करतो, म्हणजे ज्या नवीन पददलित लेखकांची अस्मिता जागृत झाली आहे, त्यांच्याकडून हे लेखन झाले पाहिजे, त्याचे norms सुद्धा वेगळे असायला पाहिजेत. उदाहरणार्थ 'Negro literature' मी Le Roi Jonesची काहीच नाटके वाचली आहेत, त्याचे Dutchman किंवा Toilet ह्याच्या सारखी नाटके फार श्रेष्ठ कलाकृती आहेत असे नाहीं, परंतु ती अंगावर शहारे आणतात. तो मुद्दाम काही shocking निर्माण करायचा प्रयत्न करत नाही, तर ते shocking होते. अशा प्रकारचे वाङमय इथे निर्माण होण्याची शक्यता आहे असे मला वाटते. आज जे पददलितातून लेखक जन्माला येताहेत, त्यांना अजून पुरेसा आत्मविश्वास नाही. हा आत्मविश्वास निर्माण झाला पाहिजे. म्हणजे की, "बेहत्तर आहे माझं लेखन जे आहे ते वाङमयीन दृष्टया श्रेष्ठ दर्जाचे ठरो वा न ठरो त्याची मला पर्वा नाही" ही वृत्ती हवी. आज तुम्हाला असे दिसेल, की दिलीप चित्रे आणि ही जी इतर मंडळी आहे ती सुद्धा खूपशी

वाङ्मयीन संकेताची मोडतोड करताहेत. ही मोडतोड करत असतांना त्यांना कुणाची देखील पर्वा नाही पण ते ज्या वर्गातून येताहेत, त्या वर्गाची अस्मिता अगोदरच जागृत झालेली आहे. त्यामुळे त्यांच्या-मध्ये लिहितांना एक defiance ची प्रवृत्ती आहे. ह्या प्रवृत्तीला कारण म्हणजे त्यांना आत्मविश्वास आहे की, आज नाही तरी उद्या, तुम्ही आमच्याकडे लक्ष द्यायलाच हवे. जर तुम्ही लक्ष दिले नाही, तर तुम्हीच महामूर्ख ठराल." नवबौद्धांत ही प्रवृत्ती नाही, कारण त्यांच्यात पुरेसा आत्मविश्वास नाही. व आत्मविश्वास नाही याला ऐतिहासिक कारणे आहेत. आणि ती म्हणजे यांना शतकानुशतके दाबून ठेवलेले आहे. त्यामुळे त्यांना आता बोलताना भीती वाटत असावी. आपण जे निर्माण करतो आहोत, त्याला मान्यता मिळेल की नाही याबद्दल ते साशंक आहेत आणि यात नवल काहीच नाही. पण त्यातून ते आता बाहेर येत आहेत असे मला वाटते. ते ज्या प्रमाणांत बाहेर येतील त्या प्रमाणांत हे प्रक्षोभक साहित्य निर्माण होण्याचा संभव आहे. दुसरा एक महत्वाचा मुद्दा म्हणजे असा की, नाही म्हटले तरी आपल्यामधील भिंती आता पडायला लागल्या आहेत. त्यामुळे आम्ही बरेचसे एकमेकांजवळ यावयाला लागलो आहोत. आपला जो शिक्षित वर्ग आहे; मी सुशिक्षित असा शब्द कधीच वापरत नाही. तो बराचसा एकमेकांच्या जवळ यावयाला लागला आहे. ज्या प्रमाणात पांढरपेशा समजला जाणारा वर्ग पददलित समाजाच्या जवळ जवळ यावयाला लागेल त्या प्रमाणामध्ये, त्यांच्यामध्येसुद्धा एक असा लेखकवर्ग निर्माण होण्याची शक्यता आहे की, जी दलितांची दुःख आहेत, जी एक गुदमरलेपणाची जाणीव आहे, त्याला देखील वाचा फोडील. अशी ही देवाणघेवाण व्हावयाला पाहिजे असे मला सारखे वाटते. वाङ्मयात जर वर्गभेद निर्माण झाला, तर ते जरा चमत्कारिक होईल. तिथे तरी हा वर्गभेद नष्ट व्हावयाला पाहिजे. हे होण्याची शक्यता आता मला दिसते. दुसरे असे की, एकाच वेळेला वैचारिक क्षेत्रात आणि वाङ्मयाच्या क्षेत्रात एक प्रक्षोभक असे वातावरण निर्माण व्हावयास पाहिजे. पांढरपेशापुरता जेव्हां आम्ही विचार करतो, तेव्हां असे दिसून येईल की, १९ व्या शतकामध्ये जी एक वैचारिक खळबळ उडाली ती खळबळ एकाच वेळेस वैचारिक व ललित

वाङ्मयात उडालेली दिसते. उदाहरणार्थ, आगरकरांच्या, फुल्यांच्या किंवा लोकहितवादींच्या विचारांनी एक विलक्षण असे वैचारिक वातावरण निर्माण झाले होते, की ज्या वातावरणातून हरिभाऊ आपटे म्हणा किंवा केशवसुत निर्माण होणे पुढे अपरिहार्य झाले. तशा प्रकारचे वातावरण आज कितपत निर्माण होत आहे, याची मला शंका आहे. खरे म्हटले तर आज आपल्याजवळ लोकांपर्यंत विचार पोहोचविण्याची कितीतरी साधने आहेत. परंतु प्रश्न इतके निर्माण झालेले आहेत की, कोणत्याच एकावर नीटसे लक्ष केंद्रित होत नाही. त्यामुळे मधूनमधून पददलितावर बोलणे ही एक Fashion व्हावयाला लागली आहे, पण त्यावर concentration होत नाही. आज या प्रश्नाबाबत भरपूर सहानुभूती आहे. परंतु नुसती सहानुभूती असून भागत नाही. मी या मताचा आहे की एखादा विचार जेव्हां एखाद्या समाजामध्ये अत्यंत प्रभावीपणे व्यक्त केला जातो, तेव्हां त्याला ज्या प्रमाणात विरोध होईल, त्या प्रमाणात तो विचार जोरात पुढे येतो. उदासीनता ही फार वाईट. मला उदासीनता दिसते. म्हणजे असे की आता काय आम्हीं कायदाच केला आहे, आम्ही शाळांमधून दलितांना प्रवेश देतो, त्यांना scholarships देतो, त्यांच्यासाठी निरनिराळ्या क्षेत्रात जागा राखून ठेवतो. या सगळ्यामुळे पददलितांचा प्रश्न जणू सुटला आहे असे आपण समजतो. जी अस्पृश्यता कुठेतरी आम्हाला बोचायला पाहिजे, ती मग बोचत नाही. म्हणजे जवळ जवळ आमच्या दृष्टीने अस्पृश्यतेचा प्रश्न सुटला आहे. परंतु कायदा नुसता करून चालत नाही. असले प्रश्न भावजीवनात सुटायला हवेत. मी जेव्हां एखाद्या पददलित समाजातील माणसाबरोबर बोलेन, तेव्हां आमच्या दोघांच्याही अंतःकरणात आम्ही equal आहोत ही भावना असायला हवी. हा भावनिक भाग जोपर्यंत होत नाही, तोपर्यंत पददलित समाजातील व्यक्तीला आत्मविश्वास येणे कठीण आहे. हे व्हावयाला दुसऱ्याने दोन चार पावले पुढे यायला पाहिजे. आणि ते patronizingly नव्हे. आज ज्या पददलित लेखकांची अस्मिता जागृत व्हावयाला लागली आहे, त्यांच्या लिखाणात जर, नुसता संताप अवतरला, तर त्याबद्दल तक्रार करण्याचे कारण नाही. या संदर्भात मी एक माझा अमेरिकेतील अनुभव सांगतो. Los Angelesला असतांना मला एकदा Le Roi Jonesची नाटके पाहण्याचा प्रसंग आला. ही नाटके

एखाद्या गॅरेजसारख्या किंवा गोठ्यासारख्या ठिकाणी सादर केली होती. त्याला चांगले थिएटर मिळू नये अशी गांवातल्या गोऱ्या लोकांनी व्यवस्था केली होती. नाटक सुरू होण्यापूर्वी त्या नाटकाच्या दिग्दर्शक व निर्मात्याने पुढे येऊन सांगितले की, "गावातल्या एकाही वर्तमानपत्राने आमची नाटकाची जाहिरात छापली नाही. आम्ही हवे तितके पैसे द्यायला तयार असतानासुद्धा. तेव्हां हा प्रयोग बघितल्यावर तुम्हाला तो जर पसंत पडला, तर तुम्ही तुमच्या मित्रांना सांगा. कारण आमच्याजवळ दुसरे जाहिरातीचे साधन नाही." आता ही परिस्थिती अमेरिकेसारख्या लोकशाहीचा बालेकिल्ला समजल्या जाणाऱ्या राष्ट्रात आहे, Le Roi Jones हा अत्यंत संतापलेला एक निग्रो लेखक आहे. मला वाटते, अशी संतापलेली माणसे आपल्याकडे निर्माण व्हावयाला पाहिजेत. उदासीनतेपेक्षा संताप येणे हे अधिक बरे असे मला वाटते. १९ व्या शतकात जे आगरकरांनी लिहिले, त्याविरुद्ध भयंकर संतापाची लाट उठली होती. हा प्रखर विरोध त्यांना झाला म्हणूनच, मला वाटते, आगरकरांनी प्रतिपादिलेल्या बऱ्याचशा सुधारणा ह्या प्रत्यक्षात येऊ शकल्या. समाज जेव्हां उदासीन होतो, तेव्हां तो भयावह आहे असे मला वाटते. ह्या पददलित समाजातील नवीन लेखकाने आपण काय लिहितो, म्हणजे आपण जे लिहितो ते कथा कादंबरी किंवा इतर forms चे रूप घेते की नाहीं याचा विचारच करू नये. आता अशी वेळ आली आहे की, त्याचा जो काही raw experience आहे, तोच इतका अर्थपूर्ण आहे की तो कुठला form घेतो याला माझ्या दृष्टीने महत्त्व नाही. त्याला form येणारच आहे. हा अनुभव reportage च्या स्वरूपात व्यक्त झाला तरी त्याचा परिणाम विलक्षण प्रभावी होणार आहे. कारण मराठीत असे साहित्य नाहीच मुळी! जे साहित्य मराठीत आता आहे, ते सगळे सहानुभूती निर्माण करणारे आहे, which I don't like. या नवीन लेखकाने आत्मचरित्रवजा लेखन करावयास हरकत नाही. त्यांनी form चा विचार करूच नये.

**बानखडे**:–आता दुसरा प्रश्न असा की, कोणत्याही साहित्याला tradition लागते. तेvaccumमध्ये निर्माण होऊ शकत नाही, त्याबद्दल T. S. Eliot चाच

निर्वाळा द्यायला पाहिजे असे काही नाही. ह्या नवीन पददलित लेखकालाही tradition लागणारच. तो पांढरपेशा वर्गाने निर्माण केलेल्या tradition वर विसंबून राहू शकत नाही. कारण ज्या सामाजिक मूल्यांवर ह्या पांढरपेशा वर्गातील लेखकांच्या traditions उभारलेल्या आहेत, त्याच सामाजिक मूल्यांविरुद्ध हा नवीन लेखक बंड करून उठला आहे. तेव्हां साधुसंतापासून किंवा केशवसुतांपासून म्हणा, ह्या traditions हा नवोदित लेखक घेऊ शकेल काय?

**कुलकर्णी**:–साधुसंतामध्ये ज्ञानेश्वर आणि तुकाराम या दोघांचा वैचारिक व वाङ्मयीन वारसा मानायला हरकत नाही. मर्ढेकरसुद्धा तुकारामाचा आधार घेतात ज्ञानेश्वर आणि तुकाराम यांनी जरी आपल्या दृष्टीने पुरेसे बंड केले नाही, तरी त्यांच्या काळाच्या मानाने ते बंडखोर होते. हे दोघेही त्यांच्या काळातील अंत्यजच होते. ज्ञानेश्वरापेक्षाही तुकाराम या नवीन लेखकाला अधिकच जवळचा. तुकाराम आणि केशवसुत यांचे फार जवळचे नाते आहे अशी माझी आवडती समजूत आहे! "जे का रंजले गांजले।त्यासी म्हणे जो आपुले।तोची साधू ओळखावा।देव तेथेची जाणावा॥" ही जी तुकारामाची भूमिका आहे, ही एका अभंगातून आलेली नाही. अनेक अभंगातून व्यक्त झाली आहे. ही त्याची भूमिका आणि केशवसुतांपुढे पडलेल्या एका अंत्यजाच्या मुलाचा प्रश्न यात कुठेतरी नाते आहे. त्याचप्रमाणे दुसरी भूमिका म्हणजे आध्यात्मिक भूमिका, "अणूरेणूया थोकडा तुका आकाशाएवढा।" मी आकाशाएवढा आहे. हीच भूमिका, "मी हा शद्बचि मजला नलगे॥" किंवा, "विभूति माझी स्फुरत पसरली विश्वामाजी।" या शद्बांमध्ये केशवसुतांमध्ये व्यक्त झाली आहे. तेव्हां तुकारामामध्ये या लेखकांना tradition सापडणे शक्य आहे.

**वानखडे**:–ह्या पददलित समाजाच्या नव्या लेखकाला किंवा दिलीप चित्रेसारख्या परंपरागत मूल्यांविरुद्ध बंड करणाऱ्या लेखकाला म्हणा, टीकाकाराकडून एक प्रकारचे recognition लागेल. टीकाकाराची एक positive भूमिका आहे असे मला वाटते आणि त्यामुळे ह्या सबंध प्रश्नात समीक्षकला एक definite role घ्यावा लागेल. याविषयी आपले काय मत आहे?

कुलकर्णी:–Recognition ऐवजी cognisance असा शद्ब वापरलेला बरा. म्हणजे टीकाकारांनी प्रखर विरोध केला, तरी त्या लिखाणाची दखल घेतली असेच होणार आहे. मला तरी खात्री आहे, की ज्या लिखाणामध्ये ओबडधोबडपणा असला तरी जिवंतपणा आहे त्या लिखाणाची अनास्था होत नाही. त्या लेखनावर लोक तुटून पडतील. परंतु त्याच्याकडे कानाडोळा करु शकत नाहीत आणि तेच येथे हवे आहे.

वानखडे:–माझे म्हणणे असे आहे की formalist position घेतलेल्या टीकाकाराला म्हणजे जीवनाचा आणि कलाकृतीचा संबंध नाही असे प्रतिपादन करणाऱ्या टीकाकाराला, ह्या नवीन लेखकाचे मूल्यमापन करताना आपली भूमिका बदलावी लागेल असे नाही का ?

कुलकर्णी:–तुम्ही म्हणता त्याप्रमाणे मराठीमध्ये जी एक formalist किंवा contextual टीका होती, ती एका आत्यंतिक टोकाला गेलेली टीका होती. ती थोडीशी प्रतिक्रियात्मक होती. त्यापूर्वीची टीका ही वाङमय समाजाला हितकारक आहे किंवा नाही–ते सुद्धा संकुचित दृष्टचा, सामाजिक बंड-खोरीच्या दृष्टीने नव्हे–हे बघत होती. बंडखोरीच अहितकारक आहे असेच त्या समाजाला वाटत होते. कथा कादंबऱ्यातील विषय समाजाच्या नीतीला पोषक आहे की नाही हा प्रश्न त्यांच्यापुढे असे. याची प्रतिक्रिया म्हणजे formalist किंवा contextual टीका. ही प्रतिक्रिया जरी झालेली असली तरी आज टीका अनुभूतीचा कस काय आहे यालाच निश्चित महत्त्व देते असे मला वाटते. माझ्या टीकेमध्ये मी या गोष्टीकडे कधी दुर्लक्ष केले आहे असे मला वाटत नाही. अनुभूती (experience) आणि अभिव्यक्ति (expression) ह्यांच्यात अभिन्नत्व आहे, हा मुद्दा आमच्याकडूनच वारंवार प्रतिपादन केला गेला आहे. हा आजचा महत्त्वाचा दृष्टीकोन आहे की, 'it is really the experience that decides expression.' म्हणजे तुम्हाला अनुभूती आणि अभिव्यक्ती या दोघांचा एकदमच विचार केला पाहिजे, वेगळेपणाने करता यायचा नाही. 'Art is whole, indivisible' असे आमचे म्हणणे आहे, माझ्या दृष्टीने ही टीका साफ फसलेली आहे. आणि ती माझ्या दृष्टीने मराठीमध्ये मूळ धरु शकणार नाही. उदाहरणार्थ मर्ढेकरांनी 'खेड्यातील रात्र' ह्या कवितेचे एक परिक्षण करुन दाखविले. पण असली टीका काही टिकत नाही, त्याचे कारण असे की, तीमध्ये aesthetic approach

इतका तंत्रात्मक बनतो, की ललित कृतीतले सगळे सौंदर्य त्यातून निसटून जाते, तंत्र फक्त लक्षात राहते. Mardhekar has failed in this and we are conscious of it. ही टीका मराठीमध्ये तग धरील असे मला वाटत नाही. पूर्वी कादंबरीचा विषय काय आहे हे बघू या, असे जे म्हणत असत, तशी dichotomy करता येणे अशक्य आहे, अशी जाणीव आता झालेली आहे म्हणून मला म्हणायचे आहे की, ह्या नवीन लेखकांनी form चा विचार करण्याचे काही कारणच नाही. गेल्या पंचवीस वर्षातील कथा किंवा कविता बघा. ती form मधून बाहेर पडते आहे, जे काहीतरी वेगळे करण्याचा प्रयत्न करते आहे, ह्याचा आज विचार केला जातो. म्हणून नवीन पददलित समाजाच्या लेखकांना टीकाकारांकडून response मिळणार नाही असे मला बिलकूल वाटत नाही.

**वानखडे**:–आणखीन एक प्रश्नः काहीजणांचे मत असे आहे, की आजच्या टीकाकारांमध्ये social anthropological approach असायला पाहिजे तो नाही. वाङ्मयाचा आणि जीवनाचा संबंध जर असेल, तर या नवीन वाङ्मयाचे मूल्यमापन करतांना social anthropological approach ठेवण्याची विशेष गरज आहे. myths ह्या, ज्या कोणत्याही समाजाचा आधार म्हणून असतात. उदाहरणार्थ, हिंदू समाजाच्या राम-सीता किंवा ख्रिचन समाजाचा cross वगैरे ह्या myths व इतर social anthropology च्या भागाचा टीकाकारांनी अभ्यास करणे आवश्यक आहे.

**कुलकर्णी**:–बरोबर. परंतु नुसतेच असे म्हणून भागणार नाही. social anthropological approach साठी जे equipment लागते ते टीकाकाराला उपलब्ध होईपर्यंत हे नुसते म्हणणे व्यर्थ आहे. त्यादृष्टीने आपल्याकडे विद्यापीठामध्येसुद्धा प्रयत्न होत नाहीत. आपण literature जे अभ्यासक्रम आखतानासुद्धा हा दृष्टीकोन कितपत ठेवतो हा एक महत्वाचा प्रश्न आहे. literature ला इतरdisciplines चे foundationलागते, व त्यासाठी त्यांचा अभ्यास व्हायला पाहिजे, हेच नेमके अजून आपल्या लक्षात आले नाही, आपण ज्या टीकाकाराला महत्त्व देतो, तो बहुधा अध्यापक वर्गातलाच असतो, हा अध्यापक वर्ग ज्या विद्यापीठाने निर्माण केला आहे, ते विद्यापीठ या बाबतीत काय करते, असा जर विचार केला तर असे

दिसून येईल की, आमचे जे सगळे courses आहेत, ते सगळे traditional आहेत. मी नेहमी म्हणत असतो की, sociology psychology, anthropology ह्याचा पाया असेपर्यंत literature चा अभ्यास हा वरवरचा होणारच. कारण आज निरनिराळ्या disciplines मध्ये frontiers राहिले नाहीत. तेव्हां या दृष्टीने university-literature courses बद्दल आपण गंभीरपणे पुनर्विचार केला पाहिजे.

**वानखडे**:–आपण myths कडे पुन्हा वळू या. myths ह्या कोणत्याही समाजाला आवश्यक असतात व त्या literature मधून variant forms घेत असतात. ह्या पददलित समाजातील नवीन लेखकांनी हिंदू-समाजाच्या myths जर reject केल्या असतील व त्या reject करायला त्यांना सबळ अशी कारणेही आहेत. उदा. राम हा शंबूकाचा वध करतो. ही myth हा पददलित समाज कसा ग्रहण करू शकेल? तर त्यांना ह्या जागी नवीन myths निर्माण कराव्या लागतील.

**कुलकर्णी**:–आपण पददलितांनी हिंदूच्या myths चा त्याग केला आहे असे निश्चितपणे म्हणू शकतो का? कारण मला असे वाटत नाही, की राम, सीता, पांडव यांच्यासारख्या myths reject झाल्या किंवा होऊ शकतील. उदा. द्रौपदी व कर्णाची myth नवबौद्धांना reject करण्याचे काही कारण नाही असे मला वाटते. नवीन myths निर्माण करणे आपण समजतो तितके सोपे नाही. कारण myth ह्या शब्दाचा माझ्या दृष्टीने अर्थ म्हणजे समाजाची एक प्रकारची past memory आणि ही memory तुम्ही नवीन निर्माण करू शकत नाही.

**वानखडे**:–प्रश्न असा आहे की, नवबौद्धांचा किंवा दिलीप चित्रेसारख्या लेखकांचा ह्या myths वर विश्वास आहे का?

**कुलकर्णी**:–विश्वास आहे का असे म्हणण्यापेक्षा, त्यामधल्या कोणत्या myths त्यांना जवळच्या वाटतात असा प्रश्न आहे. उदा. शंबूकाची myth विसरणे अशक्य आहे की जिथे रामसुद्धा पेचात आलेला आहे. रामाला इथे दिसतय की हा अन्याय आहे आणि तरी तो त्यातून बाहेर निघू शकत नाही. किंवा विश्वामित्राची myth घ्या. तो म्हणतो की, मी का म्हणून ब्रम्हर्षी नाही? विश्वमित्र प्रतिसृष्टी निर्माण करतो आहे. मला वाटते ह्यामध्ये अजून सामर्थ्य आहे. पाश्चात्य वाङ्मयामध्ये जसा

James Joyce हा Ulysees कडे गेला, तसा आमचा नवीन लेखक रामायण महाभारताकडे का जात नाही हेच मला कळत नाही.

**वानखडे:**–पण जो परंपरागत मूल्यांविरुद्ध बंड करुन उठला आहे, तो तर म्हणेल की, ह्या myths तोडून फोडून फेकून दिल्या पाहिजेत.

**कुलकर्णी:**–पण त्या अगोदर त्यांच्याशी परिचय व्हायला पाहिजे आणि हेच मला आज दिसत नाही. आमच्या पांढरपेशा समाजात तरी निदान मला हे दिसायला लागले आहे. परंतु असेही दिसते की, गेल्या काही वर्षात महाभारत आणि रामायण ह्यावर नवीन ग्रंथ लिहिलेले आपल्याला सापडतात, उदा. इरावती कर्वे, दुर्गा भागवत इत्यादी आणि आनंद साधले यांनी तर महाभारताचे debunking च केले आहे.

**वानखडे:**–परंतु हे myth चे destruction नव्हे का ?

**कुलकर्णी:**–नाही. माझ्या दृष्टीने ते revival of interest आहे. मी म्हणतो, पददलित समाजातील लेखकांनी या ग्रंथाकडे का वळू नये ? त्यांनी जरूर लिहावे 'साधले' सारखे debunking करावे, त्यांच्या नवीन दृष्टीतून ते नवीन interpretation करतील आणि ते पाहिजे आहे. मला वाटते scheduled castes नी असे कधीच वाटून घेऊ नये की, 'I don't belong. But I do belong and this is my interpretation of Mahabharat and Ramayana'. असेच म्हणून त्यांनी पुढली वाटचाल केली पाहिजे.

**('अस्मिता' प्रथमांक)**

**चर्चा दिनांक १६-११-६७ व २४-११-६७**




# दलितांचे साहित्य : जाणिवा, प्रवृती आणि प्रेरणा

* डॉ. म. ना. वानखडे * प्रा. वा. ल. कुलकर्णी * प्रा. भालचंद्र नेमाडे
* वि. वा. शिरवाडकर * दया पवार * प्रा. म. भि. चिटणीस
* बाबूराव बागूल * दि. के. बेडेकर * प्रा. नरहर कुरुंदकर

## प्रश्नावली

१. मराठी साहित्य परंपरेबद्दल तुम्ही कोणती भूमिका घेऊ इच्छिता?

(अ) ज्ञानेश्वरापासून एकोणिसाव्या शतकापर्यंतचे साहित्य प्रामुख्याने हिंदु धर्माच्या आणि चातुर्वर्ण्य व्यवस्थेच्या चौकटीत निर्माण झालेले साहित्य आहे, तेव्हां साहित्याबद्दल तुमच्या प्रतिक्रिया कोणत्या आहेत? या साहित्यातील कोणत्या जाणिवांशी आपले नाते आहे असे तुम्हास वाटते?

(आ) एकोणिसाव्या शतकापासून ते आजतागायत जे साहित्य निर्माण होत आहे ते जाणिवांच्या दृष्टीने धर्मातील असले तरी ते साहित्य प्रामुख्याने मध्यमवर्गीयांच्या सुखदु:खाचे चित्रण करीत असलेले दिसते. या साहित्यातून ज्या जाणिवा व्यक्त झाल्या आहेत, किंवा होत आहेत त्यांच्याशी आपले काही नाते आहे असे तुम्हास वाटते काय ? तसेच या साहित्याने, रूपाबद्दल आणि भाषेबद्दल जे काहीं प्रयोग केले आहेत व जे काही प्रयोग सध्याही केले जात आहेत ते व यापैकी आज जी रुपे व जी भाषा स्थिरावली आहे ती तुम्हाला तुमच्या जाणिवांच्या अभिव्यक्तीसाठी स्वीकारार्ह वाटतात काय ?

(इ) आजपावेतो मध्यमवर्गीयांनी दलितांच्या जीवनाची जी चित्रे रेखाटली आहेत त्यात दलितांच्या जीवनाचे दर्शन कितपत उमटले आहे ?

२. बहुसंख्य दलितांनी बौद्ध धर्म स्वीकारल्यामुळे दलितवर्गीय लेखकांच्या वाङ्मयीन जाणिवांत त्याचे प्रतिबिंब उमटले आहे काय ? बौद्ध धर्माच्या श्रद्धा व त्यातील पुराणकथा (Myths) यामुळे दलित लेखकांच्या भावविश्वात व जाणिवांत काही बदल झाले आहेत काय ?

बौद्ध धर्माच्या स्विकारामुळे नव्या धार्मिक श्रद्धा व्यक्त करणारे वाङ्मय निर्माण करण्याची आवश्यकता तुम्हास वाटते काय ? तसेच एकूण मानवी जीवनाचा वेध घेताना धार्मिक भूमिकेतून किंवा श्रद्धांमधून मानवी जीवन लक्षात घेतले पाहिजे असे तुम्हास वाटते काय ?

३. प्रस्थापितांविरुध्द आज नव साहित्यात जो सूर उमटतो आहे तो दलितांच्या जाणिवा कितपत व्यक्त करतो? या घटकेला जे साहित्य निर्माण होत आहे त्यातून व्यक्त होणाऱ्या जाणिवांपेक्षा दलितांच्या जाणिवा वेगळ्या आहेत काय ? असल्यास हे वेगळेपण कोणत्या प्रकारचे ?

४. दलितांतून जन्माला आलेला लेखकवर्ग जे साहित्य निर्माण करीत आहे ते मध्यमवर्गीयांच्या साहित्यापेक्षा जाणिवा, रुपे व भाषा या सर्व दृष्टींनी भिन्न आहे काय ? त्याबरोबरच दलितांच्या जीवनाचे यथार्थ व सम्यक् असे चित्रण आज या वाङ्मयातून केले जात आहे असे तुम्हास वाटते काय ? दलितां-वर शतकानुशतके जो अन्याय झाला व त्यामुळे या समाजातील व्यक्तिमनात जे भावनिक ताण निर्माण झाले त्याचे आजच्या साहित्यात प्राधान्याने चित्रण होत असल्यास हे वाङ्मय एकारले जाण्याची व सांकेतिक बनण्याची भीती आहे असे कितपत म्हणता येईल ?

५. दलित समाजाच्या सध्याच्या विकास–कालात दलित समाजातील त्रुटींचा विचार करणारे पुरेसे आत्मपरिक्षणात्मक वैचारिक वाङ्मय निर्माण होत आहे असे तुम्हाला वाटते काय ? अशा प्रकारच्या साहित्यामुळे जे एक वैचारिक वातावरण निर्माण होते त्यातून ललित वाङ्मयालाही एक बळ प्राप्त होईल असे तुमचे मत आहे काय ?

आज ज्या संक्रमणावस्थेतून हा समाज जात आहे त्या अवस्थेतील ललित साहित्यालाही समाजविकासाला चेतना देणारे एक प्रयोजन आवश्यक आहे काय ?

६. दलितांचे जे ललित वाङमय निर्माण होत आहे त्यावर वाचकांच्या प्रचलित अभिरुचीचे वाङमय विषयक कल्पनांचे दडपण पडते काय ? व परिणामी नव्या जाणिवांचे साहित्यही जुन्या परंपरागत चक्रात अडकून पडते असे तुम्हास वाटते काय ?

७. अलिकडे दलितांच्या वेगळ्या संस्था स्थापन झालेल्या दिसतात व त्यांची वेगळी साहित्य संमेलनेही भरविली जातात, तसेच स्वतःची वेगळी नियतकालिकेही निघतांना दिसतात. प्रचलित साहित्य संस्था संमेलने व वाङमयीन नियतकालिके यांच्यात सहभागी होण्याच्या प्रयत्नांत अपयश आल्याने अशा प्रकारचा वेगळा साहित्य संसार थाटण्याची गरज वाटल्यामुळे अशा संस्था निर्माण झाल्या आहेत काय ? अशा प्रकारच्या वेगळ्या स्वतंत्र संस्था कायमच्या वेगळ्या असल्या पाहिजेत काय ? की दलित वर्गाच्या वाङमयीन विकासाला या संक्रमण काळात वेगाने चालना दिली जावी व समाजातील सर्व वर्ग लवकरात लवकर समान पातळीवर आणावेत म्हणून अशा वेगळ्या साहित्य संस्थांची गरज आहे काय ? अशा वेगळ्या संस्थांमधून दलितांच्या वाङमयीन गरजा व उद्दिष्टे भागविली जातात असे म्हणता येईल काय ?

८. टीकाकार तुमच्या वाङमयाची योग्य ती दखल घेतात असे तुम्हास वाटते काय ?

तसेच तुमच्या वाङमयावर होणारी टीका ज्या वाङमयीन निकषाधारे केली जाते ते निकष तुम्हास तुमच्या साहित्याच्या आकलनास कितपत पुरेसे वाटतात ?

तुमच्या वाङमयाचे स्वरूप लक्षात घेण्यासाठी कोणत्या प्रकारची वाङमयीन भूमिका स्वीकारली गेली पाहिजे ?

# बंडाच्या यशस्वितेसाठी आत्मशोध आवश्यक

* डॉ. म. ना. वानखडे

मराठी साहित्याची परंपरा ही दलित वर्गातील लेखकाला स्वीकारता यायची नाही. कारण त्या परंपरेत त्याला आपले वाटावे असे काही नाही. संत वाङमयाबद्दल बोलायचे झाले तर त्यात चातुर्वर्ण्य व्यवस्थेच्या उतरंडीबद्दल काहीही लिहिलेले दिसत नाही. किंबहुना समाजाच्या समस्यांचे प्रतिबिंब त्यात पडलेले दिसत नाही. भक्तीचा मळा पिकवणाऱ्या संतांना स्वतःच्या मुक्तीचाच ध्यास लागलेला. स्वतःची मुक्ती ही अर्थातच हिंदू धर्माचीच शिकवण. व्यक्तीने समाजासाठी काही केले पाहिजे याची जाणीवच हिंदू धर्माला नाही अस्पृश्याच्या मुलाला वाळवंटातून स्वतःच्या कडेवर घेतल्याने सामाजिक क्रांती होत नसते. या संताचा स्थायीभाव म्हणजे भक्ती व सहनशीलता. त्यांच्या वाङमयात बंडाला स्थान नाही. हयाला अपवाद आहे चक्रधर व महानुभाव पंथाचे वाङमय. त्यानी चातुर्वर्ण्यावर हल्ला चढविला. हा एक अपवाद सोडला तर ज्ञानेश्वरां-पासून ते एकोणिसाव्या शतकापर्यंतच्या साहित्यातील जाणिवांशी दलित लेखकांचे काही नाते नाही.

जातिव्यवस्थेबद्दलची चीड केशवसुतात मात्र आढळून येते. "गत शतकाची पापे घोरे। क्षालायाला तुमची रुधिरे॥" असे त्यानी ठणकावून सांगून नव्या मनूचे चित्रण आपल्या कवितातून केले. परंतु त्यांच्याशिवाय आतापर्यंतच्या वाङमयात मध्यमवर्गीयांनी मध्यमवर्गीयांसाठीच म्हणून लिहिलेल्या साहित्यात मध्यमवर्गीयांनी मध्यमवर्गीयांच्याच सुखदुःखांचे चित्रण केले आहे. या लेखकांचे जीवन किंवा त्यांचे प्रश्न हे दलित वर्गाचे केव्हांच नव्हते. शिवाय या साहित्याचे रूप व भाषा ही दलित वर्गाच्या जाणिवांच्या अभिव्यक्तीसाठी पुरी पडू शकत नव्हती, कारण दलितांच्या सुखदुःखाचे अनुभव हे या मध्यमवर्गीय लेखकांच्या अनुभवाच्या व भाषेच्या पलिकडचे होते. दलित वर्गीय जीवन, संस्कार, भाषा

ही, हिंदू धर्माच्या सगळ्या वरिष्ठ जातींपेक्षा वेगळीच असल्यामुळे, मध्यम वर्गीयांच्या आकलनाच्या बाहेर होती. हे दलित वर्ग खऱ्या अर्थाने हिंदू नव्हतेच. या खंडात आर्यांच्या पूर्वी राज्य करणाऱ्या नाग जमातीतील, नंतर आर्यांनी जिंकून समाजाच्या बाहेर फेकलेला, बुद्धाच्या वेळेस बौद्ध झालेला व शंकराचार्यां नंतर पुन्हा एकदा दास्यत्वाचे जू मानेवर लादलेला (डॉ. आंबेडकरांची Broken Men ही थियरी) असा हा समाज हिंदू धर्माचा खऱ्या अर्थाने घटक कधीच नव्हता. अशा या वर्गाचे चित्र रेखाटण्याचा जो काही केविलवाणा प्रयत्न काही मध्यमवर्गीय लेखकांनी केला (खांडेकर, माडखोलकर, विभावरी शिरूरकर र. वा. दिघे इत्यादी), त्यात अर्थात् दलितांच्या जीवनांचे सत्य दर्शन होऊ शकले नाही. कारण नुसत्या कल्पनेच्या जोरावर वाङ्मयात सत्य चित्रण होऊ शकत नाहीं. त्याला थोडा तरी अनुभवाचा पाया लागतो. दूर उभे राहून किंवा खोलीत बसून ह्या मध्यमवर्गीय लेखकांनी दलितांविषयी जे लिहिले ते सामाजिक सुधारणेचा भाग म्हणून वाखाणले गेलेही. व्यंकटेश माडगूळकरांची 'बेत' ही लघुकथा या बाबतीत उदाहरण म्हणून देता येईल. या कथेबद्दल 'अस्मितादर्श' च्या १९६८ सालच्या दिवाळी अंकातील वाङ्मय विषयक चर्चेत (पान १३८) श्री. दया पवार यांनी जी प्रतिक्रिया व्यक्त केली ती सगळ्या दलित वर्गाची होती. ही लघुकथा वाचल्यानंतर दलितांच्या दारिद्र्याचा मना-वर परिणाम न होता त्यांची लबाडी व हृदयशून्यताच वाचकांवर ठसा ठेवून जाते.

काहीं अलिकडील लेखकांनी जुन्या साहित्यिक मूल्यांविरुद्ध बंड उभारून खालच्या समाजातील थरांचे चित्रण करण्यास सुरवात केली आहे. प्रस्थापितां-विरुद्ध सर्व जगभर आज बंड सुरू आहे, तसेच मराठी साहित्यांतही आहे. परंतु दिलीप चित्रे वगैरे साहित्यिक बंडाची जी भाषा बोलताहेत तीत व दलित लेखकांच्या बंडाच्या जाणींवात फार फरक आहे. श्री. मे. पुं. रेगे म्हणतात की नवबौद्धांच्या साहित्यातील बंड दिलीप चित्रे वगैरेंच्या साहित्यातील बंड, यांचा धागा कुठेतरी जुळून येईल. (महाराष्ट्रातील आज उद्याचा सांस्कृतिक संघर्ष आणि वाङ्मयीन समस्या 'प्रतिष्ठान' पुनर्मुद्रण फेब्रुवारी-मार्च १९६८) परंतु तसे काहीं होईल असा संभव वाटत नाही. कारण दिलीप चित्र्यांचे बंड मुख्यतः जुन्या तंत्राविरुद्ध आहे. नवीन तंत्रावर त्यांचा जास्त भर आहे. चित्रे, खानोलकर, पाध्ये ही बंडखोर मंडळी प्रस्थापितांचाच (Establishment) भाग आहे. १९५० च्या दशकात इंग्रजी वाङ्मयातील

काही लेखक (Angry Young Men) म्हणून ओळखले गेले होते. परंतु प्रसिद्धी मिळाल्यानंतर पांचसहा वर्षातच ही मंडळी तरुणही नव्हती व संतप्तही नव्हती. असेच मराठीतील ह्या तथाकथित बंडखोरांचे होईल. नाक्यावरील भंकसगिरीचे नायक मध्यमवर्गातील तरुणच आहेत व झोपडपट्टयांतील जीवनही मध्यमवर्गीयांच्या डोळ्यांतून दिसते आहे. हा लेखकवर्ग आपण काही नवीन विषय हाताळले पाहिजेत म्हणून झोपडपट्टीकडे, वासूनाक्याकडे वळला, एवढेच. धक्का देण्यासाठी, काहीतरी करण्यासाठी, आपले तारुण्य प्रस्थापित करण्यासाठी म्हणून हृदयात त्याविषयी कुठेतरी खुपते म्हणून नव्हे. दलित लेखकांची जी बंडखोरी आहे ती अन्यायाच्या पोटतिडिकेतून निर्माण झालेली आहे. त्याला आपल्या हृदयाचे दुखणे जगाला सांगायचे आहे म्हणून तो लिहितो.

परंतु ह्या बंडखोरीत जो द्वेष, जी चीड असावयास पाहिजे ती सगळ्या दलित लेखकांत सापडत नाही. (श्री. दया पवार यांचा 'उपेक्षितांच्या नव्या जाणीवा' हा लेख 'प्रतिष्ठान' जुलै १९६९) ना. रा. शेंडे, शंकरराव खरात अण्णा भाऊ साठे हे जुन्या पिढीतील लखक, शंकरराव खरातांना अन्याय, ढोंग याबद्दलची चीड आहे. परंतु चित्र रंगवताना 'मी नुसते चित्र रंगवतो तुम्ही बघा आणि काय ते ठरवा अशी पुष्कळदा त्यांची तटस्थांची भूमिका ग्रेस व केशव मेश्राम यांच्यात व प्रतिमांच्या जंजाळात गुंतलेल्या इतर अलिकडील कवीत काही विशेष फरक दिसत नाही अगदी अलिकडच्या पिढीतील बौध्द लेखक म्हणजे दया पवार, हिवराळे इंगळे दीनबंधु, राजस, सोनकांबळे इत्यादी होत. बाबुराव बागुल हे याच पिढीतील अत्यंत जळजळीत जिवंत व वास्तववादी असे लिखाण करणारे, 'मरण स्वस्त होत आहे' हा त्यांचा अलिकडील लघुकथा संग्रह. मध्यमवर्गीयांच्या झोपडपट्टीच्या कथा, कादंबऱ्या व बाबुराव बागुलांच्या त्याच थरांतील जीवनांच्या कादंबऱ्या वाचल्यावर दोन्हीतील तफावत वाचकांच्या लक्षात येते. बागुलासारख्या सामर्थ्यवान लेखकाच्या ह्या कथा वाचल्यावर जीवनाच्या तळाशी असलेल्या किडयाप्रमाणे जीवन जगणाऱ्या दलित व पिडलेल्या लोकांचे जीवन कसे असते हे अगदी पहिल्यांदाच आपल्याला जवळून दिसते. त्यातील संकेत, प्रतिमा, भाषा ही समर्थ व वेगळीच आहे.

दलितांतील लेखकांच्या जुन्या व नव्या पिढीतील ह्या तफावतीला कारण म्हणजे जुन्या लेखकांवर मध्यमवर्गीय टीकाकारांनी ठरविलेल्या मूल्यांचे

दडपण पडले असावे. "हा परंपरागत मूल्याला चिकटून राहणारा मध्यमवर्गीय टीकाकार आपल्या वाङमयाकडे कसा पाहील असा विचार मनात आल्यामुळे व स्वतःलाही जुन्या मूल्यांच्या जंजाळातून बाहेर पडता येत नसल्यामुळे जुन्या पिढीतील दलित लेखकांची असहाय्य अशी स्थिती झालेली दिसते.

अर्थात् अन्यायाचा कोळसा पुन्हापुन्हा उगाळला गेल्यामुळे दलित लेखकांचे लिखाण एकेरी व सांकेतिक बनण्याची भीती आहे. निग्रो लेखकांची अशीच परिस्थिती झाल्याचे आपणाला दिसते. जेम्स बाल्डविन हा वर्णसंघर्षाबद्दल लिहीत होता तोपर्यंत तो उत्तम दर्जाचे लिखाण करीत होता. परंतु जेव्हां हा विषय कंटाळवाणा होऊ लागला, व त्याने नवीन विषय हाताळण्यास सुरुवात केली. (उदा. समलिंगी भोग) तेव्हां त्याच्या लिखाणाची पातळी घसरू लागली जीवनविषयीचे अनुभव व त्याच्या उत्कट जाणिवा ह्या पुन्हा पुन्हा लिहिणे तर कंटाळवाणे होते. परंतु आपल्या अनुभवाच्या कक्षेबाहेर गेले म्हणजे ते लिखाण दुय्यम प्रतीचे होते. हे दुष्टचक्र आहे. परंतु कोणत्याही संघर्षाला केंद्रित ठेवून लिहिणाऱ्या लेखकाचा हा क्रुस आहे. त्याने तो खांद्यावरून नेलाच पाहिजे व त्याचे दुख भोगलेच पाहिजे.

बहुसंख्य दलितांनी बौद्ध धर्म स्विकारला तरी ह्या लेखकांच्या लिखाणांत ह्या नव्या जाणीवांचे प्रतिबिंब पडलले दिसत नाही. बौद्धधर्म स्वीकारल्यामुळे कर्मठ हिंदूधर्मीयांशी झालेल्या संघर्षावर आधारलेल्या कथा बाबुराव बागुल इत्यादी लेखकांनी लिहिल्या आहेत. परंतु त्यापुढे जाऊन बौद्धधर्माच्या श्रद्धा व त्यांतील पुराण कथा (Myths) यामुळे लेखकाच्या भावविश्वात व जाणीवांत काही बदल अजून तरी झालेले नाहीत. त्याचे कारण म्हणजे हा लेखक दोन जगांच्या मध्ये उभा आहे. त्याचे जुने जग, जाणिवा, श्रद्धा, संकेत हे सारे मरू घातले आहेत पण अजून ते पुरते मेले नाहीत. त्याच्या नवीन जगाला त्याच्या हृदयात रुजण्यास अजून पुरेशी शक्ती आली नाही. इतक्या वर्षाचे जुने हिंदु धर्माचे संस्कार, श्रद्धा, संस्कार व पुराणकथा उखडून फेकून देऊन त्या जागी नवीन धर्माच्या श्रद्धा संस्कार व पुराणकथा स्थापन करण्यास अजून तो असमर्थ आहे. खरे म्हणजे तो आज भांबावलेल्या स्थितीत आहे. त्याची स्थिती व निग्रो लेखकांची स्थिती एकच आहे. दोघांचाही प्रश्न "मी कोण आहे?" हे ओळखण्याचा म्हणजे (Identity) चा आहे. हे दोघेही लेखक म्हणजे wandering jew सारखे आहेत. पण अखेर ज्यूलाही इस्त्रायल मिळाले व

त्याचे शतकांचे भ्रमण थांबले. तसेच निग्रो व बौद्ध लेखकांच्या बाबतीत होईल अशी आशा का करू नये? बाबासाहेबांनी दलिताला बौद्ध धर्माची दिशा दाखविली. परंतु वाङमयात ह्या धर्माच्या जाणीवा व श्रद्धा आणण्यासाठी त्याला जुन्या धर्मापासून जन्मलेल्या जाणीवा व श्रद्धा फेकून द्याव्या लागतील. बुद्धाचे जीवन बौद्ध तत्वज्ञान, जातक कथा आदीतून त्याला नवीन संकेत, प्रतिमा, प्रतिके सापडू शकतील. त्याने जुन्या वाङमयातील archetypes मोडले पाहिजेत ख्रिश्चन वाङमयात जसे येशू, सैतान, आदाम, इव्ह, गार्डन ऑफ एडन वगैरे archetypes आहेत, तसेच हिंदू धर्माने मराठी वाङमयात दिलेले राम, सीता, कृष्ण, कंस, दुर्योधन इत्यादी archetypes आहेत. आपल्या नायिका ह्या सीता किंवा राधा ह्यावर आधारलेल्या आहेत, तसेच नायक राम व कृष्ण यावर जाणूनबुजून नसतील, परंतु अजाणत: निश्चितच् आपल्या कथा कादंबऱ्यांचा प्लॉट ऑफिसमध्य किंवा निऑन लाईटच्या झगझगाटात चमकणाऱ्या शहरात घडत असला, आणि नायक व नायिका हे टेरिलीनच्या कपड्यातील अद्ययावत् मनोवृत्तीचे जरी दाखविले असले, तरी यामधील आदर्श अयोध्या नगरी, राम-कृष्ण व सीताच आहेत असे परीक्षणाअंती आपल्याला आढळून येईल. बौद्ध लेखकाने हीं archetypes व myths बदलली पाहिजेत. कारण archetypes व myths मुळेच कोणतेही वाङमय एकसाची बनते. 'बौद्ध धर्म स्वीकारला, आम्ही नवे वाङमय निर्माण करू, आमचे अनुभव निराळे आहेत, आम्ही बंडाचा झेंडा उभारू' असे म्हणत असतांना जुन्याच वाङमयाचे archetypes, myths प्रतिमा व प्रतिके वापरली, तर बौद्ध लेखकाला स्वत:चा शोध न लागता तो जास्तच भांबावलेल्या स्थितीत जाईल.

त्याला स्वत:चा शोध लागेल आणखी एका गोष्टीमुळे त्याने भरपूर आत्मपरीक्षणात्मक वैचारिक वाङमय निर्माण केले पाहिजे. सध्या ते मुळीच अस्तित्वात नाही. व त्यांची फार गरज आहे. आगरकर, फुले, बाबासाहेब ह्यांच्या लिखाणातून जे एक वैचारिक वातावरण निर्माण झाले, त्यामुळे समाजात बरेच स्थित्यंतर घडून आले आहे. हे वैचारिक वातावरण ललित वाङमयाला पोषक असेच ठरणार आहे तेंव्हां त्याही दृष्टीने त्यांची पावले पडली पाहिजेत.

अलिकडे बौद्ध लेखकांनी आपल्या वेगळ्या साहित्य संस्था स्थापन केलेल्या आढळतात. ह्याचे कारण स्पष्ट आहे. बाबासाहेबांनी त्यांना राजकीय, सामाजिक व आर्थिक दृष्टी दिल्यावर वाङमयाच्या प्रांतातही हा बौद्ध भाग घेण्यास पुढे

आला. परंतु तिथे त्याचा शिरकाव होईना. छापखाने, मुद्रण व प्रकाशन संस्था मासिके सगळे एका विशिष्ट वर्गाच्या हाती व त्यातही पुन्हा त्या विशिष्ट गटाच्या हाती असल्यामुळे ह्या नव्या दमाच्या, नव्या जाणिवांनी भारावून गेलेल्या बौद्ध लेखकाला ह्याही प्रांतात 'अस्पृश्यता' भोगावी लागली. कुणीतरी मुलीचे टोपणनाव घेऊन लिहिले, किंवा ज्या मध्यमवर्गीयांच्या हाती प्रसिद्धी देण्याची ताकद व साधने आहेत अशांचे 'अंगवस्त्र' बनले, तरच एखाद्या दुसऱ्या दलित लेखकाला उजेडात येवून भरपूर प्रसिद्धी मिळेल. या सगळया कोंडीला कंटाळून बौद्धांनी आपल्या साहित्यिक संस्था, मासिके इत्यादी काढण्याचे खटाटोप सुरू केले आहेत. सर्वच प्रांगणांत मानाने जगण्याचे बाळकडू त्यांना बाबा-साहेबांकडून मिळालेले आहे. अर्थात् बौद्धांना मानाची अवस्था प्राप्त झाल्यावर त्याचे वाङमयातील वेगळेपण राहण्याची काहीच गरज भासणार नाही. अशा ह्या वेगळया संस्थांतून मासिकांतून बौद्धांच्या वाङमयीन गरजा व उद्दीष्टे शंभर टक्के भागविली जातात असे म्हणणे बरेच धाडसाचे होईल. पण त्याला मुख्य कारण म्हणजे चालकांची अनिच्छा ही नसून भांडवलाचा अभाव आहे हे होय. आर्थिक विवंचनेतून मुक्त झाल्याशिवाय अशा मासिकांना आतापर्यंत उजेडात न आलेल्या लेखकांना उत्तेजन देता येत नाही, हे खरे आहे.

शेवटी या संदर्भात वाङमय हे समाजाभिमुख असलेच पाहिजे का या प्रश्नाचा विचार करू या. समाज व ललित वाङमय ह्यांचा फार जवळचा संबंध आहे हे कोणीही सूज्ञ माणूस नाकबूल करणार नाही असे मला वाटते. कोणतेही वाङमय समाजापासून दूर राहून जिवंत राहू शकत नाही. समाजातील घडामोडीचे प्रतिबिंब कोणत्या ना कोणत्या तऱ्हेने वाङमयात पडत असते व त तसे पडलेही पाहिजे. कारण लेखक हा पोकळीत राहू शकत नाही. समाजातील वातावरणापासून तो निर्माण झालेला असतो व समाजातील वातावरणाला बदलण्याची शक्ती त्यात असते. ही शक्ती जर त्यांनी वाया घालवली तर तो गुन्हा ठरेल असे मला वाटते. कलेसाठी कला हा घोष जगातील सर्व समाजात फार मोठी स्थित्यंतरे झपाट्यांने होत असतांना, निरर्थक वाटतो. आपल्याही देशात स्वातंत्र्य, लोकशाही व शिक्षण या कारणांमुळे आतापर्यंत मुका व दाबून टाकलेला बराच मोठा समाज जागा होत आहे. या राजकीय व सामाजिक स्थित्यंतराकडे मध्यमवर्गीय पांढरपेशा लेखकाचा बघण्याचा दृष्टिकोन सहानु-भूतीचा आपुलकीचा आहे असे म्हणता येणार नाही. मध्यमवर्गाचा राजकीय व सामाजिक जीवनावरचा मक्ता गेल्यामुळे, जो बहुजन समाज वर आला आहे,

त्याच्याकडे हा पांढरपेशा लेखक हेटाळणीयुक्त नजरेने बघतो असे दिसून येते उपहासाचे शस्त्र वापरून त्यावर हा लेखक हल्ले चढविताना दिसतो. सत्ता ही कुणालाही सोडवत नाही मग ती राजकीय असो, सामाजिक असो. वाङ्मयीन मूल्ये व सामाजिक मूल्ये यांची गल्लत करता कामा नये, दलितांच्या वेगळ्या वाङ्मयीन संस्था, मासिके कशाला ? हा प्रश्न अनावश्यक व हेतूतः आहे. असे प्रश्न विचारणाऱ्यांची मानसिक अवस्था सामाजिक व राजकीय स्थित्यंतरावर रुष्ट होणाऱ्या सारखीच आहे असे दिसून येईल. त्यामुळेच टीकाकार आणि हे बहुतेक मध्यमवर्गातलील आहेत, दलित लेखकांची मुळीच दखल घेत नाहीत. हे टीकाकार व ह्या साहित्य संस्था ह्या closed societies आहेत. त्यात बाहेरच्यांना मुळीच वाव नाही. शिवाय ह्या टीकाकारांची मूल्ये मध्यमवर्गीय आहेत. जाणत्या टीकाकारांनी नव्या समाजव्यवस्थेबरोबर येणाऱ्या नवीन साहित्याचे मूल्यमापन नवीन समीक्षा तत्वानुसार केले पाहिजे. आतापर्यंतचे वाङ्मय हे एका लहानशा वर्गाचे लहानसे चित्र होते. दलितांच्या लिखाणांमुळे वाङ्मयाच्या कक्षा रूंदावतील भाषा समृद्ध होईल अशी भावनात्मक भूमिका समीक्षकांनी घेतली तर पुढील पिढींचा वाङ्मयीन इतिहास लिहिणारा त्यांचे आभार मानण्यास विसरणार नाहीं असे मला खात्रीने वाटते.

# जुन्या परंपरेच्या मर्यादा त्याज्य परंतु तिची सामर्थ्ये अभिमानास्पद

* वि. वा. शिरवाडकर

आपल्याकडील सामाजिक व्यवस्थेप्रमाणे, माणूस हा समाजात व देशात जन्मत नाही. तो जातीत जन्मतो, जातीत जगतो आणि जातीतच मरतो. इतर कोणत्याही संदर्भापेक्षा त्याचा जातीचा संदर्भ अधिक पक्का आणि वास्तव असतो. ही व्यवस्था मनोमन रुजली तर माणसे आक्रमक होतात. कोठे खुपली तर अगतिक होतात. पण त्यातून बाहेर पडणे प्राय: अशक्यच होते. जातिव्यवस्थेने त्यांना संरक्षण दिले, कोणत्याही हुकुमशाही व्यवस्थेला जमणार नाही इतके त्यांच्या विचाराचे दलीकारण केले आणि बंडखोरीची शक्यताही नष्ट केली. कप्पा सोडायचा म्हणजे कपाट सोडायचे. जात मोडायची म्हणजे धर्म मोडायचा आणि सगळ्या संरक्षणाचा त्याग करायचा अशा बळकट आणि बांधीव व्यवस्थेत माणसाची विचारशक्ती (किंवा अनुभवशक्ती) किती पुढे जाऊ शकणार? देवाच्या पायाशी भेदाभेद नसावा असे म्हणणाऱ्या संतांचे धर्मकारण किंवा हिंदूची काही एकरूपता पाहणा-या शिवाजी बाजीरावादी नेत्यांचे राजकारण जेथपर्यंत गेले तेथपर्यन्तच. रबराच्या पट्टीचा ताण सुटला की ती पुन्हा पूर्वस्थितीला येते त्याचप्रमाणे हे पुढे जाणेही निष्फळ ठरविण्याची ताकद समाज रचनेत होती. अशा (आणि कोणत्याही जुन्या) समाज व्यवस्थेत न्यायाची कल्पना गैरहजर असते असे नाही तिच्या शिवाय कोणतीही व्यवस्था उभी राहू शकली नसती. परंतु न्याय हा त्या काळी दयेचा विषय होता. हक्काचा नव्हे. तेव्हांच्या आणि आजच्या विचारांतील हा सर्वात मोठा आणि महत्वाचा फरक आहे. या परिस्थितीत आणि परंपरेत आमचे जुने साहित्य निर्माण झाले आहे. यात संत-साहित्य प्रमुख आहे. या साहित्याने करुणेच्या आधाराने का होईना, त्या न्यायाची तीव्र जाणीव प्रगट केली आहे. धर्म ही तेव्हाच्या समाज सुधारणेची मूलाधार शक्ती होती. तेव्हां कोठलाही वैचारिक संघर्ष या शक्ती-

भोवती, तिच्याच परिसरात उत्पन्न व्हावेत हे अपरिहार्य होते. देव धर्माच्या परिघात का होईना पण सर्व समाज एकात्म असावा ही संतांची जाणीव नक्कीच प्रगमनशील होती. ईश्वर सेवेची म्हणजेच धर्माची कल्पना कर्मकांडातून बाहेर खेचून निर्भेळ भक्तीपर्यंत नेणे ही देखील एक मोठी प्रगती होती. या 'बंडखोरी' चे अपरिहार्य असे शासन महानुभावांनी व संतांनी भोगलेही. आता ते अधिक पुढे गेले नाहीत, म्हणजे करुणेच्या कल्पनेपासून हक्काच्या कल्पनेपर्यंत पोचले नाहीत म्हणून त्यांना दोष देणे हे समंजसपणाचे नाही. हक्कांवर आधारलेल्या न्यायाची कल्पना यूरोपातील लोकसत्तेच्या लढ्यात उदयाला आली आणि पुढे मार्क्सच्या विचारप्रणालीत ती सर्वस्पर्शी आणि तत्वबद्ध झाली आपल्याकडील जुन्या परिस्थितीत आणि काळात तिचा आढळ होणे सर्वस्वी अशक्य होते.

वैयक्तिक जाणीवेच्या दृष्टया आमच्या प्राचीन वाङमयाची ही सामर्थ्ये आणि या मर्यादा आहेत. ही परंपरा मला अभिमानास्पद वाटते. काव्यात्मक सौंदर्याचे ऐश्वर्यशाली उन्मेष तिच्यात पाहायला मिळतातच, पण त्याबरोबर त्या काव्यातील प्रगतीचे तत्त्वही तिने काही प्रमाणात व्यक्त केले आहे काही प्रमाणात म्हणायचे कारण, स्वराज्यस्थापनेचा वा विस्ताराचा जो दांडगा प्रयत्न त्या काळात होत होता त्याच्या प्रेरणांची दखल या काव्याने घेतली नाही. परमार्थाच्या पलिकडचे सर्व दरवाजे त्याला बंदच राहिले. समाजातील कर्तबगारीचा पाठिंबा या उद्योगाला जसा मिळाला तसा समाजातील विचारशीलतेचा आणि प्रतिभेचा मिळाला नाही. त्यामुळे हा उद्योग एकांगी राहिला आणि सामाजिक निष्ठांचे विस्तृत अधिष्ठान त्याला मिळाले नाही. मराठेशाही बुडण्याचे हेही एकशे एकावे कारण. साहित्याने कोठे जावे आणि कोठे जाऊ नये या संबंधीचे काही पूर्वग्रह येथे आड आले असावेत. पण अखेरतः कोणत्याही साहित्याचे सामर्थ्य त्याच्या प्रतिभेच्या मर्यादेत आणि त्याच्या वाङमयीन गुणवत्तेत शोधायला हवे. ही दोन्ही गुणवैशिष्टये या साहित्यात आहेत आणि आपले त्याच्याशी काही नाते आहे ही जाणीव मला गौरवदायक वाटते. परंपरेतील इतर सर्व नाकारले तरी वाङमय नाकारायचे काही कारण मला दिसत नाही

एकोणीसाव्या शतकांनंतरचे म्हणजे मुद्रणकालातील आपले साहित्य इतके विपुल आणि विविध आहे की त्यासंबंधी निश्चयात्मक विधाने करणे खरोखरी कठीण आहे. या काळात इंग्रजी सत्ता येथे स्थायिक झाली ही वाङमयाच्या दृष्टीने महत्वाची घटना. त्यामुळे येथील सांस्कृतिक आणि वैचारिक जीवनाला वरच्या स्थरात का होईना, पण एक नवी दिशा मिळाली. या बाबतीत बरीच आदळ-आपट झाली, अद्यापही होत आहे. परंतु ब्रिटिशांच्या बरोबर पाश्चिमात्य वा खिश्चन संस्कृती येथे आली असे समजणे. माझ्या मते चूक आहे. इकडे आली (ब्रिटीशांबरोबर) ती आधुनिक संस्कृती. पाश्चिमात्य वर्चस्वांचे अथवा खिस्ती परंपराचे संदर्भ तिला चिकटलेले असले तरी ती पाश्चिमात्य नव्हती वा खिस्तीही नव्हती. ती नव्या जगाची, नव्या ज्ञानविज्ञानाधिष्ठित परिवर्तनाची संस्कृती होती. (निदान तत्वतः) रानडे, आगरकर, टिळक प्रभृतींचे वैचारिक आणि परांजपे-आपटे-केशवसुत-खाडिल-कर प्रभृतींचें ललित वाङमय या नव्या जाणिवांतून जन्माला आले. प्राचीन काळाप्रमाणे तेथेही प्रस्थापित समाजव्यवस्थेने या नव्या जाणीवांना कुंपणे घातली. जास्तीत जास्त व्यापक प्रमाणात आणि मूलगामी स्वरुपात या जाणिवा मला तरी केशवसुतातच प्रगट झालेल्या दिसतात. परंतु कालमानाचे आणि परिस्थितीचे सूत्र ध्यानात घेतले तर मध्यमवर्गीय (म्हणजे खरोखर ब्राम्हणी) जाणीवांच्या या मर्यादा आपल्याला समजू शकतात. त्यात एक अपरिहार्यता होती हे आपण लक्षात घेऊ शकतो. हरिभाऊ आपटयांनी ब्राम्हणी जीवनाच्या विकासाभोवती आणि वैगुण्याभोवतीच आपल्या कथानकांची उभारणी केली हे सत्य असू शकेल, पण तो दोष होऊ शकणार नाही. ते आपल्या अनुभवांशी प्रामाणिक राहिले हा त्यांचा मोठेपणा. आणि अखेरतः मोठ्या नदीचा उगम देखील लहान असतो. तिचा प्रारंभिक प्रवाहही संकुचित असतो (हे सर्व वैचारिक जाणीवांपुरतेच) हे लक्षात घ्यायला हवे. आपटयांपासून खांडेकर आणि खांडेकरांपासून माडगूळकर, खरात, अण्णाभाऊ साठे अशा काही क्रमाने हा एक जाणीवांचा प्रवाह अधिकाधिक व्यापक होत गेला आहे. पुढच्या पाण्याने मागच्या पाण्याचा निषेध करायचे कारण नाही. मागचे आत्मसात करूनच ते पुढे आलेले असते. इंग्रज आमदानीतील बहुतांश वाङमयनिर्मिती ही ब्राह्मण आणि तत्सम वर्गाची आहे. (ज्याला आपण 'मध्यमवर्ग' हे चुकीचे पण सोयीचे नाव देतो) हे अमान्य करणे किंवा तसे कोणी म्हटले तर त्याचा धिक्कार करणे हे आंधळेपणाचे आहे. असे होणे ऐतिहासिक दृष्टया क्रमप्राप्त होते. स्थावर मालमत्तेत मागास असलेला मध्यमवर्ग इंग्रजांच्या नोकर-पेशात स्थानापन्न होऊन सुविद्य झाला. ह्या वेळेपर्यन्त राज्य कारभारात आघाडीवर असलेले मराठादी वर्ग उगवलेल्या खेडूत

जीवनात आणि मागासलेल्या शेतीवर फेकले गेले. पुढील पन्नास पाऊणशे वर्षात ही परिस्थिती घट्ट झाली. इंग्रजांबरोबर आलेला परिवर्तनाचा प्रकाश पांढरपेशा-पर्यंत पोचला आणि जुन्याच्या उद्ध्वस्त अवशेषांत राहणारे इतर वर्गीय लोक अंधारात सरपटू लागले. इतिहासकाळात नसलेला दुरावा व अलिप्तभाव आता निर्माण झाला. पूर्वीच्या काळी जातींची उच्चनीचता होती, आता त्यात ज्ञानाच्या व शिक्षणाच्या विषमतेचीही भर पडली. एकाच काळात राहूनही दोन वर्गात काळाचे अंतर पडले. हे अंतर तेव्हाच्या साहित्यात प्रतिबिंबीत झाले नसते तर आश्चर्य मानावे लागले असते. पांढरपेशांना आपले जग जवळचे व प्रमुख वाटले आणि साहजिकपणे त्याच पार्श्वभूमीवर त्यांचे लेखन झाले. पण त्यात दिलासा हा की, हे सर्वसामान्यपणे प्रागतिक स्वरूपाचे व नव्या जाणिवांचा शोध घेणारे होते. हेही निरर्थक नव्हते. तलाव–कालवा न्यायाने तलावातला जलसंचय शुद्ध झाला तर कालव्यांनाही ते पाणी मिळू शकते. पुन्हा वाङमय ही वस्तु अशी आहे की एखाद्या वर्गाने ती निर्माण केली तरी ती त्या वर्गापुरती मर्यादित राहात नाही. ओट्यावर लावलेला कंदील, घरधन्याच्या मालकीचा असला तरी बाहेरचा रस्ता प्रकाशित करतो, वाटसरूंना मार्गदर्शन करतो. चांगले साहित्य सर्व समाजावर असेच आपले वर्चस्व स्थापन करते. दहांच्या शृंखला तुटल्या तर इतर शंभर शृंखलाबद्धांच्या शृंखला तुटू शकतात ही नवीन जाणीव मिळते व ती पुढे कार्यकारीही होऊ शकते. पांढरपेशांचे वाङमय प्रतिज्ञेने मर्यादित असले तरी त्याचा असा परिणाम झालेला आहे. आणि म्हणून हे वाङमय कोणी नाकारण्याचे कारण नाही. या साहित्याचे संकोच केवढेही असले तरी त्याने नव्याच्या हाती सामर्थ्यसंपन्न शद्व दिला आहे. अधिकाराच्या, पद्धती दिल्या आहेत. परंपरेचा आत्मविश्वास दिला आहे आणि बराच प्रगल्भ असा वाचकही दिला आहे.

ह्या पूर्वसूत्राबाबत आपल्या पत्रात आज-उद्याबद्दलही बरेच प्रश्न आहेत. दलित हा शद्व आपण बौद्ध वा हरिजन यांच्या संबंधातच वापरलेला दिसतो. मध्यमवर्ग म्हणजे ब्राम्हणवादी वर्ग हे समीकरण जसे चुकीचे तसेच हेही असे मला वाटते. मध्यम-वर्ग ही संज्ञा अर्थव्यवस्थेच्या संदर्भात (विशेषतः मार्क्सवादानंतर) वापरली जाते. ही संज्ञा जातिव्यवस्थेकडे नेऊन अमुक जात म्हणजे मध्यमवर्ग असे म्हणणे बरोबर होणार नाही. ब्रिटिशांच्या काळात आर्थिक सत्तेच्या द्वारा समाजनियंत्रण करणारा वरिष्ठ वर्ग येथे अस्तित्वात नव्हता आणि म्हणून मध्यमवर्गाची मध्यमता हीही काल्पनिकच होती. आता स्वातंत्र्य लोकशाहीच्या आगमनानंतर तर बरीच सर-मिसळ झाली आहे. निदान महाराष्ट्रात तरी पूर्वीचे चित्र झपाट्याने बदलते आहे.

नवीन पांढरपेशा मध्यमवर्ग वेगाने तयार होत असून राजसत्तेशी त्याचा नजीकच संबंध जडत आहे. अर्थतत्त्वावर आधारलेली वर्गरचना यथे अस्तित्वात आली आहे असे गृहित धरून येथील गणिते सोडवायचा आपण प्रयत्न केला तर नेहमी चुकीची उत्तरेच आपल्याला पत्करावी लागतील. ब्राम्हणापासून बौद्धापर्यन्त सर्व जातीत कमी अधिक प्रमाणात आपला दलित वर्ग पसरलेला आहे. संपूर्ण जातीच्या नावानेच मोजणी करायची झाली तर आदिवासी, भिल्ल-कोळी इत्यादी अनेक समाज दलिता वस्थेतच आहेत. म्हणून मला वाटते की, या ठिकाणचे पहिले वास्तव आणि पहिले दुखणे जातिसंस्था हे आहे. आणि त्याच्या अनुरोधाने परिवर्तनाचा विचार व्हायला हवा. नव्या काळातील लढाई जुन्या काळातील शस्त्रांनी अथवा विचारांनी लढणे प्राय : अशक्य असते. त्याप्रमाणे पुराणकालीन संस्थांचा आधार घेऊन आजच्या युगातील वांछिते हस्तगत होणे असंभवनीय आहे. प्रगतिक विचारसरणीला, मग ती सुधारणावादी असो, वा समाजवादी असो, जगात अन्यत्र कोठेही नसलेले हे एक लोकविलक्षण आव्हान येथे आहे. अद्यापही.

'पूर्व दिव्य ज्यांचे त्यांना' हे म्हणायला बरे वाटते. पण आपले पूर्वच 'रम्य भावी काला' च्या मार्गात जागोजाग आड येते आहे. स्वत्व आणि पूर्व या दोन गोष्टी वेगळ्या आहेत. स्वत्व शाबूत ठेवून नव्याची उभारणी करण्याच्या, आपल्या समाजातील विशिष्ट आव्हान स्वीकारण्याच्या प्रेरणा साहित्यात कशा प्रगट व्हाव्यात वा कितपत प्रगट होत आहेत हे सांगणे कठीण आहे. पण सुर्वे, बागूल, खरात, मेश्राम, दया पवार इ. लेखक—कवींचे जे लेखन मी वाचले आहे त्यावरून हवे असलेले एक नवे सामर्थ्य वाङमयात अवतरत आहे असे मला वाटते. एवढेच वाटते की आशा लेखनातील बंडखोरी दिशाहीन असू नये. परिस्थितीच्या दाबा मुळेच आपल्या आणि इतर ठिकाणच्या वाङमयातील (पांढरपेशा' ची बंडखोरी बरीचशी नकारात्मक आहे. सर्वच ठिकाणचे 'दलित वर्ग त्याच्या हक्काची लढाऊ जाणीव घेऊन समाजातील सत्तेच्या केंद्राकडे रेटा देत आहेत. अशा वेळी आमची सिंहासने नष्ट होणार असतील तर सर्व काही नष्ट झालेले बरे अशी भूमिका तेथील प्रस्थापित वर्गानी घ्यावी हे स्वाभाविक आहे. पण ज्यांना नवीन काही निर्माण करायचे आहे त्यांचा रस्ता वेगळा असणार.

# दलित साहित्याला नैसर्गिक स्वातंत्र्य हवे. समुद्राचे, उधाणाचे, वाऱ्याचे; ताऱ्याचे—

* बाबुराव बागुल

या देखण्या देशाचा दुर्धर रोग म्हणजे अस्पृश्यता हिंदू विचारवंत ज्यांच्यापुढे माथा नम्र करतात त्या मुनिमहात्म्यांनी ही अस्पृश्यता इतक्या कुशलतेने रचली आहे की, त्यांच्या अमानुष प्रतिमेने डोके दुभंगून जाते तिला त्यांनी धर्माचे अमोघ सामर्थ्य दिले आहे. तसेच अर्थ, समाज व्यवस्था, ।वाची मांडणी ह्यामुळे ती अभेद्य झाली आहे. धर्मांतर करूनही ती जात नाही. कारण ती मनामनात जाऊन बसलेली आहे. तेथून ती ढळू नये म्हणून शास्त्र, पुराणे, दंतकथा यात केवढी तरी सामग्री भरलेली आहे आणि तिला अचल ठेवण्यासाठी विष्णूचा अंश असलेली राज्ययंत्रणा हातात प्रभुरामचंद्रांनी आणि भगवान श्रीकृष्णांनी दिलेली हत्यारे घेऊन राखणदारीस सज्ज आहे. एवढ्या कडेकोट बंदोबस्तात आणि एवढ्या उच्च आणि अवघड जागेवर असलेल्या किल्ल्यातून कैदी कसा सुटणार? आत्महत्या करायला देखील त्याला संधी नाही. या कैद्याचे जीवन, त्याच्या आशा आकांक्षा, राग, संताप, संघर्ष म्हणजे दलित साहित्य.

दलितांचे साहित्य असू शकते काय? आणि आज जेव्हा मराठी साहित्य कथा, कादंबरी, नाटक, काव्य आणि वैचारिक वाङ्मय एवढी नवनवी रूपे घेत आहे, तरी दलितांचे साहित्य? ते कसे? त्याची जरूरी काय? वैशिष्ट्ये काय? आणि ते वेगळेपणाने वाढावे काय म्हणून?

ह्या सर्व प्रश्नांना उत्तर होय असेच द्यावे लागेल. अगदी निश्चितपणाने कारण दलित साहित्याची उत्पत्ती मराठी साहित्याच्या वैचारिक, ललित शाखेत होत नाही, तर ती होते अस्पृश्यतेत.

इथे अस्पृश्यता नसती, माणसाच्या भौतिक, आध्यात्मिक शक्तींचा संहार करणारी, अगदी राखरांगोळी करणारी शक्ती तिचे ठायी नसती, तिच्याविरुद्ध

गेल्या आठशे वर्षांत किंवा शेपाचशे वर्षांत मराठी हिंदू साहित्याने निर्णायक झुंज सुरू केली असती, ती टिकून रहावी यासाठी हिंदू धर्माने ज्यांना वरचे मानले आहे त्यांनी धडपड केली नसती, सर्वांनी जुन्यानव्या विचारवंतांनी, कलावंतांनी डाव्या उजव्यांनी तिचेविरुद्ध सतत संघर्ष केला असता, खूप मोठमोठी परिवर्तने केली असती तर दलित साहित्याचा जन्म झाला नसता.

दलित साहित्यिकांना देव, धर्म, देश आणि जात ह्यांचा अभिमान नाही दुराभिमान नाही. त्याने जे लिहिलेले असते ते साहित्य असते. टीकाकारांनी सोयींसाठी वास्तववादी, अस्तित्ववादी, समाजवादी अशी काही तरी नांवे दिलेली असतात किंवा थोडी दुसरीही.

अनेक साहित्यिक मित्रांना राग येतो. ते मागे निंदा करतात. तरी दलित साहित्यिक आग्रहपूर्वक सांगतात की, आमचे साहित्य आहे. दलित साहित्य. ते वेगळे आहे. त्याचे वेगळेपण त्याच्या अंगभूत विशेषांमध्ये आहे. ते कोणते?

ते विशेष सांगण्याआधी हे स्पष्ट केले पाहिजे, ते असे. इथे तेवीस-चौवीस वर्षांचे तरणे बांड स्वायंत्र्य आहे, इथे गांधीवाद आहे, विनोबांचा सर्वोदयवाद आहे. सोशलिस्ट आहेत, कम्युनिस्ट आहेत. तरी आदिवासी अजूनही गुहा जीवनाच्याच जवळपास आहेत. डॉ. आंबेडकर आले नसते तर अस्पृश्य समाजही तसाच असता आदिमातेजवळ. रामचंद्र प्रभूने जसा ठेवला होता तसाच राहिला असता.

ते आले आणि अस्पृश्य समाजात माणूसपणाचे वादळ उठू लागले. ते गरगरू लागले. तसे देवाच्या व्यवस्थेचे रखवाले झुंजीला उठले. कोणत्याही परचक्राशी दिली नसेल अशी प्रखर लढत त्यांनी दिली. ह्या लढ्यात प्रचंड संहार झाला. "इंद्रायस्वाहा तक्षकायस्वाहा" ह्या पद्धतीने अनेक संकेत, रूढी परंपरा, श्रद्धा, देव ह्यांचा होम झाला. आणि दलित समाजातील निरक्षर माणूस एकदम वेगळा झाला. नवा झाला. चार्वाक आणि लेनिनही त्याच्या नव्या रूपावर खूष झाला असता. त्यावेळी गांधींच्या आणि डाव्या पक्षांच्या पुढारपणाखालचा सामान्य माणूस राष्ट्रीय स्वातंत्र्य, महात्माजी व त्यांची ऐक्याची विचारसरणी विसरून जात होता, तसाच तो क्रांती, जागतिक कामगारांचे ऐक्य, बंधुभाव आणि वर्गीय नाते विसरून हिंदू असला तर हिंदू होत होता, मुसलमान असला तर मुसलमान होऊन दंग्यात सामील होत होता.

आजही असेच घडते. जातीयवादी पक्ष भरकन बलवान होतात. आणि डावे पक्ष कमकुवत होतात. त्याचे कारण एकंदर भारतीय समाज अजून आधुनिक

होत नाही. याचे उलट बाबासाहेबांनी घडविलेला माणूस मात्र त्याच्या भीषण देव देवता, त्याचे पूजाप्रकार, तो जगलेला जुने पारंपरिक जीवन फेकून देतो. कारण त्याचे मन अग्नीला आलिंगने देऊन, हीन नष्ट करून, कठीण बनलेल्या पोलादासारखे बाबासाहेबांनी बनविले आहे. दलित समाजाचे ते तेजस्वी मन नकार, विद्रोह (संताप) आणि माणुसकीने ठासून भरलेले आहे. बाबासाहेबांनी कुठलाही निर्णायक मरणाच्या दारातून जाणारा लढा पुकारला असता तरी लोक त्यात सामील झाले असते. हसत हसत मेले असते. ह्या लढ्यातून आणि त्यातून बनलेल्या मनातून, माणसातून दलित साहित्य जन्माला आले. डॉ. बाबासाहेब त्याचे जनक तसेच दलितांतील पहिले आणि महान लेखक.

बाबासाहेबांचे वर्तमानपत्रातील निबंध वाचून, भाषणे ऐकून त्यांच्या विचाराने प्रभावित झालेला फार मोठा कवि वर्ग निर्माण झाला. त्यांनी गीते लिहिली, जलसे केले आणि नकारात्मक होऊन लोकांना हिन्दूधर्माच्या बाहेर ओढून काढण्याचे फार मोठे कार्य केले. पण हे साहित्य प्रचारकी असल्याने एकसुरी झाले.

चळवळ वाढत गेली. शिक्षण वाढत गेले. लोक शिकत गेले. नोकऱ्या मिळत गेल्या. आणि एक मध्यमवर्ग अस्पृश्य समाजात तयार झाला. ह्या देशाच्या विशेषाप्रमाणे तो मध्यमवर्ग ऑफिसात पांढरपेशांच्या उपेक्षेला घाबरून आणि आपल्या जन्मखुणा ह्या देशात गौरवाच्या मानल्या जात नाहीत हे पाहून त्या विसरण्याचा यत्न करू लागला. 'ब्राह्मण' किंवा 'साहेब' होण्याचा आटोकाट यत्न करू लागला. काही तर बाबासाहेबांवरच 'ब्राह्मण' होण्यासाठी हल्ले करू लागले. अन् काहींनी आईबाप सोडून दिले. ह्या पराभूतांच्या काळात फडके खांडेकरांचे अनुकरण करणारी कथा लिहिली गेली पण ती वाचली गेली नाही.

ह्यानंतर अण्णाभाऊ साठे उदयाला आले. त्यांच्या काव्यात, तमाशात जा प्रभाव होता तोच त्यांच्या कथांतही होता. दलितांना एक थोर कथालेखक आणि त्यांची कथाही मिळाली होती. तरीही अण्णाभाऊंच्या कथांत अस्पृश्यतेतून आलेली कथा कमी प्रमाणात होती. त्यांची कादंबरी तर मोठ्या संख्येने मराठा वर्गात, श्रीमंत शेतकऱ्यांत घडली गेली. वर्गकलहाचे तत्त्वज्ञान त्यांनी हिंदूंच्या नैतिक मूल्यांवर नेले. अन्याय, अत्याचार करणारे आणि त्याचा प्रतिकार करणारे असे त्यांच्या कादंबरीला 'राम रावण पार्टीचे' रुप आले. खेडे, खेड्यांची

जातीयवादावर असलेली उभारणी आणि अस्पृश्यतेसंबंधी असंतोष त्यांच्या कथांत कमी होता. सामंतशाहीच्या गुणावगुणांवर, त्यांच्या कथेचा लोभ जडलेला होता.

अण्णाभाऊ लिहित असतांनाच शंकरराव खरात लिहू लागले त्यांच्या कथेतील नायक अस्पृश्य समाजातून आले. ते अस्पृश्यतेतील दु:ख, दैन्य दाखवीत राहिले. अण्णाभाऊंचे नायक हिंदू धर्माच्या जातीव्यवस्थेवर, अस्पृश्यतेसंबंधी मुके असतात. (पण अन्याय, अत्याचारांचा प्रतिकार करतात.) शंकररावांचे नायक मात्र सहनशील असतात. अस्पृश्यतेसंबंधी चीड निर्माण करण्याऐवजी अस्पृश्यते बद्दल करुणा निर्माण करतात.

याच काळात अस्पृश्य समाजातून आलेल्या सुशिक्षित तरुणांनी कविता लिहायला सुरुवात केली. ही कविता त्यांच्या जीवनांतून, त्यासंबंधीच्या विचारांतून आलेली नव्हती. तर ती एकंदर मराठी नव्या कवितेच्या प्रेरणेतून आलेली होती. खरे म्हणजे कवीने त्यांच्या जिवंत जीवनानुभवाला कवितेत आणायला हवे होते. पण ते झाले नाही. कारण तो जिथे जन्मला, त्या जातीला, समाजाला ह्या दुर्दैवी देशात कमालीचे तुच्छ मानलेले होते. एखाद्याने त्याची जात सांगितली तर ज्ञानवंत व कलावंत यांच्या बैठकीचे वातावरण पटकन बदलते. पुन्हा सुशिक्षितांना गुणवंताला आपली अवमानलेली जात सांगताना भय वाटते. मन हीनगंडाने झपाटले जाते. पुन्हा प्रकाशनव्यवस्था उच्चवर्णीयांच्या हाती. त्यांना आपले लेखन आवडेल की नाही ही धास्तीच. ह्यात ही पिढी नोकरी मिळवणारी म्हणून स्वत:चे अथवा दुसऱ्याचे डोके फोडून टाकण्याची हिंमत नसलेली शिक्षण आहे, अभिमान आहे, चीड आहे, संताप आहे आणि स्वत:च्या जन्माबद्दलची मनावर प्रचंड जखमही आहे. अशी ती दुभंगलेली पिढी. तसा दलितसमाजातून येणारा प्रत्येक बुद्धिजीवी हा दुभंगलेला असतो. एक ब्राह्मण, एक मराठा, एक इंग्रज, एक फ्रेंच, एक रशियन, अमेरिकन जेवढा माणूस म्हणून एकात्म, एकसंघ आणि भरलेला असतो तेवढा दलित वर्गातील सुशिक्षित नसतो ह्या देवळांच्या आणि देवांच्या देशात आणि येथल्या धर्माने हीन मानलेल्या जातीत जन्म घेतल्याचे दु:ख अजूनही त्याला छळीत असते, जाळीत असते, हे दु:ख व्यक्त करायला दडपणरहित वातावरण व प्रकाशन नसल्याने ह्या दुभंगलेल्या सुशिक्षितांनी खोटी कविता लिहिली. ती जशी खोटी होती तशी खरीही होती. कारण ती त्यांच्यातील मध्यमवर्गीय मनोवृत्तीतून आलेली होती. म्हणून खरी होती. परंतु त्यांच्या तळाला बांधलेल्या जीवनांच्या दृष्टीने ती खोटी होती.

म्हणून त्यांचा जीवनानुभव एकसंघ व्हावा यासाठी आणि साहित्य सर्व मराठी भाषिकांचे व्हावे असे वाटत असेल तर अलीकडे नव्या पद्धतीने विचार करू लागलेल्या विचारवंतांनी अस्पृश्य, आदिवासी होण्याच्या धाडसाने पुढाकार घ्यावा मराठीत एकटे मटेच महार असावेत ......

अस्पृश्यता, स्त्री-शूद्रांचे दास्य ज्यांच्यामुळे डोंगराप्रमाणे दीर्घायु झाले विषाप्रमाणे या देशातील माणसांच्या, हिंदु-मुसलमानांच्या मनांमध्ये जाऊन बसले. मने सडवून टाकली. तो धर्म, ते देव, ती समाजव्यवस्था, ती गावांची रचना आणि त्यातून आलेले साहित्य, इतिहास हवा आहे---कशासाठी ....? वैर, विद्वेष दुफळी, दंग्यासाठी !

आजच्या अपोलो युगातील माणसाला ढाल तलवारी घेऊन लढणाऱ्या इतिहासातील वीरांची काय जरूरी आहे? आजच्या मराठीला तुकाराम, ज्ञानेश्वरांच्या मराठीची काय उपयुक्तता आहे ? ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, मुक्तेश्वर इतर संत, पंत व शाहीर हवेत कशाला? आजची मराठी खरी म्हणजे परदेशी साहित्याच्या पुढे जात आहे. ज्यांनी जातीभेदाचा पुरस्कार केला, ज्यांच्या विचारांच्या भाषेचा, काव्याचा आजचे जीवन पुढे नेण्यासाठी काहीच उपयोग होत नाही, ज्यांच्या सुरांशी सूर मिळत नाही, आनंद लाभत नाही ते हवे आहेत कशाला ?

माणसाचा विचार आजच्या जागतिक साहित्याने केवढा केला आहे ! तंत्रशास्त्र केवढे पुढे गेले आहे! विज्ञानाने माणसाला विश्वविजयी केले आहे. तरी माणसाला देवाचे, दैवाचे खेळणे मानणारे हे जुने कवि-लेखक कोण आणि कशासाठी आजच्या जीवनाला जोडताहेत?

माझे तर म्हणणे आहे, शासन, संस्कृती आणि शिक्षणाचे संचालक ऐकत नसतील तर दलितांनी निग्रोप्रमाणे स्वतःच्या शाळा, विश्वविद्यालये आणि विद्यापीठे सुरू करावीत. तिथे माणसाला मुक्त महान करणारे ज्ञान द्यावे आणि जातिभेदाचा, जातीयवादाचा पुरस्कार करणारे, माणसाला शूद्र समजणारे सर्व हद्दपार करावेत.

दलित साहित्याने तर विद्रोह पुकारला आहे. ते विचारते आठशे वर्षातील मराठी साहित्यात अस्पृश्यतेला विरोध करणारे किती ? अस्पृश्यांतून संत कलावंत आले किती ? रणांगणावर अस्पृश्यांपैकी लढले किती ? थोर झाले किती ? त्या

शूरांची वर्णने त्यांच्या जीवनगाथा मराठी ज्यांच्या मालकीची होती, तेव्हां त्यांनी का केली नाहीं ?

मला तर वाटते जे बहुजन समाजातून संत आले ते संक्रमण काळातले. हिंदू, मुसलमान ह्या सामंतशाहीच्या झगडयाच्या काळातले. जेव्हां शिवशाही स्थिर झाली तेव्हां बहुजन समाजातून एकही संत आला नाहीं. मग शूद्रांतून कसा येईल ? पेशवाई दिशादिशांनी दौडत होती तेव्हांही बहुजनांतून संत नाहीं आणि नंतरही नाहीं. त्यांचे साहित्य नाहीं. असे कां व्हावे ?

ब्रिटिश राजवटीत डॉक्टर आंबेडकर यावेत आणि धर्मांतर करून मुसलमान झालेल्यांतून 'किंगमेकर' मुत्सद्दी, वीर जन्माला यावेत, असे का व्हावे ?

कारण उघड आहे. ज्या प्रेरणेने रामचंद्र प्रभूने शंबुकाचे शिर छेदले सीतेला त्यागिले, शूर्पुणखेला विटंबिले, कृष्ण-अर्जुनाने खांडव वन जाळले. पांडवानीं कर्णाला छळले आणि द्रोणाचार्यांनी एकलव्याची बोटे छाटली. तीच प्रेरणा युगे युगे नात्सीच्या निष्ठुरपणाने आदिवासी हरिजन, गिरीजन ह्या प्रचंड समाजाचा संहार करीत राहिली. त्यांच्या शारिक, बौद्धिक, मानसिक सामर्थ्याची राखरांगोळी होत राहिली. ती थांबवावी म्हणून महाराष्ट्राच्या या हिंदू सामंतशाहीतील कोण्या राजाने क्षत्रियाने, ब्राह्मणाने यत्न केले .... कायदे केले ?

जग केवढे बदलत आहे ? मार्क्सने कामगार वर्गाचे हाती समाजसत्ता देणारे तत्वज्ञान मांडले. समाजवाद आला. सामान्यांची शक्ती युरोपात वाढली. एक अद्‌भूत क्रांती मार्क्सवादाला अनुसरून होण्यासाठी रशियात लेनिनने यत्न सुरू केले. अन इथे राष्ट्रीय पुढाऱ्यांनी प्रायश्चित्ते घेतली. अन् सुधारकांनी त्यांच्या (वर्गाच्या गरजेपुरती) सुधारणा मागायला सुरवात केली जिकडे-तिकडे सामान्यांची जीवने महान महान लेखकांनी कथा, कादंबऱ्यात आणली. सारे जग दुःखाच्या दर्शनाने आणि दिव्याच्या ध्यासाने बेचैन झालेले त्यावेळी मराठीने काय लिहिले ? सदाशिव पेठेतील जीवन ..... फक्त केशवसुत तेवढे थोर निघाले .... मराठीत मार्क्सवाद आला, गांधीवाद आला, समाजवाद आला. पण एकंदर अर्वाचीन मराठी कादंबरीत अस्पृश्यांच्या, आदिवासींच्या जीवनांवर पुस्तके किती .... नाटक-कादंबऱ्यांमध्ये अस्पृश्य आदिवासी नायक किती .... बरे मांग, महार, चांभारवाडे दूर नाहीत .... अगदी गावाजवळ, त्यांची दखल किती ?

त्यावेळी कोणी लिहिले नाही. आजही कोणा संतप्ताने, भुकेल्या पिढी-वाल्याने, मार्क्सवाद, सोशलिझम, मानणाऱ्याने लिहिले नाहीं. ख्रिश्चन धर्मीय देशातील लेखक अनुभवासाठी नरकात देखील उतरतील. पण हे .....

मराठी साहित्यातील मुसलमान पात्रे बघावीत, ख्रिश्चन बघावेत ... दलित आदिवासी बघावेत ..... वाचकांना त्यांचेबद्दल तुच्छता वाटते. चीड येते दुश्मनी वाटते. ही पात्रे खुनी, हलकट, मूर्ख, लाचार आणि पशुवत आहेत असे वाटते.

ही तुच्छता, हा वैरभाव चिरंजीव आहे. अस्पृश्यतेबरोबर त्यांचाही जन्म झालेला आहे. प्रभु रामचंद्राठायी ते होते. कुलस्त्रिया बिघडतील, वर्णसंकर होईल, म्हणून हे अर्जुना युद्ध कर, अशी शिकवण देणाऱ्या कृष्णाने ते पुढे रेटले. हा तुच्छतेचा, वैराचा महापूर प्रत्येक ग्रंथातून वाहतो आहे. प्रत्येक मनातून वाहातो आहे. याला रोखण्याचा प्रयत्न गांधीजींनी परंपरेबद्दल प्रेम ठेवून केला आणि त्या महापुराने त्यांचा बळी घेतला. त्यानंतर जो वैर तुच्छतावादाचा वणवा पेटला त्यात अनेकांचे संसार उद्ध्वस्त झाले .... हा तुच्छतावाद उसळतो आहेच .... दंगे पेटवितो आहेच ....

हे ह्या देशाचे वैशिष्टच पाहून दलितांतील कवी वैतागून म्हणतो,—

"ज्याने चूक केली इथे जन्म घेण्याची
ती त्याने सुधारलीच पाहिजे—
देशांतर करून ..... भीषण युद्धे करून ....."

देश, माणूस नवा करण्याचे हे युद्ध करायचे कसे ! दलितांच्या विद्रोही साहित्याचे बळ तरी किती ? संतप्त, भुकलेले .... हे तर नागवे होण्यात आणि दुसऱ्यांच्या कासोटयाला हात घालण्यात संताप दाखवितात. ह्या देशात नागवे काय कमी आहेत ? देवळाच्या भिंतीवर नाना तऱ्हेची कामसूत्रे आहेत. धार्मिक स्त्री-पुरुषांच्या गुह्यांगांबद्दल वाटेल तेवढे लिहिले. भारुड, अध्यात्म, भेदिक, लावण्या, यांत स्त्री-शरीराची काय थोडी विटंबना केली आहे......

दलितांच्या विद्रोही साहित्याला सोबती नाही. सोबती पाहिजे, माणसावर प्रेम करणारा, प्रेषिताप्रमाणे दुःखाला सामोरे जाणारा. उद्याची भव्य स्वप्ने बघणारा ..... पण हे संतप्त, यंत्र, तंत्रविज्ञानाला विरोध का करतात ?

यूरोपांतील विरोध कळू शकतो. पण इथे यंत्र आलीत तरी कितीशी ? इथे भांडवलशाही आणि सामंतशाही ही नेहमीच अस्पृश्यतेची राखणदारी करते. तिचा स्वीकार दलितांचे साहित्य करणार नाही. कारण यंत्राच्याच पावलांखाली अस्पृश्यता चिरडली जाणार आहे. ती माणसाची मुक्ती ठरणार आहे. यंत्राला विरोध करणारे आणि रामराज्यवाले एकाच जातकुळीचे, एकाच वर्गाचे. हिंदू सामंतशाहीतले.

हा वर्ग म्हातारा आहे. साचलेला आहे. प्राचीन अश्वमेध यज्ञ करणाऱ्या चक्रवर्ती सम्राटापासून तो मुसलमान, ब्रिटिशांचे सचिवालय आणि शासन यंत्रणेची अंगे हाच चालवीत आला आहे. आताही तोच धर्म, शासन, शिक्षण आणि संस्कृतीचा अन् साहित्य कला वगैरेंचा संचालक आहे. असा संतुष्ट, श्रीमंत साचलेला वर्ग पूर्ण क्रांतिकारक दलिताएवढा विद्रोही कसा होईल ? ...... तो थोडीशी सुधारणा करील ..... संतापला तरी त्याच्या संतापाने युद्धे होणार नाहींत.

आता मात्र आमच्यावर छुपेपणाने केल्या जाणाऱ्या आरोपांचे आणि काही अर्धवटांच्या भ्रमाचे खंडण करावे म्हणतो.

डॉक्टर बाबासाहेबांनी आणि नंतर त्यांच्या अनुयायांनी महात्मा गांधी, गांधीवादावर आणि कम्युनिझमवर टीका केली आहे. त्यामुळे दलित साहित्य जातीयवादी कसे ठरते ?

ज्या जातिभेदाने मानवतेचा, त्याच्या बौद्धिक शक्तीचा, आत्मिक शक्तीचा केवढा संहार केला ? त्या जातिभेदात आणि जातीयवादात माणसाला मातीमोल करणारा द्वेष, तिरस्कार किती ज्वालाग्राही असतो याचे पुरावे दलित समाजातील प्रत्येक व्यक्ती देत आहे. अजूनही वाढत्या संख्येने माणूस होऊ बघणाऱ्या दलितांवर अत्याचार होत आहेत. दलित साहित्याच्या ध्येयवाद, एकंदर दलित समाजाचे संख्याबळ आणि युगाने लिहिलेली कामगिरी विसरून आम्ही पुन: त्या जळत्या नरकात शिरु कशासाठी ?

आम्ही आहोत युगायुगाच्या उत्पीडीतांच्या बाजूचे. त्यांचे प्रमाणे दु:खाच्या पोटी जन्म घेतलेले. आम्ही त्यांचे जीवन, दु:ख, वेदना, व्यथा आणि विद्रोह व्यक्त करू नये काय ?

माणसाला महान करणे, शुद्रत्वांत त्यांचे मनुष्यत्व, व्यक्तित्व दवडले आहे. त्यांना ते मिळवून देणे, जीवनातील त्याचे सन्मान त्याला दाखविणे हा आमचा

ध्येयवाद. हे सांगून झाल्यावर आम्ही आमच्या मित्रांना विचारतो, स्पेनचे लोकशाहीवादी कलावंत लढले, मेलेही. इथे तर मानवताच खांडव वनात जळत असलेली, तिच्या बाजूने कम्युनिस्ट, सोशलिस्ट कलावंतांनी चार ओळी तरी लिहिल्या आहेत काय? या डाव्या पक्षांना अस्पृश्यतेबद्दल बोलायला पन्नास वर्षे लागली. ह्यांतली २० तर स्वातंत्र्यांचीच आहेत.

आंबेडकरी आंदोलनाचे वयच मुळी पन्नास वर्षांचे. दलित साहित्य तर फारच तरुण. नाव मिळाले आहे असे तीन चार लेखक, काही कवी. त्यातले अण्णाभाऊ गेले. एक त्रैमासिक, दोन-तीन साप्ताहिके, बंद पडणारी. प्रकाशन व्यवस्था नाही आणि वाचकही पुढारलेले नाहीत. समीक्षक तर नाहीच नाही. समाजात बारीकबारीक किती तरी थर गुहाजीवनाचे, भूमिहीनांचे, मजुरांचे. मध्यम-स्थितीतले आणि संस्कृतीजवळ पोहचलेले. माणसें तर दुभंगलेली, भंगलेली हरवलेली, कांही ह्या देशाबाहेर पळू बघणारी. चिडलेली, पेटलेली ... एखाद्या घनदाट अरण्याप्रमाणे जटिल.

तरी दलित साहित्य जोमात आहे. कारण त्याने दुःखाचे दर्शन घेतलें आहे जे दुःख देखून येतात, त्यांनाच देव आणि धर्म घाबरून असतात. दलित साहित्यि-कांना दुःखे चांगली माहीत आहेत. दुःख तर काव्याचे उगमस्थान. तरी ते चौकटीत शिरणार नाहीत. चौकट त्यांना कशी बसणार..... ते जीवन चितार-तील तेच मुळी दुःखासारखे दुर्निवार आहे म्हणून दलित साहित्याला नैसर्गिक स्वातंत्र्य पाहिजे. समुद्राचे, उधाणांचे, वाऱ्याचे, ताऱ्याचे तरच त्याचा संताप, विद्रोह पूर्णपणे व्यक्त होईल. वास्तववादी होईल.

दलित साहित्याला असेही वाटते की, जीवनाचा अर्थ जर एखाद्या वादातून तत्वातून, पक्षाच्या जाहीरनाम्यातून लावला तर ते साहित्य एकसुरी होते. म्हणून जीवनाचा अर्थ जीवनाच्या स्वाभाविकपणे लावावा.

माणूस? साक्षात देहधारी निसर्ग! ह्याच्या वासना, भावना, विकार म्हणजे सूर्य, चंद्र, ऊन, पाऊस, वादळ, वारे, ह्या वासना, भावनाचे विकार सहा शत्रू झाले. चिरडले गेले. तेव्हाच धर्म व देव चिरंजीव झाले आणि उषासुक्ते गाणारे जीवन काळोखात कोंडले गेले.

म्हणून माणसाच्या व सर्व शक्ती स्वतंत्र व्हाव्यात म्हणजे वादळे होतील. वणवे पेटतील. प्रकाश येईल. पथ पडतील. रथ येतील. झाडावर उतरणाऱ्या

पक्ष्याप्रमाणे युगे येतील. सुखे बर्षतील. विश्वाच्या महाकाव्याचा नायक असलेल्या माणसाला एकच प्रार्थना.—

हे प्रज्ञावंत प्रलयंकारी माणसा,
साऱ्या विश्वाचे नामकरण तू केलेस,
आणि सर्वांना गळा भरून हाक मारलीस
हे सूर्या, हे चंद्रा, हे शून्या
हे संख्ये, हे मुंगी आणि हे पर्वता
आणितुझ्या हाकेप्रमाणे ते झाले.

....................
आताही तसेच होईल ..... तू हाक मार,
ते तुझे होऊन येतील.



# जुन्या साहित्य परंपरेतील दोषांबरोबर गुणांकडेही लक्ष दिले पाहिजे.

* वा. ल. कुलकर्णी

मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रात एक चमत्कार घडत आहे ज्ञानेश्वर, नामदेवांच्या काळात हा चमत्कार अल्पांशाने घडताना दिसला होता तो घडला केवळ आध्यात्माच्या क्षेत्रात ह्या क्षेत्रात प्रत्येकाला भक्तिमार्गाच्या व तज्जन्य आत्मशुद्धीच्या साहाय्याने आत्मोन्नती साधणे शक्य आहे असा विश्वास ज्ञानेश्वर-नामदेवांनी निर्माण केला व केवळ अध्यात्माच्या क्षेत्रात समतेचे साम्राज्य प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला त्यांनी हल्ला चढविला तो आध्यात्माच्या क्षेत्रात माजलेल्या ढोंगबाजीवर, भांडवलशाहीवर, हितसंबंधांवर, चातुर्वर्ण्याधिष्ठित सामाजिक विषमतेवर नव्हे. ही विषमता व तज्जन्य हरतऱ्हेची रोगबीजे तशीच फोफावत राहिली. त्यांना सामाजिक प्रामाण्याचे सतत खतपाणी मिळाले. त्यामुळे आध्यात्माच्या क्षेत्रात ज्ञानेश्वर-नामदेवांदींनी पुरस्कारिलेली समता आणि तत्संबद्ध भूतदयावादाची शिकवण तेवढ्या क्षेत्रापुरतीच मर्यादित राहिली. सामाजिक व्यवहारांच्या विविध क्षेत्रांपर्यंत ती कधी पोचलीच नाही. सर्वार्थाने ती वांझोटीच ठरली. त्यामुळे ज्ञानेश्वर-नामदेवांच्या काळात मराठी साहित्याच्या क्षेत्रात समाजाच्या तळच्या थरातील स्त्रीपुरुषांना एकाएकी वाचा फुटल्याचा जो चमत्कार दिसला तो अत्यंत अल्पजीवी ठरला. चोखामेळा एकटाच बोलला. त्याला साद देणारे चोखामेळे पुढे कित्येक वर्षे जन्मलेच नाहीत. हा चमत्कार, त्यानंतर गेल्या सातशे वर्षाच्या काळात घडलाच नाही. स्वराज्यप्राप्तीनंतरच्या गेल्या वीस बावीस वर्षाच्या काळात तो घडत असल्याची आणि येथून पुढे अधिक प्रमाणात घडणार असल्याची सुचिन्हे दिसत आहेत. जो दलितवर्ग शतकानुशतके सर्वार्थाने दडपला गेलेला होता त्याची अस्मिता हळू हळू जागृत होत आहे. समाज व्यवहाराच्या विविध क्षेत्रांत ह्या जागृत होत असलेल्या अस्मितेचा साक्षात्कार घडत आहे. तो विविध रुपांमधून घडत आहे. ही सर्वच रूपे सुखद

आहेत अशातला भाग नाही. त्यांतील कित्येक रूपे रौद्र, भयानक आहेत, पाहणारांना अस्वस्थ करणारी आहेत, आणि हे सर्व अपरिहार्य आहे. ही संक्रमणावस्था आहे; व ती केवळ अल्पकाळ टिकणारी आहे असा गैरसमज करून घेण्याचेही कारण नाही. जे विपरित कित्येक शतके घडत आले ते आता विघटित व्हावयाचे आहे. ही विघटनाची प्रक्रिया व तिच्याशी संबंद्ध असलेली सुसंघटनेची प्रक्रिया विनाविलंब कशी घडणार? ही घडत असता प्रक्षोभ प्रतिक्रिया ह्या गोष्टी ओघानेच आल्या. आज आपणास त्यांची गती वाढल्याच्या देखावा दिसत आहे. इंग्रजी अंमलाच्या काळात महाराष्ट्रात समाज-सुधारणेच्या कितीतरी चळवळी झाल्या. चातुर्वर्ण्यावर अधिष्ठित असलेल्या समाजरचनेवर सुधारणेच्छुंकडून विविध दिशांनी प्रहारही करण्यात आले, परंतु थोडेफार अनुकूल वैचारिक वातावरण तयार होण्यापलीकडे फारसे काहीच घडले नाही. गेल्या वीसपंचवीस वर्षांच्या स्वराज्यकालात नव्हे, लोकशाहीच्या काळात मात्र परिस्थिती बदलली आहे. डॉक्टर आंबेडकर यांच्याबरोबर अनेकानी केलले धर्मांतर, लोकशाहीत उच्चवर्णीयांकडून इतर वर्णियांकडे झालेले सत्तांतर, लोकशाहीच्या तत्वांची रुजत चाललेली शिकवण, शिक्षणाचा झपाट्याने होत असलेला प्रसार इत्यादी अनेक कारणांमुळे जे आतापर्यंत दलित होते, अस्पृश्य होते, अंत्यज म्हणून समजले गेले होते त्यांची अस्मिता खऱ्याखुऱ्या अर्थाने जागृत होणे अपरिहार्य ठरले, व जी गोष्ट आजपर्यंत घडली नव्हती, ती मराठी वाङ्-मयाच्या क्षेत्रात घडत असल्याची सुचिन्हे स्पष्ट दिसू लागली.

आज ह्या नवजागृत समाजातील स्त्रीपुरुषांना बोलावेसे वाटत आहे, लिहावेसे वाटत आहे त्यांच्याजवळ पुष्कळ सांगण्यासारखे, बोलण्यासारखे आहे. हे कसे बोलून दाखवावे ते त्यांना नीटसे उमजत नाही. कारण त्यांची सांगण्याची, बोलण्याची संवयच केव्हांतरी नाहीशी झालेली आहे. त्यांना आज अनेक वर्षे सवय आहे ती ऐकण्याची, बोलण्याची नव्हे. ही सवय त्यांना नव्यानेच संपादन करावयाची आहे. त्यासाठी धडपड करायची आहे. गेल्या शंभर वर्षांच्या ब्रिटिश अमदानीत ही धडपड त्यांच्यापैकी फारच थोड्यानी केली. फारच थोड्यांना ती करणे शक्य झाले. फारच थोड्यांना असे वाटले की आपण बोलू शकू, आपण काही सांगू शकू. आपण स्वतःला व्यक्त करु शकू. ते व्याख्याने ऐकत राहिले, त्यांचेसंबंधी लिहिलं जात होत, बोललं जात होतं. ते (शक्य झालं तर) ऐकत राहिले, परंतु आपणही बोलू शकतो असा साक्षात्कार ह्या काळात त्यांना क्वचितच झाला. इतरांनी त्यांचेविषयी अनेकदा सहानुभूती व्यक्त केली, त्यांच्या-

वर होणाऱ्या अन्यायांना तथाकथित तोंड फोडण्याचा प्रयत्न केला, परंतु ते स्वतः मात्र मूकच राहिले, व ते मूक राहिले ह्याबद्दल कोणी फारसे आश्चर्यही व्यक्त केले नाही. एकाही साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांनी साहित्याच्या क्षेत्रात प्रामुख्याने एकाच वर्गातील लेखक का सदैव दिसत आहेत याची चौकशी केलेली किंवा खंत व्यक्त केलेली आढळत नाही. ह्या प्रश्नाची त्यापैकी काहींनी चर्चा केली ती केवळ अकेडेमिक स्वरुपाची, प्रश्न सोडविण्यासाठी नव्हे तर केवळ अशा प्रकारच्या चर्चेतील बौद्धिक आनंद लुटण्यासाठी, परिणामी मराठी साहित्याच्या क्षेत्रात प्रामुख्याने समाजातील विशिष्ट वर्णियांचाच आवाज ऐकू येत राहिला. आज ही परिस्थिती बदलत आहे. समाजातील इतर वर्गाबरोबरच आज अनंत वर्षे मूक राहिलेला वर्गही बोलू लागला आहे. हे त्यांचे बोलणे सदैव वाङ्मयरुप घेत आहे असे नव्हे, परंतु ते तसे घेत नाही ह्याबद्दल खंत बाळगणे किंवा तक्रार करणेही वेडेपणा आहे त्यात काही भाग अजूनही जे शिष्ट मान्य आहे, लोकप्रिय आहे त्याच्या अनुकरणाचा आहे. तो भाग तसा राहणे काही काळ तरी अटळ आहे, काही भाग जे सांगायची खरोखरच लाज वाटत आहे. ते शृंगारुन, आडवळणाने सांगण्याचा आहे, हे असले लेखन बुजरे आहे, जे अप्रिय ते शक्य तोवर विसरणे बरे, ह्या प्रकृतीचे ते निदर्शक आहे परंतु ह्या बरोबरच असेही काही व्यक्त केले जात आहे की जे मराठी वाचकाने कधीच वाचलेले नव्हते, ऐकलेले नव्हते. हे ओबडधोबड असले, थोडे अस्ताव्यस्त असले तरी त्याचे ठिकाणी वाचणाराला अस्वस्थ करण्याचे विलक्षण सामर्थ्य आहे. 'अस्मितादर्श' सारख्या मासिकातून प्रसिद्ध होणाऱ्या लेखनासंबंधी मी सांगत आहे. ह्या मासिकातून प्रसिद्ध झालेले सोनकांबळे बाबूराव बागूल दया पवार इत्यादींचे लेखन एका नव्या जागृतीची साक्ष पटविणारे आहे. दुर्दैवाची गोष्ट अशी की महाराष्ट्रातील वाचकवर्गाचे लक्ष ह्या लेखनाकडे जेवढ्या प्रमाणात जायला हवे तेवढ्या प्रमाणात जात नाही. आपली मासिके, त्रैमासिके प्रकाशने ही अद्याप पांढरपेशांच्या जागापुरती आपली कार्यक्षेत्रे मर्यादित करीत आहेत की काय असे वाटते. ती ह्या लेखकवर्गाला स्वतःकडे आकृष्ट करु शकलेली नाहीत; डोकी वर काढू पाहणाऱ्या ह्या नव्या लेखकवर्गात स्वतःबद्दल विश्वासाची भावना निर्माण करु शकलेली नाहीत. ह्या नवजागृत समाजातील तरुण स्त्रीपुरुषांना आपल्या अभिव्यक्तिसाठी आपले स्वतःचे असे एक माध्यम असावे असे वाटणे स्वाभाविक आहे. त्यादृष्टीने 'अस्मितादर्श सारख्या मासिकांचा अवतार हा समजण्यासारखा आहे. परंतु जर हा अवतार

मराठीतील प्रचलित नियतकालिकांमधून आपल्या लेखनाला स्थान मिळेल की नाही ह्या साशंकतेतून झालेला असेल तर मात्र ही एक चिंतेची बाब आहे असे म्हणावे लागेल. मराठीतील नियतकालिकांनी ह्या गोष्टीची अवश्य दखल घेतली आहे.

आज ह्या लेखनाच्या बाबतीत ज्या आणखी एक दोन गोष्टी जाणवतात त्या अशा :

१. मला ह्या लेखनात अजूनही एक प्रकारचा बुजरेपणा जाणवतो. हा बुजरेपणा पुरेशा आत्मविश्वासाचा अभाव सुचवितो. पुरेसा आत्मविश्वास नसल्यामुळे काही वेळा दर्शनाची जागा प्रदर्शनाने घेतली जात असते. ज्या प्रमाणात ह्या लेखनातील self consciousness चा भाग कमी होत जाईल त्या प्रमाणात त्याचे सामर्थ्य वाढीला लागणार आहे.

२. ह्या लेखनाला वैचारिक लेखनाची सतत जोड मिळाली पाहिजे. ही वैचारिकता बहिस्थ परिस्थितीच्या परीक्षणाइतकीच आत्मपरीक्षणातून, आत्म-चिकित्सेतून येणे आवश्यक आहे. अशा प्रकारचे अंतर्बाह्य निरीक्षणातून सतत जन्माला येणारे विचारमंथन होत राहिल्याशिवाय आत्मनिष्ठ अशा ललितरुप धारण करु पाहणाऱ्या लेखनाला अर्थघनता प्राप्त होणार नाही. एकोणिसाव्या शतकात महाराष्ट्रीय समाजातील आगरकर लोकहितवादीसारख्यांनी केलेले विचारमंथन हे मुख्यतः आत्मनिरीक्षणातून जन्माला आलेले होते. अशा प्रकारच्या विचारमंथनामुळे जे वैचारिक वातावरण निर्माण झाले त्याचा संबंध हरिभाऊ आपटे किंवा केशवसुत यांच्या वाङमयाने धारण केलेल्या रुपाशी निःसंशय आहे. ललितलेखन ज्या वैचारिक वातावरणात निर्माण होत असते ते वातावरण निर्माण करणे हेही अत्यंत अगत्याचे आहे.

३. 'अस्मितादर्श' सारख्या मासिकांतून पुढे येणाऱ्या नव-लेखकांनी नाट्य लेखनाकडे वळणे आवश्यक आहे. ज्या करुणभीषण अनुभवाचे ते दर्शन घडवू पाहात आहेत त्या अनुभवांमध्ये किती तरी नाट्यबीजे आहेत. हे सगळेच अनुभव संघर्षमय आहेत व ते अद्याप मराठी रंगभूमीवर आविष्कृत व्हावयाचे आहेत. त्यांचा नाट्यविष्कार जी अनेक परिणामकारक रूपे घेण्याची शक्यता आहे त्यात मराठी लोकनाट्याशी संबद्ध असलेले आणि संपूर्ण मराठी समाजाला परिचित असलेले रूप लक्षात घेणे आवश्यक आहे. ह्या नाट्यरूपामध्ये उठलेले उप-

हास्यप्रधान अनुभवदर्शन घडविण्याचे सामर्थ्य ओळखून तद्वारा ह्या अनुभवांची अभिव्यक्ति साधणे अशक्य ठरू नये. अण्णाभाऊ साठे यांनी 'मुंबई कुणाची'? सारखे मुक्तनाटच लिहिले. परंतु दलितांना वर्षानुवर्षे भोगाव्या लागलेल्या अनुभवांना लोकनाट्याच्या रंगभूमीवर वाचा फोडली असे दिसत नाही. ह्या दृष्टीने प्रयत्न व्हावयाला हवेत.

४. प्राचीन मराठी साहित्य हे प्रामुख्याने एका विशिष्ट वर्गाने निर्माण केलेले असल्यामुळे आणि त्या वर्गाचे चातुर्वर्ण्यावर अधिष्ठित असलेल्या समाज-रचनेवर श्रद्धा ठेवणारे मन त्यातून सतत व्यक्त होत असल्यामुळे त्या साहित्यांत आपल्या दु:खाचे, आपल्यावर पिढयानपिढया होत असलेल्या अन्यायांचे चित्र कधीच उमटत नाही. उलट त्याची सर्व बैठकच आपला पदोपदी तेजोभंग करणारी आहे, अतएव या साहित्याशी आपले काहीच नाते नाही हे नाते असलेच तर ते दुराव्याचे आहे व म्हणूनच ते तोडून टाकले पाहिजे अशा प्रकारचा विचार व्यक्त झालेला अलीकडे अधून-मधून ऐकू येतो. हा विचार का व्यक्त होत आहे नि:संशय समजण्यासारखे आहे. परंतु अशा प्रकारे एखाद्या साहित्याशी असलेले आपले जिव्हाळयाचे नाते तोडल्याने तुटते काय ? शिवाय ते तोडण्यात काय तात्पर्य आहे ? त्यातून काही विशिष्ट आचारविचारांचा जबरदस्त पगडा बसलेली मने व्यक्त झाली असली तरी त्याबरोबरच ह्या दुष्ट आचार-विचारांची धार कमी करणारे असेही व्यक्त झाले आहे ना ? त्यातून ठिक-ठिकाणी व्यक्त झालेला भूतदयावाद हा निखालास खोटा होता असे आपण म्हणू शकू काय ? वर्णाश्रमधर्माची, जातिभेदाची, तज्जन्य श्रेष्ठ कनिष्ठतासंबंधीची रुढ कल्पनांची चौकट मोडून ज्ञानेश्वरादींची मने बंडखोरपणे व्यक्त झाली नसली तरी माणसातील भ्रातृभाव वाढीला लागावा ह्यासाठी त्यांची मने तळमळत नव्हती असे म्हणता येईल काय ? ह्या मनांच्या आविष्कारामधून आपल्याला गेली पांचसातशे वर्षे काहीच का मिळाले नाही ? ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम यांचा महाराष्ट्राच्या प्रत्येक थरांतील सामान्य माणसास सतत आधार वाटत आला तो उगीच का? ह्या सर्वांच्या वैचारिक मर्यादा लक्षात घेऊनही शेवटी आपणास असेच म्हणावे लागेल की त्यांनी महाराष्ट्रीय मनाला असे काही दिलेले आहे की त्यांचा विसर त्या मनाला कधीच पडले शक्य नाही. ही मने एका मर्यादेपलीकडे बंडखोर झाली नाहीत म्हणून आपण त्यांचेवर रागवतो ते देखील त्यांचे ठिकाणी बंडखोरीचे सामर्थ्य होते ह्याची साक्ष आपणास

पटलेली असते म्हणूनच ना? आपले भावजीवन, आपले वैचारिक जीवन, आपले विचारादर्श, आपला मूल्यविचार, ह्या सर्वावर ज्ञानेश्वरादींच्या शिकवणुकीची छाया पडलेली आहे आणि ही शिकवणूक आपण पिढ्यानपिढ्या मनाशी बाळगलेली आहे. परंपरा म्हणतात ती हीच परंपरा ही समृद्ध करावयाची असते. ती मुळांतच निर्दोष वा परिपूर्ण अवस्थेला पोचलेली नसते, एवढे की तिच्यात निर्दोष बनण्याची बीजे असावी लागतात. ही बीजे निर्माण करण्याची प्रक्रिया सुरू झालेली असावी लागते व त्या दृष्टीने विचार करिता ही प्रक्रिया तेराव्या शतकात सुरू झालेली नव्हती असे म्हणता येणार नाही. ही प्रक्रिया ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, यांनी सुरू केली होती. ज्या परंपरेत ज्ञानश्वर, एकनाथ, तुकाराम, बसतात, त्याच परंपरेत जोतिबा फुले, लोकहितवादी आगरकर वा आंबेडकर बसतात. प्रत्येकजण एका विशिष्ट कालात, विशिष्ट परिस्थितीत कार्य करीत असतो. त्याच्या कार्याच्या मर्यादा अनेकदा त्या काळाने व परिस्थितीने निश्चित केलेल्या असतात. परंतु परिस्थितीवर मात करण्याची प्रक्रिया चालूच असते व त्यामुळे परंपरा समृद्ध होत असते. तेव्हां प्राचीन मराठी साहित्याशी असलेले नाते तोडू म्हटल्याने तुटणार नाही. विसरू म्हटल्याने विसरले जाणार नाही. एवढेच नव्हे तर तसा प्रयत्न झाल्यास आपली स्थिती त्रिशंकूसारखी होणार आहे, शेकडो वर्षे समाजमनाचा पगडा घेतलेल्या एका मोठ्या विचारधनाला व वाङ्मयधनाला आपण मुकणार आहोत. हे प्राचीन मराठी साहित्याच्या परंपरेपासून फटकून राहू पाहणाऱ्यांनी लक्षात बाळगले पाहिजे. ज्ञानेश्वरावर, एकनाथावर, रामदासावर तुटून पडण्याचा आपणास हक्क आहे. कारण जे आपले असते त्याच्याशी आपण भांडू शकतो, त्याच्यावर रुसू शकतो. परन्तु महत्त्वाची गोष्ट अशी की आपण त्याला तोडून टाकू शकत नाही. तसे आपण ठरविले तरी जमत नाही. व त्यात आपले कल्याणही नाही.

"अस्मितादर्श" सारख्या मासिकांतून जी एक नव्या लेखकांची पिढी जन्मास येते आहे तिने याचीही दखल घेतली पाहिजे

# परंपरा नाकारणाऱ्या वृत्तीतूनच उद्याचे धगधगते वाङमय निर्माण होईल

* दया पवार

चिनी भाषेतील एक लोककथा आठवते. आपल्या नगरीत प्रचंड आकाराची घंटा एका राजाला ओतावयाची असते. ती घंटा जगातील एक महान आश्चर्य ठरावे अशी त्याची इच्छा असते. त्यासाठी शास्त्रज्ञ मूस तयार करतात. उकळते रसायन अनेक वेळा मुशीत ओतले जाते. पण घंटा काही आकार घेत नाही तिला सारखा तडा जात असतो. सारेच सचिंत होतात. शेवटचा प्रयत्न म्हणून उकळता रस मुशीत ओतला जातो. आणि याच क्षणी तेथे काम करणारा एक कारागीर उकळत्या रसात लोटला जातो त्या उकळत्या रसात त्याचे रक्त मांस घुसळून निघते. जगातील एक महान् अशी घंटा आकाराला येते. जेव्हां ती वाजविली जाते त्या वेळी बळी पडलेल्या कारागिरांचे काळजाला बसविणारे आर्त आक्रंदन ऐकू येते. याच घंटेसारखी या भारत देशातही एका प्रचंड दगडी मुशीतून, मनूने चातुर्वर्ण्यावर आधारलेली जाति-व्यवस्थेची घंटा ओतली. या घंटेची जेव्हां जडणघडण केली गेली, त्यावेळी या देशातील पददलित समाज, स्त्रिया यांचे अश्रू, रक्त आणि मांस याचा खच पडला.. आजही जेव्हां ती घणघणते तेव्हां तिच्यातून मांगल्याचे सूर न निघता या देशातील लक्षावधी दलित आणि स्त्रियां यांच्या काळजाला घरे पडणाऱ्या आर्त किंकाळ्या ऐकू येतात. कारण स्त्रिया आणि शूद्र यांच्या पायी मनूने गुलामीचे साखळदंड अडकविले आहेत. ही मृत्युघंटा फोडण्यासाठी चार्वाकापासून बुद्धांपर्यंत अनेकांनी नव्या विचारांचे घाव घातले. ही थोडीशी डगमगलीही, पण ती शेवटी कायमची डोक्यावर टांगली गेली. आजच्या या विज्ञानयुगात ती फोडावयाची म्हणजे तिच्या मूलभूत संस्कृतीवरच निकराचा हल्ला चढविला पाहिजे. हा संघर्ष अटळ आहे. तो जिंकल्या खेरीज नव्या जगात भारताला जागा नाही.

हा संघर्ष जसा व्यावहारिक पातळीवर घडणार आहे तसाच तो वाङ्मय याच्या प्रांतातही घडणार आहे. कारण साहित्यनिर्मिती हाही समाज व्यवहाराचा एक भाग आहे असे आम्ही मानतो. तेव्हां या जातीव्यवस्थेसंबंधी ज्यांना चीड, संताप, अगतिकता, घृणा आणि नवीन जीवनाचा वेध घेण्याची युयुत्सुवृत्ती आहे, यांचा अविष्कार जो कुणी उत्कटतेने, काळजाला भिडणाऱ्या भाषेत करील तो मग दलितांचा असेल असे नाही. ज्याला ही अनुभूती भावेल तो ती व्यक्त करील. ज्यांनी हे नरकाचे जीवन अनुभवले असेल ते सर्वच या विषयाला न्याय देतील असेही नाही. शेवटी कलावंत म्हणून त्याचे संवेदनाक्षम मन हवेच आहे. या वाङ्मयास केवळ महारामांगाचे वाङ्मयीन लिखाण म्हणून त्यांच्या जीवनासारखेच उपेक्षित ठेवून चालणार नाही. किंवा दलितांचे वाङ्मय म्हणून त्यासाठी वेगळा कप्पाही करता येणार नाही. हे वाङ्मय सर्वस्पर्शी नसेलही पण हे वाङ्मय भारतीय पुरुषाच्या नासक्या, कुजक्या, अवयवाला स्पर्श करते म्हणून तुच्छ लेखू नये. यात कलात्मक घाट नाही, आकृतिबंध नाहीत किंवा निखळ सौन्दर्याचा आविष्कार नाही म्हणून नाक मुरडून चालणार नाही. हे साहित्य नेहमी दुःखाची गाणी गाते त्यामुळे आमची झोप चाळवते असे कलावादी मंडळी कितीही म्हणत असली तरी दलितांच्या जन्माबरोबरच दुःखाचाही जन्म झाला, हे जोपर्यंत सत्य आहे तोपर्यंत असे साहित्य निर्माण होत राहणारच. तसा हा विषय जीवनातील अनेक अंगांना स्पर्शून जातो. ही आपली भारतीय संस्कृती आपल्या सर्वच आयाबहिणींना विटाळात चार दिवसांची दलितासारखीच कडी सजा देते. एवढेच काय पण आपल्या रक्तामध्ये तुच्छतेची भावना वास करताना दिसते. जेवताना अगर पैसे कुणाकडून घेतांना आपण आपला डावा हात लावणे अशुभ मानतो. दलित करतात ती काही कामे डावा हात करतो म्हणून तर डाव्या हाताची हेटाळणी होत नसावी ना? संतांच्या वाङ्मयात तर देहाविषयी उद्वेग निर्माण होईल अशा रीतीने देहाचे हिडीस वर्णन केले आहे. रामदास एका ठिकाणी म्हणतात, "अत्यंत दोष ज्या विटाळा। त्या विटाळाचाचि पुतळा। तेथे निर्मळतेचा सोहळा। केवि घडे ॥ वरिवरि दिसे वैभवाचे। अंतरी पोतडे नरकाचे। जैसे झाकडे चर्मकुडाचे। उघडतांचि नये।। असे जन्म क्रियेचे व शरीराचे वर्णन केले आहे. बाहेर शरीर कितीही मोहक दिसत असले तरी, आंत जंत, किडे आणि आंतडी। नाना दुर्गंधांची पोतडी। अमूप लवथवती कातडी। कंटाळवाणी । तेव्हां 'माणूस' म्हणून जी ही टवाळी होत आहे तिच्या पाठीमागे मनुष्य जन्मासंबंधी घृणेची भावना व्यक्त होताना दिसते.

'माझा मऱ्हाटाचि बोलु कवतिके-परि अमृतातेही पैजा जिंके' असे म्हणत ज्ञानेश्वरांनी मराठी मायबोली प्रचलित केली. तिच्यातून आपल्या तत्वज्ञानाचे सार सांगितले. ते एके ठिकाणी म्हणतात, समता वर्षावी। अहंता सांडावी। तेणेच पदवी। मोक्ष मार्गे॥ या ठिकाणी ज्ञानेश्वर समतेचा पुरस्कार करतात. पण त्यांची समता मर्यादित वाटते. आपणास जी कामे दिलीत ती निमूटपणे करावी–फलाची अपेक्षा करू नये. हाच गीतेचा संदेश ते ज्ञानेश्वरीत सांगतात. 'का लल्हाटिचे लिहिले। न मोडे काही केले। काळेगोरेपण धुतले। फिटो नेणे, असे सांगून ते दैववादाचा पुरस्कार करतात. तसे नसते तर उभ्या हयातभर सन्याशांची मुले म्हणून ज्ञानेश्वरांना त्या काळच्या सनातनी वर्गांनी छळले, वाळीत टाकले, दलितांसारखेच जीव घेणे दुःख त्यांवर लादले. तेव्हां यासंबंधी दुःखाचे आर्त उद्‌गार अगर समाजव्यवस्थेसंबंधी संताप त्यांनी ज्ञानेश्वरीत कुठेच व्यक्त केला नाही. या उलट सनातन्यांनी आपणास पुन्हा जातीत शुद्ध करून घ्यावे असा अट्टाहास त्यांचा चाललेला दिसतो. या ठिकाणी ज्ञानेश्वरांना 'बंडाचे निशाण' फडकविता आले असते. त्यांची रसवंती भाषा विजेचा लोळ होऊ शकली असती. पददलित समाजाच्या वठलेल्या इच्छा आकांक्षा त्यांच्या रूपानें पल्लवित झाल्या असत्या. पण ते तेवढे करू शकले नाहीत.

अमृतालाही पैजेत जिंकणारी अशी ज्ञानेश्वरीची भाषा खऱ्या अर्थान त्या काळातील मध्यमवर्गियांची भाषा. दलितांना हे अमृत कसे मिळणार? त्या वेळचे बरेचसे ज्ञान मौखिक असावयाचे. संस्कृत भाषेचे माजघर ओलडांणारी पण तुळशीवृंदावनाजवळ रेंगाळणारी अशी प्राकृत भाषा दलितांच्या वाट्याला कशी येणार? ती त्यांच्या जिभेला कशी रेटणार? जेव्हां तुकारामाच्या भाषेने समाजाच्या खालच्या वर्गाच्या तळगाळाला स्पर्श केला तेव्हां ती रोखठोक होऊन पुढे आली. त्या भाषेमधून या काळातील समाजजीवनाचे आरशासारखे प्रतिबिंब पडलेले दिसते. देव ब्राह्मण हे उच्च पदाचे. त्यांच्या पायाचेही प्रक्षालन केले पाहिजे. केले नाही तर तुकाराम त्यांच्या तोंडावर थुंकण्यास तयार! शूद्र स्त्रिया, चांडाळ आणि वेश्या या सर्वाबद्दल तुकाराम अतिशय खालच्या पातळीतून लिहितात. शूद्र, वेश्या, स्त्रिया असे का वागत, सामाजिक परिस्थितीचा हा परिपाक आहे याची जाणीव तुकारामाला झालेली दिसत नाही. ते फक्त देवाच्या विठ्ठलाच्या पायाजवळ सर्वांना समान लेखतात. प्रत्यक्ष व्यवहारात हा भेद राहणारच असे ते मानतात.

चारी वर्ण झाली एकाचिये अंगी।
पापपुण्य भागी विभागिले॥
प्रथम पाउली पावविला पंथ।
आदि मध्य अंत भेद नाही॥
आंबे बोरी वड बाभूळ चंदन।
गुणागुणे भिन्न अग्नी एक॥
तुका म्हणे मन उन्मन जो होय।
तो वरि हे सोय विधीपाळीं॥

दुसऱ्या एका ठिकाणी ते म्हणतात.——

लेकरांची रास स्वये धावे क्षाळू।
न म्हणे प्रक्षाळू द्विजपाया॥
तुका म्हणू त्यांच्या तोंडावरी थुंका।
जातो यमलोका भोगावया॥
देवा ब्राह्मणाशी जाईना शरण।
दासिचे चरण वंदी भावे॥
सुगंध चंदन सांडोनिया माशी।
बसे दुर्गंधीशी अति आदरे॥

या देशाने संताची विभागणी सुद्धा जातीजातीतच केलेली. ज्ञानेश्वर तुकारामानंतर हरजातीतून एक संत जन्माला आला. देवाच्या दारी हे सर्व एक होते पण व्यवहारात परंपरागत जागेवरच होते. दलितांचे जीवन प्रत्यक्ष जगलेला चोखा हा चीड, संताप घेऊन येत नाही. त्यांच्या अभंगात बंडखोरी दिसत नाहीं. 'चोखा डोंगा परि भाव नोहे डोंगा' या अभंगांत चोखा स्वत:ला हीन समजून घेतो. उच्चवर्णियांपुढे तो श्वानासारखा लाळ घोटतो. तो म्हणतो, 'जोहार मायबाप जोहार। मी तुमच्या उष्टयांचा महार॥' हे पाहिले म्हणजे विषाद वाटू लागतो. विठ्लाच्या नामघोषात तल्लीन झालेला चोखा आपल्या पायरीला जपतो. देवळाची पायरी चढत नाहीं, का भीतीमुळे त्याला चढता येत नाही हे कळत नाही.

देवांचे अवतार, दैव, पुनर्जन्म आणि जातीव्यवस्था या संबंधी तरफदारी करणाऱ्या संताप्रमाणेच पंतांनीही ही वाट चोखळली. उलट माया ब्रम्ह आणि चैतन्यवादाच्या निबिड अरण्यात ते घुसले. बिकट वाट वहिवाट नसावी। धोपट

मार्गा सोडू नको' असे म्हणत जेव्हां तमासगीर आले तेव्हां ही वाट जनमानसापर्यंत आली. राम जोशी, अनंत फंदी, होनाजी बाळा, पठ्ठे बापूराव ही सवर्ण जातीतील, तसेच भाऊ फक्कड, हरिभाऊ वडगावकर, सातळजकर हे दलित समाजातील असे तमासगीर पुढे आले. तमाशाच्या बोर्डावर जातीयतेला चांगलीच चपराक बसली. सवर्ण जातीतील तमासगिरांचे सर्व साथीदार हे महारमांगच असावयाचे. या सर्वांनी लावण्या, वग यातूनच जाती, देव, माया, ब्रह्म इ. बाबींला कलगितुऱ्याच्या झगडयात सोंगाड्या या पात्राच्या मदतीने हास्यास्पद बनविले. पुढे पुढे तमाशाही महार-मांगांची कला म्हणून अव्हेरिली गेली.

याच दरम्यान ब्रिटिश सत्तेची नौबत या देशात झडू लागली. बंदुक आणि तराजू या बळावर त्यांनी राज्य केले. आपणास राज्य चालवायचे असल्यामुळे त्यांनी येथील धार्मिक बाबतीत ढवळाढवळ केली नाही. त्यामुळे येथील जातिव्यवस्था अधिकच बळकट झाली. तिला साचलेल्या तळ्याचे स्वरूप आले. इंग्रजांनी आपले राज्य चालविण्याकरिता इंग्रजी भाषा व्यवहारात आणली. या भाषेमुळे मात्र काही क्रांतिकारक बदल होऊ लागले. आगरकर, जोतिबा फुले यांसारखे विचारवंत निर्माण झाले. जोतिबा फुले यांनी जातिव्यवस्थेला पहिला हादरा दिला. याच विचारांचा वारसा घेऊन डॉ. आंबेडकर विचाराने तेजोगर्भ पेटता पलिता झाले. साहित्यातही नव्या विचारांचा ओघ येऊ लागला. साहित्यात केशवसुतांनी हा 'बंडाचा झेंडा फडकत ठेवला.' देव, दानवा, नरा निर्मिले' किंवा 'नरेच केला हीन किती नर' असे त्या काळी साहित्यात सांगणारे केशवसुतच एकटे भेटतात. त्यानंतर स्त्रियांच्या दुःखाना वाचा फोडण्यासाठी अनेक कथा कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. स्त्रीजीवनाचे मूर्तिमंत कारुण्य यमूच्या रूपानें 'पण लक्षात कोण घेतो' या कादंबरीत अवतीर्ण झाले. वा. म. जोशी यांची रागिणी, खांडेकरांची उल्का, केतकरांची कालिंदी या मानसकन्या बंडखोरीची भाषा वापरू लागल्या. पण या सर्वच स्त्रिया मध्यमवर्गाच्या असल्यामुळे दलित स्त्रियांच्या दुःखांना कोणी वाचा फोडू शकले नाही. याच काळात दलितांच्या भावविश्वात डोकावून बघण्याचा काही लेखकांनी प्रयत्न केला. श्री. म. माटे 'एक अस्पृष्टाची डायरी', विभावरी शिरूरकर (बळी), व्यंकटेश माडगूळकर ('बेत'कथा) इ. लेखकांनी या विषयाचा मागोवा घेतला. अगदी अलीकडे र. वा. दिघे (कार्तिकी), जयवंत दळवी (चक्र) यांचाही उल्लेख करावा लागेल. हे सर्वच लेखक पांढरपेशी होते. चित्रकारासारखे तेथील उपेक्षित वस्त्या व माणसे त्यांनी हुबेहूब चितारली. पण ती माणसे नुसती

चित्रेच वाटतात. त्यांना जीव नसतो. काही लेखकांनी तेथील पात्रे विकृत केली. झोपडपट्टीमध्ये नुसती कामवासना उफळणारी दृश्ये नसतात तर तिथेही जीवनाचा फार मोठा संघर्ष चालू असतो. दुर्बिणीतून एखादे बेट पहावे तसे ते दिसते. खऱ्या अर्थाने प्रथमच दलितांची जीवनस्वप्ने चितारणारे अण्णाभाऊ साठे होत. त्यांची भाषा दलितांची भाषा वाटते. त्यांचा 'फकिरा' दलित समाजाच्या अस्मिता जाग्या करतो. पण सर्वच कादंबऱ्यातून हे जाणवते असे नाही. पुढे तर फडक्यांच्या कादंबऱ्यांच्या ग्रामीण आवृत्या म्हणजेच जणू अण्णाभाऊच्या कादंबऱ्या असे वाटते. यानंतर दलित लेखकांतून पुढे आलेले शंकरराव खरात. यांच्या सर्वच कथा फडके लघुकथा तंत्रानें लिहिल्यामुळे एकसुरी वाटतात. त्यांचे सर्वच नायक मूक वाटतात. दलित समाजातील आज हजारों तरुणांना जे वाटते ते खरात बोलके करीत नाहीत. आजच्या तरुण पिढीत बाबूराव बागुलांच्या कथा-कादंबऱ्यांतून तरुणांचा आवाज सापडतो. ते आजच्या परंपरेला नकार देतात. त्यांच्या वाङ्मयात विद्रोही कल्लोळ असतो ते नुसते टीका करीत बसत नाहीत तर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या महा-परिनिर्वाणानंतर जी बेदिली माजते, तरुणांची जी कोंडी होते त्याचे प्रभावी चित्रण ते 'कोंडीत' करतात. स्वतःवरच कोरडे ओढण्याचे त्यांचे धाडस और आहे. हाच तेजस्वी ओघ आज बाळसे धरीत आहे. नवा लेखकवर्ग आज तयार होत आहे. तो तुरळक असेल पण तेवढाच ठसठशीत आहे.

आज मराठी साहित्यात साचलेपणा, दिशाहीनता, वैफल्य, अगतिकता आणि मरगळ या विकृतींचा फैलाव जोराने होत आहे. यंत्रयुगातील माणूस काहींना जंतूसारखा वाटतो. आपण जन्माला आलो तो एक अपघात आहे, आपल्या बापानें स्वतःच्या श्राद्धाची सोय करून ठेवली आहे. अशा विचारांचे अमाप पीक निघत आहे. अशोक शहाणे दि. पु. चित्रे हे या विचारसरणीचे गुरू आहेत असे बोलले जाते. चित्रे यांची 'केसाळ काळेभोर पिल्लू' ही लैंगिकतेने पिसाट झालेली कथा जीवनाचा कोणता तिरकस आशय शोधीत आहे ते कळत नाहीं. मराठी कवितेची जी अँथॉलाजी प्रसिद्ध झाली आहे त्यातील एक महान् कवी अरूण कोल्लटकर एका ठिकाणी म्हणतात, 'मैं भाभी को कहाँ, भाईकी ड्यूटी चलाउंगा क्या? तो भडक गयी साली' किंवा दुसऱ्या एका नवकवीच्या कवितेचे सूर आठवतत. 'तीन हिजडे तोळाभर सोने घेऊन गेले सोनाराकडे—मंगळसूत्र घडवायला' या प्रतिमांतून त्यांना काय सांगावयाचे आहे? या उलट दलित साहित्यकांची प्रेरणा आहे. समाजातील साचलेपणा

जाऊन जीवनओघ दुथडी भरून वाहणार आहे, जुन्या रूढी गळून पडणार आहेत असे ते मानतात. त्यांचा संताप 'बदल' मागण्याकरिता आहे. प्रस्थापिताविरुद्ध ज्यांची ओरड आहे त्या नवसाहित्यिकांना सामाजिक आच नाही.

दलितांच्या वाङ्मयास छेद देणारे काही वेगळे प्रश्नही निर्माण केले जात आहेत. यंत्रयुगात माणूस सारखा बदलत आहे. आर्थिक समानता आली तर अस्पृश्यता समूळ नष्ट होईल असे काही म्हणतात. आमच्या पूर्वजांनी दलितांवर अन्याय, अत्याचार केले ते आम्हाला सांगून काय उपयोग? आम्ही तर फारच पुरोगामी आहेत असेही सांगितले जाते. दलितांची विभागणी जातीय पायावर न करता ज्यांची ज्यांची पिळवणूक होते ते सारे दलित अशी व्याख्या करावी अशी मार्क्सवादी मंडळी म्हणतात. यासंबंधी मूलभूत विचार करतांना एक गोष्ट लक्षात येते की, या देशात साम्यवादी चळवळ सुरू होऊन ५० वर्षाचा काळ लोटला आहे. मार्क्सने जेव्हां साम्यवादाचा सिद्धांत सांगितला, तेव्हां त्यांच्यापुढे भारतातील चातुर्वर्ण्यावर आधारलेली समाजव्यवस्था नव्हती. या देशात राजकीय आणि आर्थिक जागृतीसंबंधी आपण जेव्हां सारेच पुढे असतो त्यावेळी येथील सामाजिक जागृती मुंगीच्या पावलाने चाललेली असते. आर्थिक प्रश्नांवर लढे देणारी कामगार युनियन, विड्यांचे कारखाने, गिरणीतील कापड खाते इत्यादि ठिकाणी अस्पृश्यांना घेण्यात अजूनही सामाजिक लढा देत नाही. एवढेच काय पण बोनसच्या प्रश्नावर एक होणारे कामगार जेव्हां कारखान्याबाहेर पडतात तेव्हां जो तो त्यांच्या जातीच्या झेंड्याखाली उभा राहातो. म्युनिसिपालटीतील कचरा खाते, जनावरांच्या दवाखान्यांत चिरफाड करणारी चतुर्थ श्रेणी किंवा भंगीकाम या जागेवर दलितांनाच का पुढे करतात याचा कुणीही जाणिवने विचार करीत नाही. या सबंध बाबींचा दलित लेखक जेव्हां विचार करतो तेव्हां त्याला या प्रश्नावर सर्व दलित पिढीतील नवा तरुणवर्ग मनाने दुभंगलेला दिसतो. ही व्यथा बाबूराव बागुल आपल्या कथेतून प्रभावीपणे मांडतात. गेल्या २५ वर्षाची दलित पिढी अशिक्षित होती. आज मोठा तरुणवर्ग शाळा, कॉलेजातून बाहेर पडत आहे. हा शिकलेला असल्यामुळे जादा संवेदनाक्षम झाला आहे.

कुरुवंशाच्या सूर्यकुळातील म्हणून ज्यांच्या रक्तात वर्णश्रेष्ठत्वाचे लोट वाहात आहेत असे अनेक आजचे लेखक कथा-कादंबऱ्या निर्माण करीत आहेत. या संदर्भात रामायण, महाभारतावरील कादंबऱ्या पाहाव्यात. जर्मन देश सूर्याचा

उपासक आहे म्हणून येथील सूर्याच्या उपासकांनी रक्तसंकर बेटी व्यवहाराने सुरू करावा असेही सांगणारे महाभाग आहेत. तेव्हां या देशातील बहुजन समाज जर सूर्यकुळातला असेल तर मग येथील दलित समाज कोणत्या कुळातला? हा प्रश्न शिल्लक राहतो. तेव्हां वर्णश्रेष्ठत्वाच्या कल्पनेने माणसाची विभागणी न करता 'माणूस' म्हणून त्याचे मूलभूत अधिकार बहाल करावेत.

सर्व जगात त्यांचे मूलभूत अधिकार बहाल करावेत. सर्व जगात आज धर्माची पिछेहाट होत असताना बौद्ध धर्मासंबंधी दलित लेखक का विचार करतो हा प्रश्न निर्माण केला जातो. जगातील इतर धर्म आणि बौद्ध धर्म यात मूलभूत फरक आहे. बौद्ध धर्माला आम्ही परंपरागत धर्मांच्या व्याख्येत बसवीत नाही. तो एक जीवनमार्ग आम्ही समजतो. हा धर्मच मुळी मूर्तीभंजक असल्यामुळे देव, दैव, जातिव्यवस्था, पुनर्जन्म या विषयांवर निकराचा हल्ला चढवतो. यातील पुराणकथा (myths) आम्ही तपासून पाहतो. जातक कथांमधील तात्विक सार घेऊन त्यात बुद्धांचा जो अनेक वेळा जन्म झाला या सर्व भाकडकथा आम्ही फेकून देतो. एवढेच काय बुद्धाला उपरती येण्यास जी चार दृश्ये सांगितली जातात त्यावर आमचा विश्वास नाही. वयाच्या २४ वर्षांपर्यंत प्रेत, महारोगी, वृद्ध, रोगी ही चार दृष्ये बुद्धांनी पाहिली नसतील हे खरे वाटत नाही. उलट ही विसंगती मागून घुसली असावी असे वाटते. शाक्य आणि कोलीया या दोन प्रबळ जमातीत जो रोहीणी नदीच्या पाण्यावरुन संघर्ष झाला त्यात या कलहाचे बीज शोधले पाहिजे. दु:खाचे मूळ शोधले पाहिजे या जाणीवेने गौतमबुद्ध घराबाहेर पडले असावेत. हे जे मत डॉ. बाबासाहेब आंबेडकर 'बुद्ध ॲण्ड हिज धम्म" या ग्रंथात सांगतात ते खरे वाटू लागते. तेव्हां या धर्मासंबंधी नव्या (myths) तयार होत आहेत. याचा कलात्मक आविष्कार साहित्यात होण्यास वेळ लागणार आहे. विज्ञाननिष्ठ असा बौद्ध धर्म जोपर्यंत रक्तात भिनत नाही तोपर्यंत तरी हे अवघड आहे.

आजवर जे लिखाण पद-दलित समाजावर लिहिले गेले ते जागतिक कीर्तीचे आहे असे आम्ही मानीत नाही. अक्षर वाङ्मयाच्या कसोटचा लावल्या तर कुठे कुठे हे वाङ्मय थिटेही पडेल याचीही आम्हांला जाणीव आहे. पण यातून एखादी जगात गाजणारी निग्रो लेखकाची रीचर्ड राइट सारखी 'नेटिव्ह सन' यासारखी कादंबरी किंवा जेम्स बॉल्डविन यांच्या 'फायर नेक्स्ट टाइम' (fire next time) या सारखे धगधगते वैचारिक वाङ्मय निर्माण होईल आणि तो बाब आपल्या मराठीलाच भूषणावह ठरेल.

# दलित साहित्य आणि माणुसकीची जिद्द

* दि. के. बेडेकर

आजच्या समाजात विषमता, दंभ, स्पर्धा आणि हिंसा ओतप्रोत आहे. कुटुंब ही संस्था कुटुंबातील व्यक्तींच्या परस्पर प्रेमावर आधारलेली आहे, पण तिच्यावर सुद्धा बाहेरून वेढणाऱ्या हिंसेचा एवढा प्रभाव आहे की कौटुंबिक प्रेमाला अवकळा आलेली आहे. ही नवी गोष्ट नाही. भाऊबंदकी ही कौरव पांडवाइतकी जुनी गोष्ट आहे. कुटुंबसंस्थेला जेथे अवकळा आलेली दिसते तेथे बाकीच्या सामाजिक संस्थांची दुर्गती केवढी असेल ?

अशा या अमानुष समाजात कोणत्याही समंजस, स्वाभिमानी आणि विवेकी व्यक्तीला रोजचे जगणे कठीण आहे. मग ती व्यक्ती वरिष्ठ वर्गात जन्मलेली असेल तर तिला खाण्यापिण्याचे हाल भोगावे लागत नाहीत, पण मानसिक दृष्टीनें त्याला जीवन असह्य होते. ती व्यक्ती दलित वर्गात जन्मली असेल तर तिला मानसिक हालअपेष्टा व शिवाय शारीरिक दैन्यही भोगावे लागते.

म्हणून इतिहासात असे घडलेले दिसते की वरिष्ठ वर्गातील आणि दलित वर्गातील अनेक व्यक्तींनी रूढ समाजजीवनाचा त्याग केलेला दिसतो. हा त्याग करून संन्यास घेणे, ईश्वरभक्तीत रमणे, किंवा समाज, रूढी विरुद्ध बंडखोरी करून छळ सोसणे असा मार्ग अनेकांनी पत्करलेला दिसतो.

ललित साहित्यामध्ये व इतर साहित्यामध्येही अशा बंडखोर व्यक्तींच्या मनोगतांचा, स्वप्नांचा व आक्रोशांचा प्रतिध्वनि उमटलेला सतत दिसतो व पाचदहा हजार वर्षे संस्कृतीच्या कोलाहलाबरोबरच हा करुण क्षीण आवाज सतत ऐकू येत आहे.

वरील पार्श्वभूमी आपण लक्षात घेऊ. एकनाथ, तुकाराम प्रभृतींचे वाङ्मय कारुण्याने आणि रुढींच्या अमानुषतेविरुद्ध केलेल्या आक्रोशाने भरलेले वाटते. पण अध्यात्म, धर्म, पारलौकिकता यांच्या पडद्यांतून संताचा हा आक्रोश बाहेर स्पष्टपणे निनादत नाही.

अलीकडच्या काळात पडदे विरळ व जीर्ण झाले आहेत. म्हणून फुले, आगरकर व केशवसुत यांची गर्जना सरळ व स्पष्ट ऐकू येत आहे. पूर्वीच्या धर्मप्रेषितांची धडपड समाजाला माणुसकीचा मार्ग दाखविण्याची होती, पण ऐहिकतेचा पाया तिला नव्हता. आता ऐहिकतेच्या पायावर स्थिर उभे राहून धर्मप्रेषितांच्या आवेशाने व करुणेने फुले प्रभृती नवे प्रेषित, नवा मानवधर्म घोषित करीत आहेत.

पूर्वीची तरुण माणसे संस्कारांनी बांधलेली व नव्या विचारांबाबत आंधळी व बहिरी होती. वृद्धांच्या मागोमाग ती जात व रुळलेल्या मार्गांनी नशीब काढीत, पराक्रम करीत किंवा नुसती संतती वाढवीत. आता बदल झाला आहे. तरुण मुले व मुली नव्या मानवधर्माचे, नव्या आचारविचारांचे स्वागत करू शकतील इतपत बंधमुक्त आहेत. नवे दिसण्याची व ऐकण्याची शक्ती त्यांना आहे. व नवे बोलण्याचीही त्यांना ईर्षा आहे.

यातूनच तरुणांचे साहित्य नव्याने निर्माण होत आहे. त्यातील काही दलित तरुणांचे आहे व काही वरिष्ठवर्गीय तरुणांचे आहे. हे वरिष्ठवर्गीय तरुण श्रीमंत घरांतून जन्माला आलेले आहेत असे बहुधा आढळत नाही. उलट दलितवर्गीय तरुण हलाखीचे जीवन जगत आहेत असेही नाही. आर्थिक सुस्थितीचा किंवा हलाखीचा प्रश्न येथे महत्वाचा नसून काही वर्गीय साहित्य परंपरांचा प्रश्न आहे, थोडाफार भाषेचा व तिच्या लकबींचा प्रश्न आहे. नागर आणि ग्रामीण साहित्य हा भेदही असाच लकबींचा फरक आहे. हा फरकच मौलिक आहे असे काही समीक्षक व लेखक मानतात. पण मला तसे वाटत नाही. खरा प्रश्न साहित्यातील माणुसकीच्या जिद्दीचा आहे.

तरुणांच्या साहित्यात, त्यांतून दलितांच्या साहित्यात, नवी जाणीव हवी किंबहुना ती प्रकट होतच आहे, असे आग्रहाने म्हटले जाते. पण नवी जाणीव म्हणजे काय? तिचा आधार कोणता?

आजच्या प्रतिष्ठित समाजामध्ये सत्ता व प्रतिष्ठा यांनाच मोठेपणा आहे, माणसाला माणूस म्हणून किंमत नाही. ह्या रोगाविरुद्ध झगडणारा माणूस

एकतर स्वतःच प्रतिष्ठा कमवू पाहील, त्यासाठी स्पर्धेला त्याज्य समजून, नव्या समाजरचनेसाठी धडपड करील. तिसरा एक प्रकार संभवतो तो असा, माणूस प्रतिष्ठेचे ढोंग ओळखून तिला शिव्या देईल, पण लढण्याचे टाळील. तो प्रतिष्ठेला व लढाऊ वृत्तीला सारख्याच शिव्या देत सुतकी चेहरा करून बाजूला बसेल. असा एकाकी कुढा माणूस स्वतःला व समाजाला विदूषकी चाळे करीत हास्यास्पद ठरवू पाहील.

या तीन प्रकारच्या प्रवृत्ती आज 'नव्या जाणीवा' या एका भोंगळ सदरात बसतात.

दलितांचे साहित्य मी जेवढे वाचले आहे ते या तीनही प्रकारचे आहे. 'माझा समाज आजवर दलित होता, त्याला आता प्रतिष्ठा मिळाली पाहिजे' ही प्रवृत्ती त्या साहित्यात दिसते, दलित जीवनाचे वास्तव त्यात रंगविलेले असते. पण तेही याच प्रवृत्तीने रंगविलेले असते. लढाऊपणा असतो तोही याच प्रवृत्तीनें भरलेला असतो. कधी कधी मात्र दुसरी व्यापक लढाऊ समाज-परिवर्तनाची जिद्द या साहित्यात आढळते. तिसरी वृत्ती दलितवर्गीय साहित्यात फार थोडी आढळते.

एकाकी, विदूषकी, सुतकीपणाची वृत्ती नागर तरुणांच्या साहित्यात प्रामुख्याने आज मला आढळली. दुर्बोध लैंगिक प्रदर्शनाचे आणि भग्न वृत्तीचे हे साहित्य दलितवर्गीय साहित्यापेक्षा वेगळे वाटते. या साहित्यात वरिष्ठवर्गीय साहित्याची परंपरागत रचनाशैली एका विपर्यस्त स्वरूपात जाणवते व त्यामुळे हे साहित्य कलात्मक दृष्टीने जास्त कसदार व प्रभावीदेखील ठरते. दलितवर्गीय साहित्यात हा कसदारपणा व प्रभावीपणा येणे आवश्यक आहे, अशी मात्र माझी भावना आहे. मराठी साहित्यही एक कलात्मक रचनेची परंपरा आहे व दीर्घकालात लाभलेली काही वैशिष्टये व सामर्थ्ये दलितवर्गीय साहित्यिकांनाही आत्मसात करायला हवीतच या दृष्टीने, वरील सूचना मला करावीशी वाटते.

हिंसा व प्रतिष्ठा यांच्या जागी प्रेम, सहकार्य व समता यांनाच आधार मानून व्यक्तीला व समाजाला जगता येईल, आणि अशा नव्या आधारावर जगणारा समाज आपण माणसे निर्माण करू, ही जिद्द म्हणजेच माणुसकीची जिद्द. तिचा उद्गार व आविष्कार आधुनिक साहित्यात होत आला आहे व तो यापुढे जास्तजास्त प्रखरपणे झाला पाहिजे. माझी ही श्रद्धा आहे व ती नागर व ग्रामीण, तसेच बंडखोर, वरिष्ठ व दलितवर्गीय साहित्याच्या वाचनाने

दृढ होत आहे. माणुसकीचा शोध आणि तिच्या प्रस्थापनेबद्दलचा अभिनिवेश कोणालाही नव्या साहित्यात दिसेल, असे मला वाटते.

आजच्या या साहित्यिक परिस्थितीत, कोणत्याही एका वर्गीय साहित्य संस्थेची गरज आहे, असे मात्र मला वाटत नाही. साहित्य संस्था ही इतर संस्थांप्रमाणेच एकीकडे उपकारक सामूहिक जीवनाची सोय असते, दुसरीकडे काही व्यक्तींच्या प्रतिष्ठेची ती जागा असते. हाच शाप कोणत्याही संस्थेला भोवणे अटळ असते. वर्गीय अलग संस्थेलाही तोच शाप राहतो. अलग वर्गीय संस्थासाहित्य क्षेत्रामध्ये नोंदण्यात आणखी एक धोका आहे. तो असा की वर्गीय साहित्याला एकंदर साहित्याच्या प्रवाहातील बऱ्यावाईट अशा सर्वच संस्कारापासून मग विलग राखले जाईल व ते वर्गीय साहित्याला मारकच ठरेल. हा प्रश्न वर्गीय साहित्यापुरताच नाही. 'पुरोगामी' साहित्याला अलग ठेवण्यातही हाच धोका आहे. वर्गीय असो, नाहीतर पुरोगामी असो, कोणताही साहित्यिक, किंवा कोणत्याही प्रवृत्तीचे साहित्य, व्यापक साहित्य प्रवाहापासून अलग होऊन चांगले वाढू शकत नाही. इतर प्रवृत्तींशी दोन हात करीत व इतरांपासून घेण्यासारखे असेल ते स्वीकारीत प्रत्येक प्रवृत्तीला वाढावे लागते.

वरिष्ठवर्गीय साहित्यसंस्थांच्या बाबतीत कोणी काही दोष दाखवू शकतील व असे दोष महाराष्ट्रीय समाज जीवनांतच अंगभूत आहेत. पण मराठी साहित्य संस्थांनी दलितवर्गीय साहित्यिकांना किंवा अहिंदू धर्मीय साहित्यिकांना बाजूला ठेवण्याचे पाप पूर्वीही केले नाही व आजही तशी प्रवृत्ति आढळत नाही अशा परिस्थितीत वेगळ्या साहित्य संस्था असाव्यात असे मला वाटत नाही साहित्यक्षेत्रात वर्ग, प्रतिष्ठा, संप्रदाय वगैरे सारे काही आहेच. पण वेगळेपणाने या दोषांवर मात करता येत नाही व त्या दोषांना बळच मिळते. तो मार्ग म्हणूनच मला अयोग्य वाटतो.

# साहित्यातील बंडखोरीचे ब्राम्हणी कर्षण असायला हवे

भालचंद्र नेमाडे

मराठवाड्याच्या संपादकांनी प्रस्तुत चर्चेसाठी तयार केलेला मसुदा मुळातच काही निष्कर्ष काढून समतोल करून ठेवला असल्याने चर्चेत भाग घेणाऱ्यांना समतोलपणाचा घोळ घालावयास काहीच जागा ठेवली नाही, हे जरी स्तुत्य असले तरी ह्या चर्चेला पूर्णपणे वाङ्मयबाह्य स्वरुप देण्याचा दोष त्या मसुद्यात आहे. लिहिणारांच्या जातीवरून साहित्याचे वर्गीकरण ज्या कसोट्यांनी केले जाते त्या कसोट्या साहित्य चर्चेच्या सोयीसाठी केलेल्या नसाव्यात हे उघड आहे.

आधुनिक मराठीत सर्वच साहित्यावर ब्राह्मणी अभिरुचीचे कर्षण होते, तिचे हळूहळू विस्तृत मध्यमवर्गीय अभिरुचीत रुपांतर होत आले. ह्या अभिरुचीमुळे दलितवर्गीय लेखकांच्या साहित्यावर अन्याय होईल अशी आज परिस्थिती नाही. एकतर खुद्द ब्राह्मणांत 'शूद्रवृत्ती' वाढत चालली आहे आणि निवळ नोकरीवर जाणारा हा समाज स्वतःची पाळेमुळे विसरून आपोआप उदारमतवादी झाला आहे. खरडून पाहिले तर कुठेतरी त्याच्यात लपलेले ब्राह्मण्य दिसते व ते त्यामुळे अतिशय केविलवाणे दिसते. किंबहुना ह. ना. आपट्यांपासून नाट्यछटाकार दिवाकर, चिं. वि. जोशी, गंगाधर गाडगीळ व व्यंकटेश माडगूळकर आदी सर्वांच्या गद्यात स्वतःवर आत्मपरीक्षण लादून घेतलेल्या उदारमतवादी समाजाचे अत्यंत हृदयंगम चित्र महाकाव्यासारखे पसरलेले दिसते. मराठी ब्राह्मणांनी साहित्यात बंडखोरांची ही जी परंपरा निर्माण केली त्याला अन्यत्र तोड नाही. एका मृतवत समाजातल्या अग्रेसर जमातीकडून हे जे घडले ते कमी मोलाचे नाही. अशा वर्गाच्या अभिरुचीला आज लवचिक सौंदर्यदृष्टीचे अधिष्ठान आहे.

मराठी दलितवर्गीयांचे शहरीकरण साहेबीकरण व ब्राह्मणीकरण भराभरा होत असल्याने खास दलितवर्गीय लेखक खऱ्या अर्थाने कोण असू शकतो ह्याची सुद्धा शंका आहे. शिवाय आजच्या मध्यमवर्गीय साहित्य परंपरेत कोणत्याही एका अहंमान्य वर्गाची शिरजोरी चालणार नाही अशी परिस्थिती असतांना दलितवर्गीय साहित्य असे वेगळे दालन असण्याची काहीच गरज नाही. आपल्या दलितवर्गात झपाट्याने बदल होत असून त्यांना स्वतःचे स्थित्यंतर निश्चितपणे करायचे आहे. कारण आपल्या मुसलमानांप्रमाणे सत्व जपता जपता विशाल सामाजिक जीवन गमावण्याचे वेड त्यांच्यात नसावे. पुरातन काळापासून हा समाज शेजारी म्हणून आणि कष्ट करणारा म्हणून राहात असल्याने ह्याच्याबद्दल इतरांच्या मनात अतिशय सहानुभूती आहे.

ही सहानुभूती जाणेही आवश्यक आहे. तिच्या जागी वैर पाहिजे की वेगळेपणा की समान संबंध हे अर्थात ह्या समाजावरच अवलंबून आहे. सध्या चालणाऱ्या दलितांच्या राजकारणावरून व समाजकारणावरून त्यांना मुसलमानांसारखे की व्यापारी मारवाडीगुजराथ्यासारखे की पारशांसारखे व्हायचे आहे हे नीट कळायला मार्ग नाही. परंतु निदान मराठी मध्यमवर्गीय साहित्य-क्षेत्रात मिसळून जाऊन एकाच परंपरेत राहण्याला दलितवर्गीय लेखकांना परक्या-सारखे वाटणे साहजिक आहे. मराठीतल्या मोठमोठ्या कवींनी महारामांगांना शिव्या देवून ठेवल्या आहेत किंवा मराठीत ह्या जातीचे अनेक दुष्ट वाक्य-प्रचार रूढ आहेत इत्यादि गोष्टी पुसून टाकता येण्यासारख्या नाहीत. म्हणजे ह्या परंपरेशी जुळते घ्यावे लागेल असा दास्यत्व पत्करण्याचा सल्ला देणेही कोणत्याच भूमिकेवरून योग्य ठरत नाही. त्याप्रमाणे तुकारामाला व मराठी भाषेला सेन्सॉर करणेही शक्य नाही. असा हा एक नमुन्यादाखल प्रश्न उभा करता येईल. भावनेच्या आहारी न जाता काही तोडगा काढला तर त्यालाही अर्थ नाही. शेवटी असेच दुःखाने म्हणावे लागेल की नव्या युगात मोठमोठ्या जनसमुदायांना प्रगत राष्ट्रीय परंपरामध्ये मिसळून जाण्यासाठी आपण होऊन मोठा त्याग करावा लागला आहे. हे काही पिढ्यांपुरते दुखणे राहते व मग ते इतिहासजमा होते. स्कॉटलोक, अमेरिकेतील निग्रोसकट आंग्लेतर लोक, सोवियत संघातील रशियनवजा लोक ही इतिहासाच्या वरवंट्याखालची अलीकडची उदाहरणे होत. अर्थात आपल्या दलितवर्गापुढे अनेक मार्ग आहेत परतु आयुष्य-भर व शतकानुशतके बंड करणाऱ्या व्यक्ती व समाजही भ्रामक कल्पना आहे असा निष्कर्ष काढून दलितवर्गीय लेखकांनी पाहिजे तो मार्ग अनुसरावा.

एकंदरीने दलितवर्गीय लेखकांच्या मनात सहजासहजी हे सर्व विचार कल्लोळ येणे अटळ आहे व त्यांची प्रतारणा करणे फार वेळ शक्य नाही. केव्हांतरी ह्या संघर्षजन्य समाजविद्रोहाचे जातिवंत साहित्य ह्या समाजातून मराठीत येणे अपरिहार्य आहे ते आजही मनोमन असेल. फक्त लिहून झालेले नाही. परंतु इथे मुद्दा असा की जो अर्धपोटी, अशिक्षित व अजून अस्पृश्य समजला जाणारा, सर्व दृष्टींनी मागासलेला दलितवर्ग महाराष्ट्रात आहे त्या समाजाच्या भावभावना मांडणारा कोणी खास लेखक मराठीत आहे काय? आणि असला तरी ह्या समाजात जन्मलेल्या लेखकाने ह्याच समाजाचे प्रतिनिधित्व करावे काय? वरील दोन्ही गोष्टी एखाद्यात असल्या तरी त्याने अण्णाभाऊ साठ्यासारख्या रटाळ कादंबऱ्या लिहिल्या तर ह्या दोन्ही गोष्टींचा काय उपयोग? ह्या उलट रा. बाबूराव बागुलांसारख्या साहित्यिकाने दलित वर्गाचे प्रतिनिधित्व करण्याची आमदारी-खासदारी मर्यादा का पाळावी? अशा गोष्टी किरकोळ ग्रामीण कथा लेखकांवर सोपवल्या तर अधिक बरे. ज्याअर्थी अरुण कोलटकर, भाऊ पाध्ये व बाबूराव बागुल ह्या तीन लेखकांचा बेबंदपणा एका पिढीचा आहे. त्याअर्थी समाजविद्रोहाच्या वाङ्मयाला सामाजिक सांप्रदायिकतेची कसोटी लागण्याची गरज नाही. अस्सल साहित्य निव्वळ पार्श्वभूमीवर उभे रहात नाही. दलित समाजाची पार्श्वभूमी विद्रोही साधन म्हणून वापरणाऱ्या दलितवर्गीय लेखकांनी विद्रोही व्यक्तिमत्व तरी असावे किंवा अन्यायी हिंदु-समाजाला क्षमा करणारे उदार व्यक्तिमत्व तरी असावे. दोन्ही प्रकारात प्रखर स्वाभिमान आवश्यक आहे.

परंतु आजच्या दलितवर्गीय समाजात नेमके असे स्वाभिमानी व्यक्तिमत्व जोपासले जात नसल्यामुळे आणि आसपासच्या प्रचंड बहुजन समाजात मिसळून जाण्याचे त्यांचे स्वप्न असल्यामुळे ह्या लेखकांकडून नवी साहित्यिक परंपरा किंवा नवे दालनही उघडण्याची आशा नाही. आपल्या जाणिवा अशा नकळत मध्यमवर्गीय जाणिवांशी फितुरी करताना पाहून चिडलेले हे लेखक त्याचे खापर उघडपणे वर्णधर्माच्या आणि गांवगावकीच्या अन्यायावर फोडून बचाव करून घेतात. शहरी पार्श्वभूमीवर हीच वृत्ती भांडवलशाहीचा व नोकरशाहीचा उल्लेख करून समाधान पावते.

उदाहरणार्थ, आजपर्यंतच्या मराठी साहित्यातली स्त्री, इंग्रजी साहित्यातल्या स्त्रीचा परिणाम जमेस धरूनसुद्धा सर्व देशात सबंध अशी कोणालाही लिहिता

आली नाही. याचे कारण हिंदु स्त्री अजूनपर्यंत स्वतंत्रपणे जगत नाही व त्यामुळे हिंदु पुरुषांना स्त्री कल्पनेनेच पुरी करावी लागते. आपल्या दलितवर्गीय लेखकांनाही बहुधा अशी 'पवित्र' मूर्ख स्त्री आदर्श वाटत असावी. वस्तुतः आपल्या दलितवर्गातील स्त्रिया कुठल्याही प्रगत समाजातील स्त्रियांपेक्षा अधिक स्वतंत्र, स्वावलंबी व आदर्श आहेत. डॉ. आंबेडकरांनी बौद्धधर्म जिथे आहे, त्या देशातील स्त्री इतर देशातील स्त्रियांच्या तुलनेने किती स्वतंत्र आहे हे सांगितले. त्याचा आपल्या दलितवर्गीय व नव-बौद्ध लेखकांनी विचार करावा. ही दलित स्त्री मराठी साहित्यात आहे तशी आली तर अतिशय तेजस्वी होईल. परंतु त्यासाठी मध्यमवर्गीय मूल्यांना विरोध करण्याची, एवढेच नव्हे तर त्यांना हसण्याची ताकद दलितवर्गीय लेखकांमध्ये आहे काय? सारांश अशा प्रकारची बंडखोरी व्यक्तिमत्वाचा एक आवश्यक भाग झाल्याशिवाय काही झाले तरी ह्या लेखकांना नीटपणे कांहीच लिहिता येणार नाही हे उघड आहे. रा. शंकरराव खरात ह्यांना गळचेपी झालेल्या समाजाचे अस्सल नमुने कितीही माहीत असले तरी अशा शापित जमातीचे चित्रण करण्याची त्यांची पद्धत अत्यंत दूषित आहे. त्यांना पोलिसांचा, नव्या युगातील अन्यायाचा किंवा वरच्या वर्गाच्या धूर्तपणाचा चौकटीसारखी कायम आधार हवा असतो. वस्तुतः एका शिवीत ही सगळी चौकट संदर्भित करता येते. रा. नारायण सुर्वे ह्यांनाही स्वतःला कधीच न कळलेले तत्त्वज्ञान पाठीशी घेणे आवडते आणि त्यामुळे त्यांच्या पूर्णतः नव्या प्रतिमा कोणत्यातरी काल्पनिक वर्गाचा संदर्भ परिणामकारक ठरतात हे महत्त्वाचे आहे. इतर पांढरपेशी कवी व लेखक अर्थातच महत्त्वाचे नाहीत, कारण त्यांचा विचार दलितवर्गीय म्हणून करता येत नाही.

वस्तुतः आपल्या दलितवर्गातून अनेक जातिवंत लेखक यावेत अशी आम्हा सर्व वाचकांची अपेक्षा आहे, कारण इतरांनी त्यामानाने काहीच सोसलेले नसते. परंतु दलितवर्गाच्या लेखकांनी स्वतःचे जातिनिष्ठ अड्डे, साहित्य परिषदा, पत्रिका काढून स्वतःच्या जातीच्या फालतू लेखकांची प्रशंसा करून आम्हा वाचकांस लाज आणली आहे. हे ब्राह्मणीकरणाचे परिणाम म्हणावे तर त्यातही प्रमाणिकपणा नाही, जो ब्राह्मणात लोकहितवादींपासून फार आहे. त्यातूनही डॉ. आंबेडकरांनी ज्या निष्ठेने क्रांतिकार्य आरंभिले त्याला दलितांच्या साहित्यात व समाजकारणातही समांतर कार्य नाही ही सुद्धा शरमेची गोष्ट आहे. थोर साहित्यात दिसून येणारे दुःखानुभवाचे वैभव, माणुसकीच्या भव्य चौकटीला मानणारे माणसामाणसांचे विविध संबंध, सृष्टीशी शारीरिक जवळिकीने

निर्माण झालेल्या संवेदना, दुःखावलेले मन व हीनगंड इत्यादी मोठमोठ्या गोष्टी दलितवर्गात जन्मलेल्यांशी जितक्या असतील तितक्या मध्यमवर्गीयांपाशी खचितच नाहीत. तरीही ह्या वर्गातून मोठे लेखक का होऊ नयेत याची वस्तुनिष्ठ छाननी करू जाता खालील कारणे सापडतात.

नवनव्या साहित्यनिर्मितीला परंपरेचे जे पाठबळ असते ते दलितवर्गीय प्रतिभावंतांना मिळत नाही. असे पाठबळ इंग्रजी अंमलानंतर सबंध मराठी साहित्यिकांनाही फारसे राहिले नाही त्यात दलितवर्गीय साहित्यिकांना तर थोडेसेही नाही. शाहिरानंतर गावठी साहित्य फोफावण्याची शक्यता होती, त्यात दलितवर्गीयचे स्थान अटळ ठरले असते, परंतु तेही झाले नाही. दुसरे कारण म्हणजे पराकोटीचे दुःख व हीनपणाचे ओझे आपल्या दलितवर्गाने इतके सोसत आणले आहे की अशा लोकांनी साहित्यनिर्मितीसारखी त्यामानाने पोरकट क्रिया का करावी असे वाटते. पुस्तक लिहिणे ही खास उच्चवर्गीय सुखी समाजाची एक करमणूक आहे, तिचे उदात्तीकरण झाल्यावर तेवढे थोर साहित्य होते. खूप दुःख सोसणाऱ्यांना पुस्तके लिहिणे हा पोरखेळ वाटणे साहजिक आहे. किंबहुना माफक सोसणाऱ्यांनाच किंवा जाणवून घेणाऱ्यांनाच लिहिणे जमते असे धोपट विधान केले तर दुःखाने ज्यांची सौंदर्यदृष्टी होरपळून निघाली आहे त्याचा वरील विधानामुळे बहुमान केल्यासारखाच होईल. आणखी एक शक्यता म्हणजे आजच्या समाजात सर्वत्र सामाजिक संस्थांवर उच्चवर्गीयांची सत्ता आहे, त्यामुळे दलितवर्गीयांना स्वतःचे साहित्यविश्व नैसर्गिकरीत्या वाढवावयाचे असल्यास साहित्याशी संबंधित सर्वत्र संस्थांमधील मिरासदारी स्वतःकडे घेतली पाहिजे.

ह्या संस्थांपैकी भाषा ही एक होय. त्याहूनही महत्वाची म्हणजे अनुभव घेण्याची एक अदृश्य संस्था आहे. दुसऱ्यांसारखे अनुभव घेण्याची बहुसंख्याकांची धडपड चाललेली असते. उदाहरणार्थ नाटके, सिनेमा पाहणे, पु. ल. देशपांडे वाचणे, संध्याकाळी फिरायला ठराविक ठिकाणी ठराविक रस्त्याने जाणे इत्यादी, ह्या सर्व प्रकारांतून शेवटी ठराविक बथ्थड अनुभव जमून साहित्यिकांची, सिनेतारकांची व राजकारण्यांची युगे आपोआप निर्माण होतात. समाजात कुठपर्यंत अराजक रेषा असाव्यात हे आजचा माणूस विसरून जगत आहे. त्यामुळे

आजच्या वाचकाला जिथेतिथे टोले बसतात, तिथे तिथे तो वचकून त्या साहित्याला मान्यता देतो हे विसाव्या शतकातल्या गाजलेल्या पुस्तकांवरून सहज कळून येईल. तेव्हां जिथे व्यंकटेश माडगूळकर आणि दिभावरी शिरूरकर यशस्वी होतात तिथे दलितवर्गातल्या कोणत्याही लेखकाला यश मिळणे सोपे आहे. अर्थात् कोणत्याही संस्थेवर सत्ता काबीज करण्याचे व्यक्तिपरत्वे अनेक मार्ग असतील व ह्या अनुभव घेण्याच्या संस्थेला बौद्ध धर्माचे अधिष्ठान देऊन दलितवर्गाला ही एक सत्ता मिळवून देण्याचे द्रष्टेपण डॉ. आंबेडकरांना अभिप्रेत असावे. परंतु जो नवबौद्धवर्ग साहेबीकरणात शहरीकरणात व ब्राह्मणीकरणात बदलून जात आहे. त्याला नव्या युगातल्या प्रस्थापित सत्तेशी जुळवून घेणे भाग ठरले आहे. ज्यांना नव्या युगात चुरशीने वर यायचे आहे त्यांना दहापैकी किती पारमिताना आत्मसात करणे जमेल? निदान आज तरी कोणही नवबौद्ध साहित्यिकाने बौद्धधर्म नीट अभ्यासल्याचे दिसत नाही. प्रचारकी थाटाच्या कथाकवितांमध्ये अधूनमधून उल्लेख येतात तेवढेच. नवबौद्ध लेखकांना धर्म ही एक अडगळ होण्याची मात्र शक्यता आहे. एकोणिसाव्या शतकात भूतकाळ उकरून हिंदू झाले त्यातलाच हा प्रकार असल्याने ही लाट संपून जाईल व माणसाला समाधान मिळण्यासाठी अशा कोणत्याही एका आधाराची गरज नाही हे जागृत दलित समाजाला आपोआप कळून येईल. शिवाय हिंदु राष्ट्रीयतेने बौद्ध धर्म हे आपलेच एक अंग मानून टाकल्याने तिथेही पुन्हा नवबौद्धांची बंडखोरी पराजय पावते. खरे तर वैयक्तिक स्वातंत्र्याशिवाय कोणत्याच दडपणातून सुटता येत नाहीं व हे स्वातंत्र्यच आपल्या दलितवर्गीयांनी मिळवले तर पुरे आहे. धार्मिक स्वातंत्र्यासकट इतर सर्व 'स्वातंत्र्ये' अवडंबरेच होत. सामाजिक अर्थाने साहित्य म्हणजे व्यक्तिपरत्वे अनुभव घेण्याचे व ते व्यक्त करण्याचे स्वातंत्र्य आहे.

# अस्पृश्यतेचे ओझे नाहीसे करा म्हणजे मन आणि वाङमय स्वच्छ होईल

* म. भि. चिटणीस

प्रचलित भारतीय भाषांप्रमाणेच मराठीतील एकोणिसाव्या शतकापूर्वीची संतकवींची साहित्य परंपरा ही स्मृतिप्रणीत हिंदू धर्मापेक्षा काहीशी वेगळी भूमिका धारण करते. आध्यात्मिक क्षेत्रात कुलापेक्षा शीलाला, धर्मकांडापेक्षा भक्तीला प्राधान्य देणाऱ्या भूतदयावादी या संप्रदायाला काही आंग्ल लेखक, बुद्धोभागवत संप्रदाय म्हणून संबोधितात. महायान पंथातील करुणा आणि शील यांचे महत्त्व या संप्रदायाच्या साहित्यांत असले तरी व्यवहारासाठी तो चातुर्वर्ण्यांतर्गत सामाजिक विषमतेचेच केविलवाणे समर्थन करतो. वस्तुतः "हे सर्व ब्रह्म आहे आणि त्या ब्रह्मतत्वाचा अंश प्रत्येक माणसात आहे" असा लोकशाहीला आणि सामाजिक समतेला तात्विक अधिष्ठान देऊ शकणारा विचार इतर देशांच्यामानाने सर्वप्रथमं भारतामध्ये उपनिषदांतून मांडलेला आढळतो. परंतु त्याचा व्यावहारिक परिणाम पूर्वापार चालत आलेल्या उपजिविकेच्या साधनांच्या मक्तेदारीला बाधक ठरतो, म्हणून की काय वैदिक हिंदु धर्मानें तो वैचारिक कक्षेत कोंडून ठेवला. संतानांसुद्धा हा सामाजिक समतेचा विचार सामाजिक समतावादी इस्लामच्या संपर्काने सामाजिक क्षेत्रात कार्यशील करणे सुचले नाहीं. इस्लामी आक्रमणापेक्षा एकोणिसाव्या शतकातील भारतावरील ख्रिस्ती धर्माचे आक्रमण कितीतरी सौम्य होते. परंतु त्या काळांत भारतातील काही प्रामाणिक धार्मिक नेत्यांना आपल्या औपनिषदिक विचारांची आठवण झाली. आणि त्यांच्या साहृयाने हिंदू समाजाला सामाजिक परिवर्तनाची प्रेरणा देण्याचा त्यांनी प्रयत्न केला. म्हणूनच सामाजिक समतेचा विचार आध्यात्मिक क्षेत्रापुरताच मर्यादित करणारे एकोणिसाव्या शतकापूर्वीचे मराठी साहित्य, किंबहुना त्या काळचे सर्वच देशी भाषेतील साहित्य, समता आणि

बंधुता यांच्या आधारे नवी समाजरचना करू पाहणाऱ्या लोकशाही युगाला स्फूर्तीचे उगमस्थान ठरू शकत नाही.

ह्या साहित्याची परंपरा ती केवळ चातुर्वर्ण्य मानते म्हणूनच लोकशाहीला अपायकारक आहे इतकेच नव्हे, तर उठल्यासुटल्या देवाला शरण जाऊन आत्मविश्वास खच्ची करणारी अंधश्रद्धा, "ठेविले अनंते तैसेचि रहावे" अशी स्थितिशीलता, आणि जीवन बदलण्याची ईर्ष्या मारणारी दैवधीनता ती वाढवते. म्हणूनही ती साहित्यपरंपरा विकासोन्मुख लोकशाहीला अपायकारकच ठरते. विश्वनिर्मात्याचा शोध घेणारी ही परंपरा, विश्व कसे निर्माण झाले या वैज्ञानिक जिज्ञासेलाही मारक आहे. कार्यकारणभाव शोधण्याऐवजी दैवी चमत्कारांवरच ती भरवसा ठेवते. मनाचे आधुनिकरण ही आजच्या युगाची गरज आहे. परंतु ह्या परंपरेचे संस्कार मात्र भौतिकाच्या जाणिवांच्या कक्षा विस्फारण्याऐवजी गतानुगतिक अंधश्रद्धा जोपासत राहतात. ह्या तिच्या स्वरूपाला अनुलक्षून मराठी साहित्याच्या अभ्यासकांना डॉ. आंबेडकर एक प्रश्न विचारीत असत, "हात उभारून सांगे तुका। नाम घेतल्याविना राहु नका" या शिवाय तुमच्या जुन्या साहित्य परंपरेचा कोणता संदेश आहे?

तरीही या परंपरेच्या एका विशेषतेचाही डॉ. आंबेडकरांनी निर्देश केला आहे. ती म्हणजे या परंपरेत वैयक्तिक नीतिमत्तेवर दिलेला भर. कोणत्याही काळातील वाचकाला अल्पकाळ तरी अंतर्मुख करण्याचे सामर्थ्य या परंपरेतील काही संत कवीत आहे. आपापल्या काळातील ध्येयासाठी समर्पित जीवन जगणारी ती थोर माणसे होती. त्याग, भूतदया, ध्येयनिष्ठा, सदाचार, शील संयम, लीनता इत्यादी नैसर्गिक मूल्यांचा त्यांनी जागजागी तळमळीने आविष्कार केला आहे. या त्यांच्या नैतिक जाणिवांशी नाते जोडण्याला कोणत्याही काळात प्रत्यवाय नसावा असे वाटते.

ज्या राजकीय स्वातंत्र्यासाठी एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात ज्या संघटना, आंदोलने आणि विचारमंथन झाले ते ऐतिहासिक दृष्ट्या केवळ एकाच बाबतीत अपूर्व होते. अगदी अठराव्या शतकाच्या अंतापर्यंत भारत राजकीय स्वातंत्र्य अनुभवीत होता. अकबर, शिवाजी, फार काय बाजीराव यांच्या काळातही या देशातील काही भाग तरी राजकीय स्वातंत्र्याचा अनुभव घेत होता. एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात ज्या

स्वातंत्र्यप्राप्तीच्या कार्यात हा देश मग्न होता ते स्वातंत्र्य प्रादेशिक स्वरूपाचे नसून राष्ट्रीय स्वरूपाचे होते. या काळात आणखी अगदी नव्या आणि अपूर्व अशा एका साध्यासाठी भारत झगडत होता. ते साध्य म्हणजे लोकशाही शासन पद्धती. राष्ट्रीय स्वातंत्र्य नव्हे तर लोकशाही स्वातंत्र्य पद्धती ही या देशातील अनन्यसाधारण अशी क्रांती होती. प्रत्येक माणसाला समान प्रतिष्ठा (वन मॅन वन व्हॅल्यु) हे तत्व जातिभेदाने समाजाला शकलीत करणाऱ्या या देशातील धर्मव्यवस्थेला मूलतः जीवन मरणाचे एक आव्हानच होते. राजकीय स्वातंत्र्याची चाहुल आणि त्याची रणधुमाळीही मराठीतील वाङ्मयात कानी पडते. परंतु लोकशाहीच्या पायाभूत सामाजिक समतेचा विषमताधिष्ठित रूढ धर्माशी झालेला संघर्ष मात्र कोठेच आढळत नाही. आर्थिक समतेचे पुरस्कर्ते, साम्यवादी नेते लघुकथा, कादंबऱ्या, नाटके यातून नायक म्हणूनही वावरताना दिसतात. परंतु सामाजिक गुलाम असे जे कोट्यावधी नागरिक या देशात शेकडो वर्षे सैन्यात आणि दारिद्र्यात खितपत आहेत, ते मात्र एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकात प्रतिष्ठित लेखकांच्या कलाकृतीत बहुधा डोकावत नाहीत. प्रत्येक जात ही जणू काही स्वतंत्र जगासाठी स्वयंपूर्ण आणि म्हणूनच की काय साहित्यिकांच्या अनुभूतींना आपापल्या जातीच्या मर्यादा पडतात. वस्तुतः लोकशाही शासनपद्धती ही उच्चवर्णीयांच्या नेतृत्वाच्या मक्तेदारीला आव्हान होते.. परंतु ह्या आव्हानाच्या विराट स्वरूपाची जाणीव उच्चवर्णीय साहित्यिकांत कधीच प्रखरतेने निर्माण झाली नाही. या वर्गातील विचारवंत आता राजकीय क्षेत्रातील जातीयतेसंबंधी तीव्रतेने बोलतात आणि लिहितात. परंतु जातीयतेच्या भावनांचे निर्मूलन निदान ती बोथट करण्याचे कार्य या साहित्यिकांनी पूर्वीही केले नाही आणि आताही त्यांच्या हातून ते घडत आहे असे दिसत नाही. वस्तुतः सामाजिक परिवर्तन घडविण्यात साहित्याचा फार मोठा वाटा असतो. वर्तमान आणि भावी सामाजिक तणावांची चाहूल त्यांच्या संदवेनाक्षम मनाला अगोदरच लागते, जगातील साहित्याचा अनुभव आहे. आपल्या साहित्यात असे घडले नाही याचे कारण आपल्या मनावरची जातिव्यवस्थेची पकड हे होय.

आणखी एका आवश्यक आणि महत्त्वाच्या जाणिवेचा सद्यः परिस्थितीच्या संदर्भात अभाव जाणवतो. ती जाणीव म्हणजे राष्ट्रीय एकात्मतेची. अस्पृश्य जातीजमातीप्रमाणे मुसलमान बांधव यांच्या जीवन-लेखनालाही आपल्या प्रस्तुत साहित्यात स्थान नाही. महाराष्ट्रेतर प्रदेशातील आपल्या देशबांधवांच्या जीवन

चित्रणाचा अभावच आहे. आपल्या शेजारच्या प्रदेशातील इतकेच नव्हे तर शहरातील आपल्या शेजारी राहण्याऱ्या परप्रांतीयांच्या जीवनाची दखल आपल्या साहित्याने घेतली नाही. ही उणीवसुद्धा प्रस्तुत साहित्यात तीव्रतेने जाणवते.

दलितांच्या जीवनाच्या जाणीवा अभिव्यक्त करण्यासाठी नव्या भाषेची नव्या रुपाची आवश्यकता आहे असे मला तरी वाटत नाही. अमेरिकेतील निग्रो समाजाचे "ब्लुईस" आणि "स्पिरिच्युअल" हा अमेरिकन वाङमयात एक अभिनव प्रकार होतो. निग्रो समाज हा वांशिकदृष्टया व अमेरिकन समाजाहून वेगळा असल्यामुळे त्यांनी आपल्या जाणीवांच्या अभिव्यक्तीसाठी वरील दोन गीत प्रकार निर्माण केले. अस्पृश्य समाज हा काही भारतीय अस्पृश्यतेतर समाजाहून वांशिकदृष्टया वेगळा नाही. त्याची भाषा, संस्कृती ही सुद्धा समानच आहे. फरक एवढाच की, त्या संस्कृतीपासून त्याला दीर्घकाळ वंचित ठेवले होते, आता त्याला संस्कृतीची सर्व दालने मोकळी झाली आहेत. स्वाभाविकच भाषा संस्कृती संबंधी दुरावा न मानता त्यांचाच वारसा ते पुढे चालू ठेवतील. दुसराही एक विचार लक्षात घेण्यासारखा आहे. कितीही स्वतंत्र प्रज्ञेचा कलावंत असला तरी तो आपली अशी अगदी अभिनवशैली परंपरेचा संपूर्ण त्याग करुन निर्माण करीत नसतो. आशय कितीही विरोधी असला तरी तो विद्यमान कलाकृतीचीच प्रतिक्रिया असते. हे अभिनव वाटणाऱ्या कलाकृतीसंबंधी आंद्रे मालरू यांनी केलेले विधान येथे लक्षात घेण्यासारखे आहे. साहित्यिक हा जणू काही एका परिसंवादात भाग घेणाऱ्याची भूमिका करीत आहे. आजपर्यंतच्या कलाकृतीवरील नव्या आशयाने तो आपली प्रतिक्रिया नोंदवीत असतो. या परिसंवादातील त्याची संस्कृती इतरांशी समान असेल तर त्याला आपल्या जाणिवांच्या अभिव्यक्तिसाठी अगदी अभिनव रुपे व भाषा यांची आवश्यकता आहे असे वाटत नाही.

दलितांनी स्वीकारलेला बौद्ध धर्म बौद्धांच्या धार्मिक म्हणजे डॉ. बाबासाहेब आंबेडकरप्रणीत बौद्ध धर्म होय. बौद्धांच्या धार्मिक वाङमयात सुमारे दीड हजार वर्षे सारखी भर पडत होती. नैतिक आचारप्रधान हीनयान पंथापासून अनाचारी तंत्रप्रधान वज्रायनासारखे त्यात अनेक पंथ झाले. डॉ. आंबेडकरानी आपल्या "बुद्ध अॅन्ड हिज धम्म" या ग्रंथात बौद्ध धर्माचे स्वरुप विशद करताना बुद्धीवादाच्या निकषावर टीकणाऱ्या केवळ बुद्धवचनांचा त्यांनी स्विकार केला आहे. त्यातून जो "धम्म" आपल्या समोर येतो तो एक लोकशाही

शासन पद्धती यशस्वी करण्यासाठी व्यक्तीच्या मनाच्या संस्करणासाठी ज्या नीतीमत्तेची व गुणांची आवश्यकता आहे, त्याचेच प्राधान्याने विवेचन करणारा आहे. हा बौद्ध धम्म म्हणजे लोकशाहीचा एक जीवनमार्ग आहे. असा धम्म स्वीकारल्यामुळे दलितवर्गीय लेखकाच्या जाणिवा लोकशाहीतील नागरिकापेक्षा वेगळ्या राहू नयेत. त्या वेळच्या असण्याच्या कारण ते अद्यापि संक्रमणाच्या उंबरठ्यावर उभे आहेत. हिंदू धर्मातील अन्यायाचे ओझे अद्यपि त्यांच्या पाठीवर आहे. आणि जोपर्यंत बौद्ध धर्म स्वीकारुनही यांच्या पाठीवरील अन्यायाचें ओझे हलके होण्याऐवजी वाढतच राहिले तर त्यांच्या जाणिवात बौद्ध धर्माच्या प्रभावापेक्षा हिंदू धर्म व संस्कृतीची प्रतिक्रियात्मक चीडच अधिक होत राहिल.

त्यांच्या बौद्ध धम्मात चमत्काराला स्थान नाही. कारण तेथे माणसामाणसाने एकमेकांशी बंधुतने वागावे यासाठी निर्माता, पिता, शासक म्हणून ईश्वराच्या कल्पनेची आवश्यकता मानलेली नाही. चमत्कृतीयुक्त पुराणकथा हृया ईश्वराच्या अस्तित्वाच्या कल्पनेतूनच संभवतात. नवबौद्धांच्या बौद्ध धर्मात ईश्वर नाही. त्यांच्या प्रमाणेच जातक कथांनाही स्थान नाही. तेव्हां त्यांच्या वाङमयात "मिथस्" पुढेमागे झाल्याच तर ते ज्या देशाचे रहिवासी आहेत त्या देशाचे जे राष्ट्रीय आर्षमहाकाव्य महाभारत यांतील असू शकतील, किंवा फ्राईडने आपल्या मनोवगाहन शास्त्रात कल्पिलेल्या सर्व मानवास समान अशा पुराणकथा असू शकतील.

# धर्म आणि जाती यांच्या कोषांतून दलित बाहेर पडले पाहिजेत

* नरहर कुरुंदकर

बौद्ध धर्माच्या श्रद्धा आणि बौद्ध धर्मातील पुराणकथा यांचा विचार पुन्हा एकदा नव्याने केला पाहिजे. असे वाङ्मयात जेवढ्या जास्त प्रमाणात येतील तेवढ्या हव्याच आहेत. कारण त्या सर्व श्रद्धा व पुराणकथा संपूर्णपणे भारतीय आहेतच, येथील भूतकालीन समाजजीवनाचा भाग आहेत. रामचंद्राचा राज्यत्याग हा जितका भारतीय मनात घर करून बसलेला आहे तितकाच तथागतांचा गृहत्यागही लोकमानसांत आदरणीय ठरलेला आहे. म्हणून खरा प्रश्न बौद्धांच्या धर्मश्रद्धा आणि पुराणकथा मराठीत आणण्याचा नाही. त्या आणाव्यात यावर एकमत आहे. हे कार्य करणाऱ्याचे स्वागतच होईल. खरा प्रश्न आहे तो हा की यामूळे वाङमयीन प्रवाहात काही महत्त्वाचे बदल होतील काय? वाङमयाच्या दिशा-परिवर्तनाच्या दृष्टीने या धडपडीचा काही उपयोग होईल काय? या दोन्हीला माझे उत्तर "नाही" असे आहे.

हिंदु धर्मावर श्रद्धा असणारे कोटयावधी लोक आहेत. बौद्ध धर्मावर श्रद्धा असणारेहि कोटयावधी लोक आहेत. या श्रद्धावंत मंडळींना आपापला धर्म परिपूर्ण व पवित्र वाटला तर त्यात आश्चर्य काहींच नाही. कारण सर्वांनाच आपले धर्म पवित्र वाटत असतात. श्रद्धावंतांना एखादी गोष्ट पवित्र वाटली तरी इतिहासाच्या अभ्यासकांनां असे श्रद्धाळू राहता येत नाही. इ. स. पूर्वी ६ व्या शतकात बौद्ध धर्म निर्माण झाला. हा बुद्ध धर्माच्या उदयाचा कालखंड जर डोळ्यासमोर ठेवला तर अहिंदूची धर्मश्रद्धा, त्यांची जीवनमूल्ये, त्यांच्या पुराणकथा आणि बौद्धांच्या पुराणकथा यांत पुष्कळच मोठा फरक दिसतो. या ठिकाणापासून आपण इ. स. च्या आरंभापर्यंत येऊन पोहोचलो व महायान पंथाचा एकदम उदय झाला म्हणजे झपाटयाने दोन धर्मातील अंतर कमी होऊ लागते. बुद्ध धर्मातील बहुतेक सगळया श्रद्धा आता हिंदू धर्मात आहेत. श्रद्धा आहेत,

त्यांची अंमलबजावणी नव्हती. बौद्धांच्या मानवधर्माची अंमलबजावणी जर त्या कालखंडात झाली असती तर आज हिंदुस्थानात जातिव्यवस्था शिल्लकच राहिलेली दिसली नसती.

आज ज्यावेळी आपण हिंदू व बौद्ध धर्माकडे इतक्या अंतरावरून पाहू लागतो त्यावेळी कथा वेगळचा, पण धर्मश्रद्धा त्याच असे स्वरुप दिसू लागते. मग हिंदू धर्मात असणाऱ्या त्याग, वैराग्य, अहिंसा सांगणाऱ्या कथा असोत की बौद्ध धर्मातील कथा असोत. दोन्ही धर्मातील जीवनमूल्ये एकच असल्यामुळे व धर्मश्रद्धाही एकच असल्यामुळे फक्त कथांचाच बदल होतो. हे नुसते बौद्धांनाच लागू नाही तर जैनांनाही लागू आहे. सर्वच भारतीय धर्माची नावे व कथा वजा जाता मूल्यांची सरणी एकच आहे. अशा परिस्थितीत सारे बौद्ध वाङमय मराठीत यावे, त्यांच्या पुराणकथा मराठीत याव्यात याचे कुणीही स्वागत करील. पण त्यामुळे सर्व पुराणे मराठीत भाषांतरित केल्यामुळे आधुनिक मराठी वाङमयावर जेवढा परिणाम होईल तेवढाच बौद्ध पुराणांचाही होईल.

बौद्ध धर्माचा विचार करीत असतांना नुसता भगवान बुद्ध डोळचासमोर ठेवून चालणार नाही त्या त्या धर्माचा अडीच हजार वर्षांचा इतिहास आहे. चीन गेली सुमारे दीड हजार वर्षे प्राधान्याने बुद्ध आहे. जपानही असाच सुमारे बाराशे वर्षे बुद्ध आहे. पण या देशांची बुद्धधर्म स्वीकारल्यामुळे सरकारशाही सरंजामशाही, राजेशाही यांना काही धक्का बसला नाही. २० व्या शतकाच्या उदयापर्यन्त बुद्ध धर्माखाली वावरणाऱ्या या देशात विविध प्रकारची गुलामगिरीही वावरत होती. तिलाही बुद्ध धर्माचा अडथळा झाला नाही. हिंदुस्थानात सुद्धा तथागतांच्या काळातच अनेक राजे, व्यापारी, सरदार यांनी उल्हासाने बुद्ध धर्माची दीक्षा घेतली. सरंजामशाही जीवनातील सत्ताधाऱ्यांना या धर्माच्या स्वीकारामुळे आपल्या हितसंबंधाना काही बाधा येईल असे कधीच वाटत नव्हते. तशी बाधा आलेली दिसतही नाही. मानवी गुलामगिरी सरंजमाशाहीत असते. या सरंजामशाहीला हिंदू, बौद्ध, जैन सगळेच धर्म सारखेच लाडके व प्रिय होते. कोणताच धर्म त्यांचे हितसंबंध धोक्यात आणीत नव्हता. ज्या धर्माने सरंजामशाहीच्या काळात सरंजामशहा होतील, वरिष्ठ वर्गाचे हितसंबंध धोक्यात आणले नाहीत ते धर्म भांडवलशाहीच्या उदयानंतर भांडवलदारांनाही दूरचे वाटले नाहीत. १७व्या, १८व्या शतकात उद्योन्मुख भांडवलदारांनी यूरोपमध्ये धर्माविरुद्ध झगडा दिला असेल पण आज धर्माची चिंता सर्वात जास्त भांडवलदारां-

नाच वाटते भांडवलशाहीच्या पुढे समाजवादाच्या दिशेने वाटचाल करताना कोण-ताच धर्म धर्मश्रद्धा, धार्मिक जीवनमूल्ये यांचा मार्गदर्शक म्हणून उपयोगी होण्याचा संभव नाही कोणत्याच धर्माचा उपयोग नाही म्हटल्यानंतर सामाजिक प्रगतीला बौद्ध धर्माचाही उपयोग फारसा होणार नाही हे उघड आहे.

हिंदूंचा धर्म जरी झाला तरी तो तोंडाने आत्म्याची समानता सांगतो. व्यवहारात माणसाची गुलामगिरी चालू ठेवतो, गरजेनुसार राजांच्या सोयी सांभाळतो. अधःपतित होऊन तंत्र व वामाचार या चिखलात लोळू लागतो. याहून निराळे चित्र बौद्ध धर्माचे नाही. इ. स. च्या ४ थ्या शतकानंतर मंत्रयान, तंत्रयान, वज्रयान या नावाने वामाचार व अंधश्रद्धा या चिखलात बुद्ध धर्मही खूप रंगला. तिबेट तर याच वातावरणात २० व्या शतकाच्या आरंभापर्यंन्त होता.

बौद्ध धर्माचा स्वीकार करावा की नाही हा अगदी निराळा प्रश्न आहे. त्याचे उत्तर 'करावा वाटेल त्याने करावा, वाटणार नाही त्याने 'करु नये' असे आहे. पण बौद्ध धर्म स्वीकारल्यामुळे जातिव्यवस्था मोडण्यास काही मदत होईल काय ? या प्रश्नाचे उत्तर मात्र काही मदत होणार नाही असे आहे. हे जसे सामाजिक जीवनाविषयी आपण म्हटले तसेच वाङमयाविषयीही आहे. नव्या धार्मिक श्रद्धा व्यक्त करणारे वाङमय निर्माण करावे काय, अशा प्रयत्नांचा वाङमयावर काही परिणाम होईल काय ? याचे उत्तर 'नाही' असे आहे.

(२) प्रस्थापितांविरुद्ध आज नव साहित्यात काही सूर उमटतो आहे असे मला वाटत नाही. नवसाहित्यिक जी बंडखोरी करीत आहेत तिचे लक्ष प्रस्था-पित वाङमयीन मूल्ये बदलणे इतकेच आहे. सामाजिक जबाबदारी आणि सामाजिक जाणिवा यांना बाजूला ठेवून व्यक्तींच्या कोषातच हे वाङमय वावरत आहे. ज्यांना अन्नच मिळत नाही त्यांचा अन्न मिळण्याचा लढा निराळा आणि ज्यांना अन्न मिळते पण खाण्यात अर्थ वाटत नाही त्यांचा लढा निराळा. दलितांची जाणीव ही सामाजिक अन्यायाच्या विरुद्ध बंड करणारी आणि माणूस म्हणून जगण्याचा हक्क मागणारी अशी आहे. दलितांना जीवनात व जीवन जगण्यात अर्थ वाटतो. म्हणूनच ते जीवन बदलण्याच्या मार्गाला लागलेले आहेत. वाङमयीन बंडखोरी करणाऱ्यांना जीवनातच अर्थ वाटत नाही. त्यांना जग बदलण्याची गरज वाटत नाही. आपल्याला हा जाणवणारा जीवनाचा निरर्थकपणा पटवून देणे इतक्याचीच गरज वाटते. सारे नवसाहित्यच सामाजिक जाणिवा व

सामाजिक जबाबदारी यापासून दूर सरकले आहे. दलितवर्ग, सामाजिक विकृतीवर बोट ठेवून हा रोग नष्ट करू इच्छितो. आमच्या साहित्यिकांचे लक्ष व्यक्तीचे शरीर मन यात असणारी विकृती या ठिकाणी गढलेली आहे. व्यक्तींची सुद्धा विकृती तपशिलाने फक्त समजून घ्यावयाची आहे. शक्य तर या विकृतीचे समर्थन करावयाचे आहे. पण विकृतीवर उपाय शोधावयाचा नाही. आजच्या नवसाहित्यिकांना विकृती मान्य आहे. त्यांची दुरुस्ती शक्य वाटत नाही. दोन प्रकारच्या बंडातील हा फरक माझ्या मते अधिक महत्त्वाचा आहे.

३) सध्याच्या दलित समाजात वैचारिक वाङ्मय व आत्मपरीक्षणात्मक वाङ्मय अतिशय कमी आहे. आत्मपरिक्षणाची आणि चिंतनशीलतेची गरज वाटावी, त्याचे महत्त्व लक्षात यावे येथपर्यंत अजुन दलितांची चळवळ जाऊन पोहचलेली नाही. समाजाचा एक भाग अस्पृश्य मानने हे असमर्थनीय आहे, तो अन्याय आहे, ही एक प्रकारची गुलामगिरी आहे, ती ताबडतोब नष्ट झाली पाहिजे. सर्व अस्पृश्यांना समाज जीवनाच्या सर्व कक्षांत बरोबरीचे हक्क मिळाले पाहिजेत आणि समता प्रस्थापित झाली पाहिजे. ही समता प्रस्थापित व्हावयाची असेल तर दरिद्रि आणि मागासलेल्या समाजाला विकासाचा अग्रहक्क मिळाला पाहिजे, काही संरक्षणे मिळाली पाहिजेत. या बाबी आता सर्वमान्य झालेल्या आहेत. भारतीय संविधानाने या भूमिकेचा स्वीकार केलेला आहे. भारतातील जनसंघासह सर्व प्रमुख राजकीय पक्षांनी या भूमिका मान्य केल्या आहेत. त्यामुळे आता अस्पृश्य समाजातील नेत्यांनी या सर्वमान्य बाबीकडे लक्ष ठेवूनच भागणार नाही. या पलीकडील प्रश्नांचाही विचार करावा लागेल. पण अशी गरज अजून त्या समाजातील नेतृत्त्वाला वाटत नाही दुःखाची गोष्ट अशी आहे की प्रत्यक्ष बाबासाहेब आंबेडकरांच्या बाबतीतसुध्दा एखादे विवेचक चरित्र कुणी लिहिलेले दिसत नाही. बाबासाहेब सुध्दा महान राजकीय नेते होते तरी शेवटी एक माणूस होते. त्यांना सुध्दा सर्व दलित समाज एका संघटनेत आणता आला नाही. सवर्ण हिंदूंना अस्पृश्यांचा विश्वास संपादन करता आला नाही. पण अस्पृश्य समाजातील एका जातीजमातीला दुसऱ्या जातीजमातीचा विश्वास संपादन करता आला नाही. या घटनेचे केव्हा तरी एकदा मूल्यमापन करावे लागेल. बाबासाहेबांनी विभक्त मतदारसंघ मिळविलेला होता. पण गांधीजींच्या उपोषणामुळे त्यांनी हा आग्रह सोडला. शेवटी गांधीजींचे प्राण वाचले हे मान्य केले तरी हरीजनांचे हित कशात होते ? विभक्त मतदारसंघात होते की संयुक्त मतदारसंघात होते ? जर ते विभक्त मतदार-

संघात असेल तर मग एक माणूस वाचवण्यासाठी कोट्यावधी दलितांचे हक्क बाबासाहेबांनी सोडून का दिले आणि जर दलितांचे हित संयुक्त मतदारसंघात असेल तर बाबासाहेबांनी विभक्त मतदारसंघ मागितलाच कां ? बाबासाहेबांना सुध्दा महाराष्ट्राबाहेरील अस्पृश्य वर्गात फार मोठा पाठिंबा मिळवता आला नाही. असे का होते ? अस्पृश्यांचे कोणते हक्क सवर्ण हिंदूंनी निदान त्यांच्यातील उदारमतवाद्यांनी फारसा लढा न देता मान्य केले आहेत ? हे आणिअसे शेकडो प्रश्न आहेत. ज्यावर विचार करण्याची गरज दलित समाजाला वाटत नाही.

दलित समाजासमोर आज नेमका प्रश्न कोणता आहे ? समान नागरिकत्वाचे त्यांचे हक्क आता कायद्याने मान्य झालेले आहेत. यापुढचा झगडा अधिक गुंतागुंतीचा आहे. शिक्षणाच्या सवलती मिळाल्या आणि नोकरीच्या सवलती मिळाल्या म्हणजे वैचारिक विकासाची शक्यता निर्माण होते. पण शक्यता निर्माण झाली म्हणजे विकास होतोच असे नाही. शक्यता असुनसुध्दा विकास का खुंटतो याचे उत्तर इतरांशी भांडून मिळत नसते. ते आत्मनिरीक्षण करुन मिळत असते. अस्पृश्यांचा दुसरा प्रश्न कायद्याने समानता मिळाली तरी सवर्ण हिंदूंचा समाजाने त्यांना मनात आपणाला समान म्हणून स्वीकारावे यासाठी केवळ झगडा पुरत नसतो, त्यासाठी काही सौजन्य व कृतज्ञता यांचीही गरज लागते. उठल्या बसल्या हिंदूधर्माला शिव्या देऊन, गांधी-नेहरुंना तुच्छ लेखून, कॉंग्रेसच्या छायेखाली वावरायचे व सत्तेच्या राजकारणांत तडजोडी करायच्या ही पध्दत संघटनेची शक्तीही वाढवीत नसते. पण याहीसाठी एकदा आपण, आपले नेते, आपल्या संघटना, आपली कार्यपध्दती यांचे चिंतन करावे लागते. त्याचीही तयारी या समाजाला अजून दिसत नाही.

अस्पृश्यांच्या समोरचा, दलितांच्या समोरचा सर्वात मोठा प्रश्न आर्थिक दारिद्र्याचा आहे. आणिहा प्रश्न केवळ अस्पृश्यांचा नाही. तो ७८ टक्के शेतमजुरांचा, आणि १० टक्के औद्योगिक मजुरांचाही प्रश्न आहे. हा प्रश्न आदिवासींचाही आहे याबाबत जातीच्या आणि पंथाच्या चौकटीतून बाहेर आल्याशिवाय दलितांच्या संघटना काही करु शकणार नाहीत.

शेवटी दलितांना दलित म्हणूनच उरावयाचे आहे की आपले दलितपण संपवावयाचे आहे. अस्पृश्यता टिकवावयाची आहे की संपवावयाची आहे ? दलितांच्या संघटनांनी सुध्दा उरलेला सगळा समाज अस्पृश्य समजून स्वतःपासून दूर ठेवला आहे. कोणत्याच राजकीय नेत्याविषयी कोणत्याच सामाजिक तत्त्वज्ञानविषयी

आणि कोणत्याही राजकीय संस्थेविषयी आपल्यातील कुणाला ममत्व वाटू नये याची फार काळजी या संघटनांनी घेतलेली आहे.

जीवनाचा प्रवाह पुढे जात असतो. तो वेदावर संपला नाही तसा बुद्धावरही संपणार नाही. शंकराचार्य आणि शिवाजी यांच्यापुढे समाजप्रवाह चालू राहिला. हा प्रवाह बाबासाहेबांच्या नंतरही चालूच राहणार आहे. काही प्रश्न एका मार्गाने सुटतात काही प्रश्न दुसऱ्या मार्गाने सुटतात अस्पृश्यांच्या बलाढ्य संघटना उभारून जे प्रश्न सुटणे शक्य होते ते सुटलेले आहेत. या संघटनांच्या चौकटी ओलांडून जे प्रश्न सोडवावयाचे आहेत त्यासाठी जुने मार्ग उपयोगी पडणारे नाहीत. एका टप्प्यात मठ बांधण्याची गरज असते तेव्हां तो बांधावाच लागतो, त्यानंतर मठ सोडून बाहेर येण्याची गरज लागते या टप्प्यावर जे मठात अडकून राहतात ते परिस्थितीचे आव्हान स्वीकारू शकत नाहीत. जी आव्हाने दलित वर्गासमोर आहेत. फार मोठा विचारसंघर्ष केल्याशिवाय व अस्पृश्य समाजातून, दलितांच्या मधून नवे विचारवंत पुढे आल्याशिवाय हे प्रश्न सुटू शकणार नाहीत. नव्या ललित लेखकांची गरज असते, पण तितके पुरेसे नाही, नव्या विचारवंतांचीही गरज असते.

(४) ज्ञानेश्वरापासून १९ व्या शतकापर्यन्तचे साहित्य प्रामुख्याने हिंदु धर्माच्या व चातुर्वर्ण्य व्यवस्थेच्या चौकटीत निर्माण झालेले साहित्य आहे ही गोष्ट खरी आहे. पण ते साहित्य केवळ ब्राम्हणांचे नाही, तसे ब्राम्हणांच्या विषयीही नाही. त्यात नामदेवासारखे शिंपी आहेत, जनाबाई तुकाराम यांच्यासारखे मराठे आहेत, होनाजीसारखे गवळी आहेत, चोखामेळ्यासारखे महार आहेत, शेख महंमदाप्रमाणे मुसलमान आहेत, कान्होपात्रेसारख्या नायकिणी आहेत. असा त्या वाङ्मयाचा चौरस पसारा आहे. तरीही ते वाङ्मय हिंदुधर्माच्या चौकटीत निर्माण झालेले वाङ्मय आहे ही गोष्ट खोटी नाही. पण त्या वेळेचे जीवनच हिंदुधर्माच्या चौकटीतील जीवन आहे. स्वातंत्र्यपूर्व काळातील वाङ्मय हे ज्याप्रमाणे पारतंत्र्यात निर्माण झालेले वाङ्मय आहे पण पारतंत्र्याचा पुरस्कार करणारे वाङ्मय नाही त्याचप्रमाणे वारकरी साधुसंतांचे वाङ्मय हे हिंदुधर्माच्या चौकटीत निर्माण झालेले वाङ्मय आहे पण ते चौकटी सांभाळणारे नाही, चौकटी मोडून बहुजन समाजाला नवी अस्मिता, नवी जागृती आणि नवा आत्मविश्वास देणारे वाङ्मय आहे. या वाङ्मयाचा अभ्यास, इतिहास, संस्कृती आणि साहित्य या संदर्भात करावयाचा असतो. कालिदासाचा अभ्यास राजेशाहीचा पुरस्कार करावयासाठी करावयाचा नसतो.

या ठिकाणी ज्ञानेश्वरांबाबत थोडे स्पष्ट लिहिण्याची गरज आहे. आजचा ब्राम्हणसमाज ज्ञानेश्वराला आपल्यापैकीच एक मानतो आणि ब्राम्हणेतर समाज सुद्धा ज्ञानेश्वर ब्राम्हण समजतो. हा घोटाळा ब्राम्हणेतरांनी नीट समजून घेतला पाहिजे. रामाची कहाणी, कृष्णाची कहाणी या क्षत्रियांतल्या कहाण्या आहेत, ब्राम्हणांच्या नव्हेत, त्या फक्त ब्राम्हणांनी लिहिल्या. वसिष्ठाची कहाणी ही मात्र ब्राम्हणांची कहाणी आहे. ज्ञानेश्वरांचे असेच झाले. ज्ञानेश्वर ही जातिबहिष्कृताची संतती. त्याला कुणी गावात येऊ दिले नाही, शाळेत शिकू दिले नाही. त्याची मुंज होऊ दिली नाही, मुंजच नाही म्हणून लग्नही नाही. हे सारे धर्मबहिष्कृत, जातिबहिष्कृत असणारे, ब्राह्मण समाजाबाहेर वाढलेले लोक. त्यांच्या गुरुपरंपरेत मच्छेंद्र गोरक्षण, गहिनी. कोणीच ब्राम्हण नाही, असा हा ज्ञानेश्वर. महाराष्ट्रातल्या लक्षावधींनी या धर्मजातिबहिष्कृताला आपली 'आई' मानले, आपला 'सखा' मानले म्हणून ब्राम्हणांनी त्याला पुढच्या काळात गुपचूप आपल्यात दाखल करून घेतले. प्राचीन मराठी वाङ्मयाचा विचार करताना या वाङ्मयाचा सर्वात मोठा कवी, सर्वात मोठा तत्वज्ञ, सर्वात मोठा प्रेरक एक धर्मबहिष्कृत, जातिबहिष्कृत असा मुलगा आहे व तो बहुजन समाजाच्या मेळाव्यात जगला, वाढला व संपला आहे, याचे भान विसरू देऊ नये. ब्राम्हण समाज आज ज्ञानेश्वराला ब्राम्हण म्हणतो उद्या कोणत्याही मोठ्या माणसाला ब्राम्हण ठरवून आपल्यात घेईल. लक्षावधी समाजाने वंदनीय ठरवून एक माणूस मोठा करावयाचा व ब्राम्हणांनी तो अलगदपणे उचलून स्वतःच घ्यावयाचा हे घडू देता उपयोगी नाही विशषत: ज्ञानेश्वराच्या बाबत बहुजन समाजाने अधिक काळजी घेतली पाहिजे कारण हा मराठीचा पहिला बंडखोर आहे

(दै. मराठवाडा, दिवाळीअंक १९६९)



# २

## लेख

रा. भि. जोशी

सुधीर बेडेकर

रा. ग. जाधव

वि. स. खांडेकर

शरच्चंद्र मुक्तिबोध

बाबूराव बागूल

शशिकांत गावसकर

पु. ल. देशपांडे

प्र. श्री. नेरूरकर

जनार्दन वाघमारे

# दलित साहित्य

* रा. भि. जोशी

गेल्या सुमारे वर्ष-दीड वर्षात दलित साहित्यासंबंधी इतके आणि इतक्या वेगवेगळ्या दृष्टिकोनातून लिहिले गेले आहे, की ते लेखन विचारात घेऊन ह्या विषयाची सुसंगत चर्चा करण्याला ही योग्य वेळ आहे, असे वाटते.

पहिली गोष्ट अशी दिसून येते की, "दलित" कोणाला म्हणावे आणि "दलित साहित्य" कशाला म्हणावे, ह्यासंबंधी वेगवेगळी मते आहेत. आर्थिक विषमतेचा बळी असलेला कामगारवर्ग आणि सामाजिक विषमतेचा बळी झालेला "अस्पृश्य" समाज, ह्या दोन्ही "दलितां" च्या जीवनाचा समावेश करून घेणारे आणि त्यांच्या उद्धाराची दिशा दाखवणारे, मार्क्सवाद आणि आंबेडकर-वाद ह्यांचा समन्वय ज्यात घडलेला आहे अशा तत्वज्ञानाची प्रेरणा असलेले साहित्य निर्माण होणे इष्ट आणि आवश्यक आहे असा विचार, दलित साहित्य आणि दलित साहित्यिक ह्यांच्याबद्दल सहानुभूती बाळगणारे आणि त्यांचे निकटवर्ती समीक्षक डॉ. सदा कऱ्हाडे ह्यांनी मांडला आहे. पण त्यांना असे दिसून येते की सामाजिक दृष्ट्या "दलित" असा जो "अस्पृश्य" समाज तोच दलित साहित्यिकांना "खराखुरा" आणि "अधिक" दलित वाटतो "म्हणून दलित साहित्य अशाच दलित समाजाचा कैपक्ष घेणार आहे" असे त्यांना वाटते.

दलित साहित्यिकांची ही भावना अगदीच निराधार नाही, "स्पृश्य" आणि "अस्पृश्य" अशा दोन्ही वर्गांचे कामगार गिरण्या कारखान्यांच्या आंत सारखेच "दलित" असले तरी कारखान्यातून बाहेर पडल्यावर, बाहेरच्या समाजात "अस्पृश्य" जातीचा कामगार स्पृश्यापेक्षा अधिक "दलित" होतो. "ऑल ॲनिमल्स आर ईक्वल, बट सम ॲनिमल्स आर मोअर ईक्वल दॅन अदर्स" हे जसे, तसेच, सगळे "दलित" च पण त्यांतले काही अधिक "दलित" असतात.

स्पृश्य जातीचा मनुष्य त्याच्याबरोबर समानतेने व्यवहार करणार नाही. एखादा सुशिक्षित "अस्पृश्य" हजार दीड हजार रुपये पगारावर ऑफिसर म्हणून काम करीत असला, तरी स्पृश्य जातीचा मनुष्य त्याच्या घरचे काम करायला तयार होत नाही. शहरात आणि काही शहरवजा गावांतून परिस्थिती थोडी बहुत बदलत असली तरी ज्यांना तिची झळ लागते, त्यांचे अंग पोळल्यावाचून कसे राहील ?

पण ह्याच्याही पुढे डॉ. सदा कऱ्हाडे ह्यांना आणखी असे जाणवले आहे की, "दलित" म्हणवणाऱ्या साहित्यिकांचा "दलित" (किंवा अस्पृश्य) समाज हा सर्व "अस्पृश्यांना" सामावून घेणारा समाज नसून, फक्त महार समाज आणि तोही "डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या चळवळीनंतर अस्तित्वात पावलेला नवा बौद्ध समाज" च. महाराष्ट्राबाहेर तर राहोच, पण खुद्द महाराष्ट्रातही डॉ. बाबासाहेबांबरोबर किंवा त्यांच्या नंतर बौद्ध धर्माचा स्वीकार न केलेला असा बराच मोठा अस्पृश्य किंवा अस्पृश्यसदृश समाज आहे. त्यांचा कैवारी कोण? त्यांच्यासंबंधी कोण लिहिणार? "दलित साहित्य" त्यांचा परामर्श घेणार नसेल तर ते ज्या माणुसकीचे माहात्म्य मानते त्या माणुसकीचे काय व्हायचे? महाड येथे गेल्या फेब्रुवारीत भरलेल्या बौद्ध साहित्य सम्मेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करतांना श्री. बागूल यांनीही डॉ. बाबासाहेबांचा आणि भगवान बुद्धाचा "दलितांची प्रेरक शक्ती" म्हणून उल्लेख केला. तो उल्लेख ते ते संमेलन "बौद्ध" साहित्य संमेलन होते म्हणून केला की बौद्धेत्तर अस्पृश्यांनाही त्यांनी त्याच प्रेरणा लागू केल्या होत्या? आणि त्या ते मानीत नसतील तर? नाहीतच. त्यांनी त्या प्रेरणा मानल्या असत्या तर ते डॉ. बाबासाहेबांचे आणि बौद्धधर्माचेही अनुयायी झाले असते. म्हणजे दलितांमध्येही बौद्धांचा एक वेगळा समाज झाला आहे आणि "दलित साहित्य" सर्व दलितांना सामावून घेण्याइतके व्यापक नाही, असा अर्थ होतो. मग ह्या मर्यादित कक्षेतल्या साहित्यिकांनी निर्माण केलेले साहित्य सगळ्या दलित वर्गाचे प्रतिनिधिक असे मानायचे? "दलित" कोण हे ठरवण्याची काही वस्तुनिष्ठ कसोटी आहे, की ज्याने त्याने आपल्यापुरते दलित कोण हे ठरवायचे?

दुसरी गोष्ट अशी की, अस्पृश्यवर्गाची दुःखे अजून नष्ट झाली नसली तरी नष्ट होण्याच्या मार्गाला लागली आहेत की नाही? डॉ. बाबासाहेबांनी उच्च शिक्षणाच्या संस्था स्थापन केल्यापासून हजारो नाहीं तरी शेकडो अस्पृश्य

तरुण पदवीधर होऊन सरकारी नोकऱ्यांवर लागले आहेत. राजकारण करीत आहेत. त्यांची आर्थिक स्थिती, त्यांची राहणी, त्यांचे इतर समाजांबरोबरचे संबंध बदलत आहेत. स्पृश्य समाजात त्यांचे स्नेहीसोबती आहेत. ते त्यांच्या घरी जातात येतात, त्यांच्या बरोबरीने अन्न व्यवहारही करतात. मग अस्पृश्यांची "दलित"ता ही स्थिर, अचल वस्तू आहे, की हळूहळू का होईना पण नाहीशी होत चाललेली वस्तू आहे? कामगार हा कामगार म्हणून दीर्घ-काळ कदाचित नेहमीच "दलित" राहील. पण "अस्पृश्य" हा नेहमीच "दलित" राहणार नाही. त्याची परिस्थिती बदलेल तसा तो वर सरकत स्पृश्यांच्या बरोबरीला जाईल. ह्याचा विचार ह्यासंबंधीच्या लेखनात कुठेच झालेला दिसत नाही.

भारतातल्या "अस्पृश्यांची" अमेरिकेतल्या नीग्रोंशी वारंवार तुलना केली जाते. काही बाबतीत "अस्पृश्यांची" अवस्था नीग्रोंपेक्षाही वाईट आहे. पण नीग्रो लोक गोऱ्या अमेरिकानांपेक्षा वंशतः इतके वेगळे आहेत की, त्यांची परिस्थिती कितीही सुधारली तरी गोऱ्या समाजात ते केव्हाही मिसळून जाऊ (असि-मिलेट होऊ) शकणार नाहीत. "अस्पृश्यांचा" असा वांशिक वेगळेपणा पण दाखवता येणार नाही. सामाजिक अडसर जसजसे दूर होत जातील, तसतसे ते इतर समाजांत मिसळून जाऊ शकतील. हिंदू समाज संपूर्णपणे जातिहीन होईल ही गोष्ट दुरापास्त आहे. असे असले तरी जातीय विद्वेश आणि व्यव-हारातली विषमता प्रयत्नपूर्वक कमी करणे शक्य आहे. हा सगळा विचार खरे म्हणजे साहित्याच्या कक्षेबाहेरचा आहे. पण एकदा साहित्यामागे "दलित" हे विशेषण लावले म्हणजे साहित्याबरोबर हा विचार करणे अपरिहार्य होते.

"दलित" कोणाला म्हणावे ह्या बाबत जसे मतभेद आहेत, तसेच "दलित साहित्य" म्हणजे काय ह्या बाबतही आहेत. "दलित साहित्य" ह्यातला "दलित" हा शब्द "अश्लील", "ग्राम्य" ह्यांसारखा विशेषणात्मक मानला, तर जे साहित्य, "साहित्य" म्हणून "दलित" म्हणजे धिक्कारलेले, अव्हेरलेले आहे ते, असा त्याचा अर्थ होईल. पण तसा अर्थ कोणी केलेला दिसत नाही आणि कोणी करील असेही वाटत नाही. "दलित साहित्य" म्हणजे "दलितां" संबंधीचे साहित्य किंवा "दलित" वर्गातल्या लेखकाने लिहिलेले साहित्य, असेहि अर्थ होऊ शकतील. पण ह्या बाबतीत असे दिसते की, दलितांसंबंधी पण दलितेतरांनी लिहीलेले साहित्य हे "दलित साहित्य" मानायला काही लोक

तयार नाहीत. दलित लेखकांनी पांढरपेशाच्या जीवनासंबंधी किंवा पांढरपेशांच्या वृत्तीने लिहिलेले साहित्य हेही ',दलित साहित्य" मानले जात नाही. दलित-वर्गातल्या लेखकांनी दलित समाजाच्या जीवनासंबंधी लिहिलेले साहित्य तरी "दलित साहित्य" मानले जाईल का? खात्री देता येत नाही. बहुधा नाहीच. "दलित साहित्या" चे एक भाष्यकार डॉ. वानखडे म्हणतात, "दलित साहित्य" हे दलित लेखकांनी दलितांवर लिहिलेले, संतापाने निर्माण केलेले साहित्य. दलित साहित्य म्हणजे दलित लेखकांनी दलितांविषयी निर्माण केलेले प्रक्षोभक विद्रोही साहित्य". नुसतेच दलितांनी दलितांसंबंधी लिहिलेले साहित्य हे दलित साहित्य होत नाहीं. ते "संतापाने निर्माण केलेले, प्रक्षोभक आणि विद्रोही" असले तरच ते "दलित साहित्य" होईल.

ह्या संतापाचा प्रक्षोभाचा आणि विद्रोहाचा रोख (साहजिकच) हिंदू समाजाच्या सांस्कृतिक परंपरेवर आहे. विषमतेवर आधारलेल्या ह्या परंपरेने माणसाला "अस्पृश्य" मानले. इतकेच नव्हे, तर त्यांना पशूहूनही वाईट जिणे जगायाला लावले. ह्या परंपरेत साहित्याने ज्यांना फायदे होत होते. त्यांनी साहित्यकांनी किंवा सुधारकांनी ह्या परंपरेविरुद्ध कधी बंड केले नाही किंवा जोराने आक्रोश केला नाही. केला असला तरी त्यांच्यापैकी कोणीही अस्पृश्यांना माणूस म्हणून जगण्याचा हक्क मिळवून देण्यासाठी, अस्पृश्यता नष्ट करण्यासाठी प्राणाचे मोल देण्याची तयारी दाखविली नाही म्हणून त्या साहित्याविरुद्ध आणि साहित्य परंपरेविरुद्धही त्यांचा रोख आहे.

हिंदू समाजसुधारकांनी किंवा साहित्यिकांनी कोणीच काही केले नाही, असे त्यांना म्हणायचे नाही, पण त्यांनी जे काही केले ते मध्यमवर्गीयांसाठी आणि त्यांच्यापुरते मर्यादित होते, ही त्यांची तक्रार आहे. लोकहितवादी, जोतिबा फुले, प्रार्थनासमाजाचे पुढारी, आगरकर, विठ्ठल रामजी शिंदे, श्री म. माटे, ह्यांसारख्या ब्राह्मण-ब्राह्मणेतर मध्यमवर्गीयांनी (फुल्यांना मध्यम-वर्गीय म्हणता येईल का?) जातिव्यवस्थेवर प्रहार करणे, ह्याचे नैतिक आणि सामाजिक महत्त्व, जाति व्यवस्थेत ज्यांना हीन अथवा नीच अवस्थेत रहावे लागते त्यांनी प्रहार करण्यापेक्षा अधिक महत्त्वाचे आहे ज्यांना जातिव्यवस्थेत उच्च स्थान होते, ज्यांना त्या व्यवस्थेचे सर्व फायदे होत होते, जातिभेद नष्ट झाला तर ज्यांचे महत्त्व कमी होणार होते, त्यांनी जातिव्यवस्थेवर हल्ला करणे (त्यांच्या दृष्टीने काहीही कारण नसतांना) ह्या गोष्टीचे महत्त्व

"दलितां"ना मान्य नाही. "अस्पृश्यता" न पाळल्याबद्दल जोतिबा फुल्यांना नातेवाईकांकडूनही त्रास सोसावा लागला. आणि समाजाला पसंत न पडणारी सुधारकी मते मांडल्याबद्दल आगरकरांना जिवंतपणी आपली प्रेतयात्रा पाहावी लागली. त्याबद्दल त्यांनी तक्रार केली नाही किंवा आपली मतेही सोडली नाहीत. ह्यात त्यांचे हौतात्म्य नसेल. पण तोपर्यंतचा हिंदू समाजाचा इतिहास पाहाता त्यांचे मनोधैर्य आणि त्यांचे वागणे अपूर्व होते, एवढे तरी म्हणता येईल. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारखा "अस्पृश्य" समाजातलाच एक विद्वान, निःस्पृह आणि निर्भय पुढारी त्या समाजाला लाभला, त्यामुळे "अस्पृश्यता" निवारणाला जोराची चालना मिळाली, ही गोष्ट खरी आहे. पण त्यांच्या आधी त्यांच्या पूर्वीच्यांनी समाजाला थोडेबहुत तरी हादरे दिले होते. हे विसरून चालणार नाही. आणि नाहीतरी आजही अस्पृश्यता नाहीशी झालेली नाहीच.

आपला खरा शत्रु कोण आहे हे श्री. बाबुराव बागुलांनी महाड येथे केलेल्या आपल्या भाषणात सांगितले आहे. ते म्हणतात, "मार्क्सवाद्यांना आणि समाजवाद्यांना त्यांचे शत्रू दिसतात. अनेक राजकीय पक्षांना त्यांचे विरोधक शत्रू दिसतात. पण आमचा शत्रू तर अदृश्य आहे. तो ग्रंथांत आहे. भाषेत आहे. शब्दात आहे. विचारांत आहे. तो मनात आहे. असल्या प्रचंड आणि सर्वव्यापी असूनही अदृष्य असलेल्या शत्रूबरोबरच आमचे युद्ध सुरू झालेले आहे.'

बहुसंख्य स्पृश्य हिंदूना अजूनही "अस्पृश्य" हे सामाजिकदृष्टचा आपल्या बरोबरीचे वाटत नाहीत. हिंदू समाजमनात ही जी सामाजिक विषमतेची भावना खोल रुजलेली आहे, तिच्याविरुद्ध "दलितां" चे युद्ध आहे. आणि ह्या युद्धातले एक शस्त्र म्हणून त्यांना साहित्य वापरायचे आहे. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे हे युद्ध तामस नाही, सात्विक आहे. तोडणारे नाही, जोडणारे आहे. जे विभागले गेले आहेत त्यांना एकत्र आणण्यासाठी आहे.

श्री. बागुल म्हणतात, "दलित साहित्य म्हणजे सूडवाद्यांचे साहित्य नाही. दलित हे विद्वेश पसरवणारे साहित्य नाही. दलित साहित्य हे माणसाच्या महतीचा आणि मुक्तिचा प्रथम पुरस्कार करते. आणि तसेच ती एक ऐतिहासिक गरजही आहे. म्हणून स्वतःला वेगळे नाव धारण करते. अस्पृश्यतेशी आणि दास्याशी, विषमतेशी, आणि दुःखाशी दलित साहित्याचे वैर आहे. जोपर्यंत अस्पृश्यता, दास्य या देशात असेल, ह्या जगात असेल तोपर्यंत दलित साहित्य

हे निश्चित आहे." ते आणखी म्हणतात, "आम्ही तुच्छतावादी नाही. आमच्या अल्पस्वल्प लेखनात आम्ही कुठल्याही जातीविरुद्ध प्रचार केलेला आढळत नाही. एकंदर सामाजिक, मानसिक व वैचारिक व्यवस्थेविरुद्ध आम्ही आहो. "शेवटी दलित साहित्य. काय साधणार आहे. तेही श्री. बागुलांनी सांगितले आहे. ते म्हणतात, "मराठी माणसानी केवळ सदाशिव पेठेतील न राहता अनेक माणसाने (माणसांनी?) गजबजून जाईल. अनेक शब्द आणि प्रतिमा मराठीत येतील आणि मराठी साहित्य खूपखूप माणसांचे होईल".

श्री. बागुल ह्यांचे हे भाषण म्हणजे दलित साहित्याचा जाहीरनामा (मॅनिफेस्टो) ठरावा इतके ते महत्त्वाचे आहे. दलित साहित्याची भूमिका, उद्देश आणि स्वरूप ह्यासंबंधी त्यांनी आपल्या भाषणांत शांतपणे, निर्विकारपणे आणि सविस्तर विवेचन केले आहे. हेच मुद्दे डॉ. म. ना. वानखडे ह्यांनी श्री. बागुल ह्यांच्या "सूड" ह्या कादंबरीला लिहिलेल्या प्रस्तावनेत मांडले आहेत.
ते म्हणतात,——

"कोरडे अंगावर ओढल्याशिवाय .... बंडाचा झेंडा उभारल्याशिवाय ही कोंडी (हिंदू समाजाला, मनाला पडलेली) फुटायची नाही. परंतु याचा अर्थ असा नाही की त्याला समाजापासून विभक्त व्हायचे आहे. समाजात राहूनच त्याला हे करायचे आहे. फरक एवढाच की, दयेच्या ऐवजी हा लेखक आग ओकू पाहात आहे. तीक्ष्ण हत्यार बरेचदा प्राण वाचवते.... ही फुटीर वृत्ती नाही. ही असत्यावर, ढोंगावर, अन्यायावर चिडीने आसूड मारणारी, समाजाला जोडणारी वृत्ती आहे .... विशाल अशा मराठी साहित्याला मिळणारी अशी ही एक नदी. प्रादेशिक साहित्य जसे एक साहित्याच्या प्रसादातील दालन तसेच हे दलित साहित्य."

वरील दोन्हीं प्रतिपादनांवरून ही गोष्ट उघड आहे की, दलित साहित्यिकांना दलित साहित्य हे अस्पृश्यतेच्या आणि सामाजिक विषमतेच्या निर्मूलनासाठी शस्त्र म्हणून वापरायचे आहे. म्हणजे ते मुख्यतः प्रचारासाठी वापरायचे आहे. "दलित साहित्य" ह्या संज्ञेत केवळ ललित साहित्याचा अंतर्भाव होतो की वृत्तपत्रीय लेखन, चर्चात्मक निबंध आणि संशोधनपर प्रबंध ह्यांचाही होतो. ह्याचा स्पष्ट उल्लेख कुठे नाही. पण ह्या विषयावरचे खंडन-मंडन करणारे, उलट सुलट मतांचे लेख व भाषणे वाचीत असतांना ललित साहित्यच अभिप्रेत आहे असे दिसते.

ललित साहित्य प्रचारासाठी वापरले जाते तेव्हां प्रश्न निर्माण होतात. प्रचारसाधन म्हणून निर्माण केल्या गेलेल्या साहित्य कृतीचें मूल्यमापन करतांना तिची कलात्मक गुणवत्ता आणि तिचे प्रचारसामर्थ्य ह्या दोन्हीं अगांचा विचार करावा लागतो, आणि त्यात कोणत्या तरी एका अंगावर भर दिला गेल्या-मुळे तिचा तोल गेलेला असल्याची शक्यता असते.

महाड येथे भरलेल्या याच संमेलनाच्यावेळी "दलित साहित्य : जाणीव आणि प्रेरणा" ह्या विषयावरच्या परिसंवादाचे अध्यक्ष प्राचार्य म. भि. चिटणीस होते. त्यांच्या भाषणात ह्या गोष्टीची जाणीव दिसून येते. प्राचार्य चिटणीस हे पूर्णपणें "अस्पृश्या" शी समरस झालेले आहेत. त्यांची सुखदुःखे (आज घटकेला दुःखेच) ते जसे जाणतात, तसे दुसरा एखादा "स्पृश्य' क्वचितच जाणीत असेल. पण प्राचार्य चिटणीस ललित साहित्याचे अभ्यासक आणि अध्यापकही आहेत. ललित साहित्याची प्रकृती ते जाणतात. आपल्या भाषणात एका ठिकाणी ते म्हणतात, "सौंदर्य भावना आणि नीती (एस्थेटिक्स आणि मोरॅलिटी) ह्या त्यांच्या (म्हणजे दलितांच्या) प्रेरणेत एकरूप आहेत." आणि काही काल तरी असे होणे कसे अपरिहार्य आहे तेही त्यांनी सांगितले आहे. आणखीही एका प्रसंगी त्यांनी सांगितल्याचे आठवते की एक कलाकृती म्हणून ललित साहित्याच्या निर्मितीप्रक्रियेत जी अलिप्तता अपेक्षित असते ती काही वेळा दलित साहित्यात दिसणार नाही, पण प्राप्त परिस्थितीत ते स्वाभा-विक आहे.

कला आणि प्रचार ह्यातला हा संभाव्य विरोध श्री. बागुलानाही जाणवलेला आहे. ते म्हणतात, "दलिताने लिहिलेली कविता कविताच असू शकते. ती चांगली वाईट नंतर ठरू शकते. पण ती कविताच असते." म्हणजे प्रचारात्मक साहित्यकृतीचा "साहित्य" कृती म्हणून विचार करतांना ती चांगली वाईट ठरवण्याचा प्रश्न येतो. हे त्यांना मान्य आहे. पण त्याचा विचार आता नको. दलित साहित्यात क्वचितच अशी उणीव असली म्हणून त्यावर टीका किंवा त्याची उपेक्षा करू नये. ते रागाने प्रेरित झाले म्हणून त्याचा अव्हेर करू नये. उलट, त्याचे स्वागत करावे, कारण सरतेशेवटी हे साहित्य मराठी समाज-मनाला आणि विशाल मराठी साहित्याला उपकारक ठरणारे आहे. अशी ही भूमिका आहे. सौंदर्यतत्व (एस्थेटिक्स) आणि नीतितत्त्व (मोरॅलिटी) ह्यांत

असा परस्पर विरोध नाही की एखाद्या साहित्यकृतीत ती एकमेकांना पोषक होऊन राहू शकणार नाहीत. पण मूलतः ती दोन्हीं एक नव्हेत. त्यांच्या मूल्य-मापनाच्या कसोटचा वेगळचा आहेत. कारण त्यांचीं कार्ये वेगळीं आहेत हे विसरून चालणार नाही. ललित साहित्य प्रचारासाठीं वापरले जाऊ शकते आणि वापरावे असे प्रायः सर्व समाज सुधारकाना वाटते. (काहीना तर ललित साहित्याचे तेच कार्य आहे असे वाटते.) आणि ललित साहित्याचा प्रचारासाठीं वापर नेहमीच केला गेला आहे. प्रश्न एवढाच आहे की, ललित साहित्याचे परीक्षण करण्याची वेळ आली तर कसोटीं कोणतीं लावायचीं ? प्रचाराचें एक शस्त्र म्हणून त्याचे परिक्षण करायचे तर प्रतिपाद्य विचाराची ग्राहयाग्राहचता, त्याच्या पुष्टचर्थ वापरलेल्या पुराव्याचा आणि युक्तिवादाचा बिनतोडपणा, ते शस्त्र वापरणाऱ्यांचा वकूब, त्यांची कल्पकता; प्रतिभा आणि शब्दप्रभुत्व, आणि ज्याच्यावर हे शस्त्र चालवायचे त्याची (म्हणजे ह्या बाबतीत विषमतेवर आधारलेल्या हिंदू समाजाचीं) ह्या संबंधातली प्रतिकार-शक्ती, ह्या सर्व घटकांचा विचार करावा लागेल. आणि प्रचारसाधन म्हणून त्याची योग्यता ठरवावी लागेल. हे सर्व काम ललित साहित्याच्या समीक्षकाचे आहे कीं सामाजिक प्रश्नांचा विचार करणाऱ्यांचे ? ललित साहित्याच्या समीक्षकाची सामाजिक प्रश्नासंबंधीं काहीं मते असली तरी त्यानुसार त्या कृतीचे त्यांनी मूल्यमापन करावे काय ? मग ते मूल्यमापन साहित्यिक होईल की सामाजिक ?

दलित साहित्याचा विचार करतांना त्याच्या साहित्यमूल्यावर भर देऊ नये याचा अर्थ असा होतो की, दलित साहित्याचे साहित्यमूल्यानी परिक्षण करू नये, असे म्हटले तरी ते कोणी ऐकणार नाही आणि परिक्षण होतच राहील हे वेगळे. पण खरोखरच ह्या साहित्याचे "साहित्यिक" परिक्षण होईनासे झाले तर "मध्यमवर्गीयां" नी दलित साहित्याची उपेक्षा केली असा आरोप येईल. आणि परिक्षण करून कधी जाणवलेल्या उणिवा दाखवल्या तर "मध्यमवर्गीय" कसौटचा लावून दलित साहित्यावर अन्याय केल्याचा आरोप येईल. धरले तर चावते, सोडले तर पळते, असा हा प्रकार आहे.

ह्याबाबत डॉ. सदा कऱ्हाडे यानी घेतलेली भूमिका समजण्यासारखी आहे. "साहित्यिक" समीक्षक ह्या बाबतीत (पुरोगामी समाज परिवर्तनशील

साहित्याच्या बाबतीत) काही करतील ही आशा त्यांना नाही. "साहित्यिक" समीक्षकाना काय म्हणायचे ते खुशाल म्हणू द्या आजच्या काळाची गरज ओळखणाऱ्यांनी (म्हणजे पुरोगामी साहित्यिकांनी) आपली जबाबदारी (म्हणजे समाजपरिवर्तनाची) पार पाडावी, असे त्यांचे म्हणणे आहे. हे अगदी योग्य आहे. लेखकांना त्याबद्दल जे योग्य वाटेल ते ते लिहितील. समीक्षकांना त्याबद्दल जे योग्य वाटेल ते लिहितील. समीक्षकांना त्याबद्दल जे योग्य वाटेल ते म्हणतील. साहित्यनिर्मिती आणि साहित्यसमीक्षा ह्यांचे क्षेत्र आपल्या देशात अजून मुक्त आहे. एखादा पक्ष आपल्या देशात अजून मुक्त आहे. एखादा पक्ष किंवा एखादा लेखक संघ फतवे काढून लेखकांना लेखनाचे किंवा समीक्षेचे "मार्गदर्शन" करू शकत नाही. मुक्तपणे झालेल्या साहित्य निर्मितीतून आणि साहित्य समीक्षेतून अधिकाधिक जोमदार साहित्यनिर्मिती आणि अधिकाधिक सुजाण समीक्षा होत जाण्याची शक्यता आहे. पण डॉ. कऱ्हाडयांच्या सल्ला मानला जाईल असे दिसत नाहीं. अनुभव असा आहे की "पुरोगामी" साहित्यकालासुद्धा मध्यमवर्गीय "साहित्यिक" पसंतीची अपेक्षा असते. आणि ती मिळाली नाही तर त्याची त्याला खंत वाटते. निखालस पुरोगामी कवी शाहीर अमरशेख ह्यांच्यावर डॉ. सदा कऱ्हाडे ह्यांनी "सत्यकथेतच" लिहिलेल्या लेखात ह्या गोष्टीचा निर्देश आहे. लक्षावधी श्रोत्यांकडून प्रशंसा लाभली असून सुद्धा शाहीर अमरशेखाना ही खंत होती. ही खंत का वाटते? साधे कारण आहे. कोणाही लेखकाला, प्रचारकी लेखन करणाऱ्या लेखकालासुद्धा आपले साहित्य प्रचारकी समजले जावे हे आवडत नाही. प्रचारापेक्षा अधिक काहीतरी आपल्या साहित्यात आहे अशी मान्यता, "निखळ साहित्यिक" मान्यता त्याला हवी असते. ज्या समाजाला वाचा नव्हती, ज्यांची मनेच मारली गेली होती, त्यांना आता वाचा लाभली आहे. त्यांची संवेदन शक्ती तीव्र आणि कार्यप्रवण होत आहे आणि आपल्या अनुभवांना शब्दरूप देण्यासाठी त्या समाजातले लोक वाढत्या संख्येने पुढे येत आहेत. सामाजिक आणि साहित्यिक ह्या दोन्ही दृष्टीनी ही अतिशय इष्ट अशी घटना आहे. आणि ते जितके येतील आणि जितके लिहितील तितके हवेच आहे. त्यांचे ललित लेखन जसे मराठीला हवे आहे तसे, किंवा त्याहूनही अधिकच, त्यांचे व्यासंगावर आधारलेले विचारगर्भ लेखन हवे आहे. तसे झाले तर स्पृश्य अस्पृश्य समाज उघडया डोळयांनी एकमेकाकडे पाहू लागतील. एकमेकाचे अंतरंग जाणून घेऊ शकतील. एकमेकाच्या अधिक जवळ येतील. शेवटी एकजीवही होतील आणि समाज पुरुषाचे बळ त्यामुळे वाढेल.

पण त्यासाठी दृष्टी अधिक उदार आणि विशाल ठेवायला हवी. मार्क्स-वादी, आंबेडकरवादी, ह्या दोन्हीं वादांचे विरोधी किंवा त्यापासून दूर राहू इच्छिणारे, असे विविध मतांचे लोक "दलित" वर्गात असण्याची शक्यता आहे. त्या सर्वांना साहित्य आणि जीवन ह्या संबंधीं त्यांची जी मते असतील त्यांनुसार मुक्त मनाने लिहिता आले पाहिजे. लिहू दिले पाहिजे. आणि कोणा-च्याही, "दलित" समीक्षकांच्यासुद्धा, टीकेची पर्वा न करता त्यांनी लिहित राहिले पाहिजे. मग त्यांचे साहित्य "दलित" ठरो, "पुरोगामी" ठरो की नुसतेच "साहित्य" ठरो. सामाजिक विषमतेची तीव्र जाणीव झाल्यामुळे ती नष्ट करण्याची इच्छाही उत्कट आहे. त्यामुळे बरेचसे साहित्य प्रचारकी होण्याची शक्यता आहे. कोणी त्याला प्रचारकी म्हटले तर त्याचीही खंत वाटू नये. कारण, प्रचारकी साहित्याचीही आवश्यकता आज आहे, नेहमीच असते.

दलित साहित्यामुळे मराठी साहित्य समृद्ध होईल का? हा प्रश्न विचार-ण्याचीही आवश्यकता नाही. परिचित चाकोरी बाहेरचे जीवन आणि ते जगणारे लोक ह्यांचे चित्रण करणारे कोणतेही साहित्य निर्माण झाले तरी त्यामुळे मराठी साहित्य समृद्धच होईल. वेगवेगळ्या जातीत विभागल्या गेलेल्या वेगवेगळ्या भौगोलिक प्रदेशांत राहणाऱ्या, वेगवेगळ्या ऐतिहासिक सांस्कृतिक पार्श्वभूमी लाभलेल्या लहान मोठ्या समाजांची जीवन परिस्थिती, जीवन पद्धती वेगवेगळी असते. त्यांच्यावर होणारे त्यांच्या शेजारी समाजाचे आणि निसर्गाचे आघात, त्यांशीं निगडित असलेले त्यांचे अनुभव आणि त्यासंबंधीच्या त्यांच्या भावनात्मक प्रतिक्रिया हीही वेगवेगळी असतात. ते अनुभव, त्या प्रति-क्रिया व्यक्त करणारे त्यांचे भाषाप्रयोगही वेगवेगळे असतात. ही सगळी विविधता मराठी साहित्यात आली तर ते समृद्ध होईल ह्यात शंकाच नाही.

पण त्याबरोबरच दलित साहित्याला काही मर्यादा पडण्याचा संभव आहे आणि संताप, प्रक्षोभ-विरोध ही त्याची व्यवच्छेदक लक्षणे समजली गेली तर त्या मर्यादा आणखीही संकुचित होण्याची शक्यता आहे, इकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. दलित समाजाचे जीवन कितीही विविध असले तरी त्यांच्या जीवनाच्या परिस्थितीने आणि पातळीनेच त्याला काही मर्यादा घातल्या आहेत. ज्या परिस्थितीत त्यांना राहावे लागले आहे आणि लागत आहे, त्यामुळे त्यांच्या अनुभवांना आणि अनुभवाबातच्या भावनात्मक प्रतिक्रियाना एक ठराविकपणा ढोबळपणा, उग्रपणा, भडकपणा आलेला आहे. प्रामुख्याने क्षुधा आणि रती,

बहिस्कृततेची तिरस्कृततेची जाणीव ह्यांभोवती त्यांच्या भावनाव्यापार गुंतलेला असतो. आणि त्यांच्या अनुषंगानेच लोभ, मोह, क्रोध, मत्सर, द्वेष ह्यांचा उद्‌भव होतो. भावनांचा उद्‌भव झाल्यावर त्यांची प्रतिक्रिया एकदम शारीरिक क्रियेनेच भडकपणे, स्फोटकपणे व्यक्त होते. भावनानुभवांना सूक्ष्म छटा याव्या, त्या मनात स्थिरावून, रुजून त्यावर कल्पनेचे संस्कार व्हावे असे त्यांचे जीवनच नसते. त्यांच्या शब्द स्पर्शादी इंद्रिय संवेदनाही तीव्र किंवा भडकच असतात. ज्या घाणीत, ज्या स्थितीत त्यांना राहावे लागते तिचे उग्र गंध, कठोर स्पर्श, कर्कश आवाज, भडक दृश्ये ह्या खेरीज इतर संस्कार त्यांच्या इंद्रियावर होऊच शकत नाहीत. अशा वस्तीत जर कोणी अधिक "सुसंस्कृता" सारखा राहू, वागू, बोलू लागला तर तो लवकरच चेष्टेचा, रोषाचा आणि कदाचित् द्वेषाचाही विषय होतो. तो "परका" होतो, नकोसा होतो. दलितांचे जीवन भावनात्मक आणि शारीरिक अशा दोन्ही पातळ्यांवर असे मर्यादीत असल्यामुळे तसेच त्यांचे "स्पृश्य" समाजाशी जे संबंध येतात तेही मर्यादीत आणि ठराविक स्वरूपाचे असल्यामुळे, त्यांची कितीही प्रकारांनी वर्णने केली तरी त्यांत तोचतोपणा आल्यावाचून राहाणार नाही. त्यातून पुन्हा "दलित साहित्य" ही मध्यमवर्गीयांविरुद्ध "शस्त्र" म्हणून वापरायचे व्याख्येनेच ठरवले आणि त्याला साहजिकच संताप प्रक्षोभ विद्रोह ह्यांचे "पाणी" दिले तर त्यांत अधिकच ठराविकपणा येईल. ह्याचा दलित साहित्यिकांनी विचार करणे आवश्यक आहे. कारण, मग सर्व दलित साहित्य "तुम्ही विरुद्ध आम्ही" ह्या चौकटीत बसवले जाईल. आणि चौकटीबाहेर दलित समाजाचे आपापसांतले किंवा दोन वेगवेगळ्या दलित समाजांच्या परस्परसंबंधाचे सांगण्यासारखे असे जीवनच नाही, असा अर्थ होईल. तसे खरे असेल तर तीही त्या जीवनाची (आणि अर्थात त्यावर आधारलेल्या साहित्याची) मर्यादाच झाली.

दलित साहित्याची अमेरिकन नीग्रो साहित्याशी वारंवार तुलना केली जाते. पण आता नीग्रो साहित्याचेही साचे बनले आहेत आणि त्यात कंटाळवाणा तोचतोपणायेत चालला आहे, असा तिकडल्या काही समीक्षकांचा तरी अभिप्राय आहे.

दलित साहित्यात असा तोचतोपणा, साचेबंदपणा येत गेला, तर हे "संतप्त" साहित्य ज्या मध्यमवर्गीय स्पृश्य समाजावर रोखले जायचे आहे त्या समाजातले वाचक म्हणतील की, "दलित लेखक ना? माहीत आहे काय

लिहिणार ते. काही वाचायची गरज नाही." ह्या "उपेक्षेमुळे" दलित साहित्यिकांना अधिक संतप्त होऊन अधिकच "संतप्त" साहित्य लिहावे लागेल आणि ते "मध्यमवर्गीयां" कडून वाचले जाण्याची शक्यता आणखी कमी होईल. मग कदाचित "दलित" वाचकच ते वाचतील. तसे झाले तर दलित साहित्याच्या व्याख्येत "दलितांनी, दलितांसंबंधी संतापून लिहिलेले साहित्य" ह्या शब्दाबरोबरच "दलितांसाठी" हे शब्द घ्यावे लागतील. पण मग ह्या "संतप्त" साहित्याच्या साहाय्याने समाजपरिवर्तन (मध्यमवर्गीयांचे, हृदयपरिवर्तन) करायचे. त्याचे काय होईल?

शिवाय दलितवर्गीयांत उच्च शिक्षणाचे संस्कार झालेल्यांची संख्या वाढते आहे. त्यापैकी काहींच्या ठिकाणी तरी "साहित्यिक" दृष्टिकोण निर्माण झालेला असण्याची शक्यता आहे. अशा वाचकांनाही दलित साहित्यातला तोचतोपणा नकोसा होऊन तेही कदाचित म्हणतील, "ह्यात आम्हाला नवीन काय आहे? प्रचार म्हणून त्याची आम्हाला आवश्यकता नाही. आणि "साहित्य" म्हणून हे सामान्य आहे." आणखीही एक शक्यता अशी आहे की, आपले म्हणजे आपल्या समाजाचे, वास्तव जीवन इतके "ओंगळ", "अमानुष" आहे ह्या गोष्टीचे साहित्यातून इतके प्रदर्शन होऊ नये असे काही दलितांनाच वाटू लागेल. शेवटी असे म्हणायची वेळ येईल की, साहित्य ते साहित्य आणि प्रचार तो प्रचार. त्यांनी वेगळे राहावे हेच बरे. साहित्यातून अप्रत्यक्षपणे जो काय "प्रचार" होईल तो होईल. प्रखर प्रचारासाठी लेखकाने वाटल्यास स्वतंत्र लेख, निबंध, प्रबंध, ग्रंथ लिहावे."

ह्या धोक्याचा संभव श्री. बाबुराव बागुल ह्यांनी जाणला असावा असे त्यांच्या उत्तरोत्तरच्या लेखनावरून दिसते. "जेव्हां मी जात चोरली" ह्या संग्रहातला उग्रपणा, भडकपणा "मरण स्वस्त होत आहे" मध्ये नाही आणि त्यातला "सूड" मध्ये नाही. डॉ. वानखडे आणि श्री. दया पवार ह्यांना "सूड" ही कादंबरी दलित समाजाच्या जीवनाशी, त्यांच्या जीवनातल्या (वास्तव किंवा संभाव्य) क्रांतीची प्रतीक वाटते. ("मुक्तिलढ्याची प्रतीकात्मक कथा", दया पवार, "सत्यकथा", जानेवारी १९७१) पण मला ती दलित समाजाच्या जीवनाच्या पलीकडे जाऊन सबंध मानव जीवनातल्या एका कठीण, आणि मूलभूत प्रश्नाला भिडणारी, अधिक मोठी कादंबरी वाटते. माझ्यासारखेच आणखीही काही वाचकांचे असे मत झाले असले आणि "सूड" ही कादंबरी

दलित साहित्याच्या कक्षेबाहेर काढली गेली तर कदाचित श्री. बागुलानांही दलित साहित्यिकांच्या गोटातून वगळण्यात येईल. शंकरराव खरातांना वगळलेच आहे, पण केशव मेश्राम वगैरे काहींनाही वगळण्यात येत आहे असे म्हणतात ("ग्रेस" देखील वगळले जात असल्यापैकीच का?)

दलित साहित्यात तोचतोचपणा येण्याचा संभव आहे हा नुसता अंदाज नाहीं. तसा अनुभवही आहे. दलित साहित्यिकांचे हितचिंतक आणि प्रकाशक श्री. वामनराव भट ह्यांना, त्यांनी अण्णाभाऊ साठे ह्यांची एक कादंबरी प्रकाशित केल्यानंतर दुसरी का केली नाही, असा प्रश्न विचारला तेव्हां त्यांनी दिलेले उत्तर पाहावे. ("अस्मितादर्श", दिवाळी १९६९). त्याचप्रमाणे शाहीर अमरशेख यांच्या समग्र रचनेचे रसग्रहण करण्यासाठी एक स्वतंत्र पुस्तक लिहिणारे महाडचे आचार्य माधव पोतदार ह्यांनीही अमरशेखांच्या कवितेत शब्दप्रयोगांचा, विचारांचा, कल्पनांचा तोचतोपणा, दोष वाटावा इतका जाणवला आहे. "अमरशेखांची कविता" ह्या आपल्या पुस्तकात ते म्हणतात, "त्यांच्या लेखणीत अंगभूत अशी कलात्मकता निश्चित नाही . . . अमर-शेखांच्या फारच थोड्या कवितांत अंगभूत सौंदर्य आढळते." "दुसरा एक महत्वाचा दोष अमरशेखांच्या कवितेत आढळतो तो म्हणजे विचारांच्या पुनरुक्तीचा . . . अभिव्यक्ती सर्वच एकाच प्रकारची असते . . . अमरशेख असेच काहीतरी सांगणार हे मुळी गृहीतच धरावे लागते. ब-याचशा कवितांत तोचतोपणा आढळतो हे अमान्य करता येणार नाही." ह्यापैकी काही दोष कवी म्हणून त्यांच्या ज्या अंगभूत उणिवा असतील त्यांतून निर्माण झालेले असतील, काही शिक्षणाच्या अभावामुळे झाले असतील, पण काही, निश्चितच, त्यांनी कवी म्हणून जी भूमिका स्वीकारली तिच्यातूनच निर्माण झाले आहेत.

दलितांची दुःखे वेशीवर टांगण्यासाठी आपल्याकडे आतापर्यंत मोजक्या लेखकांनी मोजकेच साहित्य निर्माण केलेले आहे, तोच त्याचा साचेबंदपणा जाणवू लागला. मग अनेक लेखक अधिकाधिक साहित्य निर्माण करतील तेव्हा काय होईल ह्याचा अंदाज सहज करता येईल.

दलित साहित्याच्या संदर्भात मध्यमवर्गीय ('सदाशिवपेठी,') साहित्याच्या हेटाळणीने किंवा शत्रु समाजाचे साहित्य म्हणून उल्लेख होत असतो. ते शत्रु-समाजाचे आहे की नाही, हा प्रश्न बाजूला ठेवू. ते समाजाच्या एका विशिष्ट

वर्गाने आपल्या वर्गाच्या जीवनासंबंधी निर्माण केलेले साहित्य आहे, हे मान्य करायला हरकत नाही. ते तसे आहेच. पण साहित्य म्हणून विचार केला तर "मध्यमवर्गीय" साहित्याच्या कक्षा दलित साहित्याच्या संभाव्य कक्षांच्या मानाने खूपच विस्तृत आहेत, आणि त्यातली जीवनाची, म्हणूनच अनुभवांची आणि त्यांच्या अभिव्यक्तींचीही विविधता जवळजवळ अमर्याद आहे. ह्याचाही बाबतीत दिसून येते. एखाद्या गावातल्या कारकूनापासून किंवा प्राथमिक शिक्षकापासून तो रिझर्व बँकेच्या गव्हर्नरपर्यंत किंवा देशाच्या पंतप्रधानापर्यंत सर्व थरांतले लोक, मध्यमवर्गात मोडतात. ज्या कोणावर शिक्षणाचे थोडे बहुत संस्कार झाले आहेत आणि जे आपली बुद्धी, कर्तृत्व आणि शिक्षण ह्यांवर आपले नशीब काढतात, पोटाला मिळवतात ते सर्व मध्यमवर्गात मोडतात. केवळ शारीरिक श्रमांवर जगणारे आणि वडिलार्जित संपत्तीवर जगणारे विशेषत संस्थानिक, सरदार, जहांगिरदार हे दोन वर्गच मध्यमवर्गाच्या बाहेर राहतात. मध्यमवर्ग हा एकंदर समाजाचा सगळ्यात मोठा भाग आहे. तो समाजाचा कणा आहे. समाजाचे पुढारी, विचारवंत, सुधारक, सनातनी ह्याच वर्गात आहेत. गेली पन्नास वर्षे क्रांतिकारक कामगारवर्गाचे पुढारीपणही मध्यम वर्गाचेच लोक करीत आहेत. शिकून नोकरीत किंवा इतर व्यवसायांत शिरून दलितवर्गाचे जे लोक वरच्या, वरच्या पायऱ्यांवर जातील त्यांचाही मध्यमवर्गातच समावेश होईल. किंबहुना ह्या प्रक्रियेला सुरुवात झालीही आहे. मध्यमवर्ग हा असा समाजातला अत्यंत बहुविध आणि लवचिक असा वर्ग आहे. त्यात अनेक कारणांनी खालून वर वरून खाली अभिसरण चाललेले आहे. त्यामुळे मध्यम-वर्गीयांनी निर्माण केलेल्या साहित्यात विशिष्ट कालखंडात काही सामान्य लक्षणे दिसली तरी एकूण ते एकसाची नाही. हे हरिभाऊ आपटे केशवसुतांपासून आजतागाय-तच्या साहित्यावर नजर टाकली तर दिसून येईल. तेव्हां "मध्यमवर्गीयां" संबंधी स्लोगन्सच्या भाषेत बोलणे साहित्याच्या क्षेत्रात तरी फारसे उपयोगाचे नाही.

डॉ. सदा कऱ्हाडे ह्यांनी अशी सूचना केली आहे की, मार्क्सवाद आणि आंबेडकरवाद ह्यांचा समन्वय करून सर्व दलितांच्या उपयोगी पडेल असे एक तत्त्वज्ञान सिद्ध करावे आणि सर्वांनी मिळून "पुरोगामी" साहित्य निर्माण करावे. महाडच्या बौद्ध साहित्य संमेलनात देखील ही सूचना केली गेली. मार्क्सवादी आणि आंबेडकरवादी हे दोघेही ह्या स्नेहभावाच्या सुचनेचा विचार करतीलच, पण त्या संबंधीच्या काही शंका इथे व्यक्त करायला हरकत नाही. साम्यवादी चळवळीत अल्पसंख्य सामावले गेले नाहीत हे प्राचार्य चिटणिसांनी महाड येथे

केलेल्या आपल्या भाषणात उदाहरणे देऊन दाखवून दिले आहे. त्यासंबंधी थोडीबहुत मीमांसाही तिथेच त्यांनी केली आहे. दुसरी गोष्ट अशी की, मार्क्सवादीं हे सबंध मानवजातीच्या इतिहासाचा एक वेगळाच अर्थ लावणारे आणि मानव समाजाचे भवितव्य विशिष्ट मार्गानें घडवू पहाणारे सर्वंकष तत्वज्ञान आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरानी एखादा "वाद" विस्तृतपणे, पद्धतशीरपणे मांडलेला नाहीं, माझ्या समजुतीप्रमाणे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सर्व विचारसरणीच्या मुळाशी फ्रेंच राज्यक्रांतीला प्रेरक झालेली समता, बंधुता, स्वातंत्र्य ही तत्त्वे आहेत. त्यांच्याच अनुषंगाने न्याय आणि माणुसकी ह्यांवर त्यात भर आहे. त्यांना भारतात जातिविहीन समाज हवा होता, पण मार्क्सवादात अभिप्रेत असलेल्या वर्गविग्रहावर त्यांची चळवळ आधारलेली नव्हती. ज्या परिस्थितीत त्यांनी काम केले, आणि जे प्रश्न त्यांना सोडवायचे होते त्यांच्या संदर्भात ते काही प्रसंगीं उग्र वाटले तरी त्यांचा राजकीय, सामाजिक दृष्टीकोन मूलतः उदारमतवादी (ब्रिटनमधील लिबरॅलिझम सारखा), रानडे-गोखले ह्यांच्यासारखा लिबरल होता. स्वातंत्र्य, व्यक्ति-स्वातंत्र्य, मुक्त विचार-विनिमय ही त्यात अध्याहृत होती. तेव्हां मार्क्सवाद आणि आंबेडकरवाद ह्यांचा समन्वय कसा काय घडवून आणला जाईल, हे तो घडवून आणला जाईल तेव्हांच कळेल.

"दलित साहित्य" ह्या विषयाचा सर्वांगीण विचार केल्यानंतर जे निष्कर्ष निघतात ते असे की, काही दलितवर्गीय लेखकांनी आणि समीक्षकांनी "दलित साहित्या" ची विशिष्ट व्याख्या करून ते मर्यादित केले आहे. त्यांनी आपल्या व्याख्येत बसवलेले "दलित साहित्य" हे विचार जागृतीसाठी, विशिष्ट दृष्टि-कोनाच्या प्रचारासाठी निर्माण होत आहे. आणि ह्या दृष्टीनेच त्याच्याकडे पाहिले पाहिजे असे त्यांचे म्हणणे आहे. विशिष्ट सामाजिक मूल्यांसाठी हे साहित्य निर्माण होत असले तरी त्याचे साहित्यिक मूल्य मोठे असू शकेल, पण असेलच असे नाहीं. त्या साहित्याकडे प्रचारलेखन आणि सर्जनात्मक लेखन अशा दोन्ही दृष्टीनी पाहता येईल. आणि ते वेगवेगळ्या कसोटया लावून पारखावे लागेल. प्रचार साहित्य म्हणून त्याचे जे मूल्य असेल ते साहजिकच कालसापेक्ष असेल. जेव्हां ते कालातीत होईल तेव्हां त्याला साहित्यिक मूल्य लाभलेले असेल आणि ते प्रचारकी साहित्य राहिलेले नसेल.

(सत्यकथा, जुलै १९७२)

# साहित्याचे नवे बियाणे

* सुधीर बेडेकर

गेल्या १३-१४ फेब्रुवारीला महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभेचे दुसरे संमेलन महाडला झाले. साहित्य समेलनाना सध्या काही तोटा नाही. तरीपण हे संमेलन ही एक अत्यंत महत्त्वाची घटना होती यात संशय नाही. आज काल मराठी साहित्यात सगळ्यात वरची स्थाने पटकावलेले लोक शुद्ध सौंदर्य, विशुद्ध कलावंताची भूमिका आकृतिबंध वा फॉर्म वगैरे वगैरेच्या नावाने बोंबलत असतात आमच्या आईबापांच्या जुन्या काळात तो एक 'कलेकरता कला' का 'जीवनाकरता कला' असा वाद निर्माण झाला होता त्यातला पहिल्या मताचे हे वारसदार आहेत. कलेचे क्षेत्र स्वायत्त असते, तिचे नियम समाजजीवनाच्या वरच्या पातळीवरचे असतात, आणि म्हणून कलेचा आणि वर्ग, जाती ह्यांचे संघर्ष यांचा काडी इतका संबंध नाही असे हे मत आहे. सत्यकथेच्या भोवतीचे संस्थान, पु. शि. रेगे, खानोलकर इत्यादी सर्व मंडळी ह्या संगमरवरी महालाची व त्यातल्या संस्कृतीची, या असंस्कृत जमावाच्या भयंकर युगात जोपासणूक करण्याच्या आविर्भावात लिहितायत् वागतायत्.

पण हे लोक अन त्यांचे लेखन आवडणारे लोक समाजात मूठभरच. बहुसंख्य सुशिक्षितांना पु. ल. देशपांडे वेड लावतात. स्वामी, दुर्दम्य शिवाजीस्तोत्रे, महाभारत व रामायणावरचे लिखाण, तसलीच 'महान सामाजिक कौटुंबिक' नाटके ह्या सगळ्यांना फार मोठा वाचकवर्ग लाभलेला आहे. या सगळ्या साहित्याचा आधार जीवनाकरता कला हे सूत्र आहे. पण कोणते जीवन? तर औद्योगिक समाजाच्या धामधुमीत हरपलेले जुने, श्रद्धांचे, उदात्त, पवित्र भावनांचे जीवन, इतिहासाकडे व त्यांतही हिंदु संस्कृतीकडे वळणारे हे मन गोंजारण्याचा, अफू देऊन गारद करण्यांचा धंदा किफायतशीरपणे चाललेला आहे.

साहित्य व समाजजीवन यांचे घनिष्ठ नाते मानणाऱ्यापैकीं काहींना वरचे दोन्हीं प्रकारचे साहित्य टाकाऊ वा निदान अपुरे वाटते. दलित साहित्य हा अशा लोकांचा संताप, त्यांचा विद्रोह व त्यांच्या मानवतावादी दृष्टीचा उद्रेक आहे. त्यांना इतिहासात पुन्हा जायचे नाही. कारण या देशाचा इतिहास भयानक आहे. माणूसपणाच्या प्रेतावर रचलेला आहे. त्यांना विशुद्धही व्हायची इच्छा नाहीं, कारण भोवतालच्या गलिच्छपणापासून दूर पळण्याचा भेकडपणा त्यांच्या अंगीं नाहीं. त्यांना नवा समाज घडवायचाय व नवे साहित्य घडवायचेय भांडवलशाही व सामंतशाही दोन्हींना नष्ट करून मानवशाहीं आणायचीय.

दलित साहित्याचा सामाजिक आधार कोणता आहे हे स्पष्ट आहे. आगरकर टिळकांच्या क्रांतिकारक प्रयत्नातून पुढे आलेल्या मध्यमवर्गांत नेहमींच एक अंतर्विरोध राहिलेला आहे. भांडवलशाही संस्कृतीचा पुरस्कार करणारा एक व पारंपारिक सामंतशाहीं मूल्ये मानणारा दुसरा भार त्यात नेहमीच होता. व्यक्ति स्वातंत्र्य व लोकशाही, खाजगी मालमत्ता व खुला बाजार, शुद्ध सौंदर्य अन फॉर्म वा अस्सलपणावरचा एकांगी भर हीं मूठभर मध्यम वर्गांची मूल्ये आज आहेत. आणि बाकीचा मोठा भाग पारंपारिक संस्कृतीपुढे लोटांगणे घालत शिवसेना, जनसंघासारख्या मागे पहाणाऱ्यांच्या बरोबर आहे मोठ्या शेतकऱ्यांच्या व कारखानदारांच्या हातातली सत्ता मध्यम वर्गातल्या कधी या तर कधी त्या भागाला चुचकारते आहे ब्राम्हण अन् मराठा, शहरी विचारवंत अन् गावातला पाटील टाटा-किर्लोस्कर अन् सहकार शेठजी, भाकड गायी अन् हत्तींची मुंडकी असलेल्या ढेरपोटया सोंगाची पूजा करणारी, जातीवर आधारलेली एक जुनाट, जीर्ण संस्कृती अन् यंत्र, विज्ञान व्यापार अन् पैश्यांचीं संस्कृती दोन्हींची अपूर्व युती आजच्या मराठी संस्कृतीत वा साहित्यात दिसते आहे. खालच्या वर्गाला भुलवते, दडपते आहे.

दलित साहित्य हा या वर्गाचा हुंकार आहे. त्यांच्या प्रेरणा दुहेरी आहेत. बाबासाहेबांची शिकवण ही त्यापैकी एक प्रेरणा आहे. कारण तिच्यात ईश्वर नाही, आत्मा, मोक्ष नाहीं, जाती नाहींत. समाज जीवनात समता व बंधुभाव यावा या करता ती एक नीती आहे. दुःख, दारिद्र्य याविरुद्ध लढण्याचा विचार आहे. दुसरी प्रेरणा मार्क्सची आहे नीतीला सामाजिक अधिष्ठान कसे प्राप्त होईल याचा त्यात विचार आहे. समाजातील स्थितीचे

संपूर्ण आकलन करून लढा उभारण्यासाठी धार्मिक-सांस्कृतिक व सामाजिक-आर्थिक या घटकांमुळे होणारा अन्याय व पिळवणूक एकात्मक आहेत हे जाणले पाहिजे व त्रिच्या विरुद्धचा लढाही एकात्म असला पाहिजे, विद्रोह संपूर्ण असला पाहिजे, ही जाण येते आहे. खालच्या जाती व इतर गरीब कामगार शेतकरी खेड्यात व शहरात एकत्र येत आहेत.

अर्थातच हे सगळे इतके सोपे नाहीच. बुद्धाचा बुद्धधर्म व बाबासाहेबांनी सुधारून घेतलेला बुद्ध धर्म एक नाहीत. ह्या नव्या धर्माचे स्वरूप, त्याच्यातील सामर्थ्य व त्रुटी यांचा विचार झाला पाहिजे. बुद्ध धर्माचे क्रांतिकारकत्व कशात होते ? हिंदू संस्कृतीला ठार करण्यात तो यशस्वी का झाला नाही ? तो आताच्या परिस्थितीत होईल का? एकट्याने होईल का त्याचा विस्तार व खोली इतर विचार घेऊन वाढवायला हवी? त्याचबरोबर आजवर समाजवादी व कम्युनिस्टांनी केलेल्या प्रचंड चुकांचा विचार करावा लागेल. मार्क्सने आर्थिक नियतीवाद (डिटमिनिझम) खरोखरी सांगितला का ? धर्म व संस्कृती या घटकांचा विचार त्याच्यात बसू शकतो का? त्याकरता विचार झाला पाहिजे. या संमेलनात 'खालच्या वर्गात' ले अनेक साहित्यिक व विचारवंत आले होते व एकत्र बसले होते. आणि फक्त त्यांच्या प्रयत्नातूनच नवे विचार नवे साहित्य व समाज परिवर्तनाच्या नव्या दिशा निर्माण होण्याची शक्यता आहे. प्राचार्य म. भि चिटणीस, श्री. बाबुराव बागुल, श्री. रावसाहेब कसबे, श्री. दया पवार, डॉ. कऱ्हाडे प्रा. सोमण इत्यादींनी एका परिसंवादात भाग घेतला होता व त्यात या प्रश्नांना चालना मिळाली.

बाकी अनेक थोर थोर विचारवंत, राजकीय पक्ष आम्ही गेले काही दिवस जवळून पहातोय. त्यांच्यात काहीही दम नाही असा निष्कर्ष आम्ही बिनदिक्कतपणे जाहीर करायला तयार आहोत हे लोक थांबलेयत. 'वास्तववादी शहाणपणा' आल्याने मवाळलेयत. आणि याला फार मुळापर्यंत जाणारी कारणे आहेत. त्या कारणांची कल्पनाही या लोकांना नाहीं, त्यातून त्यांनी बाहेर पडून भविष्यदायी होण्याचे त्यामुळे अशक्य आहे. दोन्ही समाजवादी दोन्ही कम्युनिस्ट, दोन्ही रिपब्लिकन पक्ष व त्यांचा विचार आजच्या सर्वंकष कोंडीतून वाट काढायला असमर्थ आहेत. (दोन्ही कॉन्ग्रेसचा आम्ही उल्लेखही केला नाहीं हे सूज्ञांच्या लक्षात आल्यावाचून राहाणार नाही.)

आमचे चारी डावे पक्ष "मध्यमवर्गीय" आहेत जेव्हां स्वतःला डावे म्हणणाऱ्या माणसांना पुलं आणि स्वामी आवडतेसे आम्ही पाहातो तेव्हां चकित होतो. केवळ आर्थिक न्याय व्हावासा वाटला की हे डावे बाकी परंपरा पाळायला मोकळे हे समाजवादाच्या विरुद्ध आहे. समाजवादी नव्या नैतिक प्रेरणा, जीवन पद्धती, नव्या संस्कृतीकरिता तहानलेला असतो. या पक्षामध्ये मध्यमवर्गाच्या दोन्हीं भागांचे घटक दिसतात. शास्त्रीय संगीत, पिकासो सत्यकथा अन् दुर्दम्य वाचतांना हे आपले नाही, आपल्या जगण्यात जे उफाळतेय ते यात नाहीं असे वाटून तडफडणे व शोधणे म्हणजे सृजनशील होणे, क्रांतिकारक होणें. समाज परिवर्तनाकरता सृजनशीलता लागते ती नसली की मग 'डावे' पक्ष जनसंघीय हिंदुत्ववादाशी सोयरीक करतात अन असंख्य बौद्ध तरुणांचा राग ओढवून घेतात. साधन शुचितेच्या स्तोमात व्यक्ति स्वातंत्र्य जपता जपता समाजवाद खड्ड्यात घालतात, पोथीनिष्ठ बनतात व आपण वैशिष्टयपूर्ण भारतीय समाजात राहातोय हे विसरतात. बाबासाहेबांचा वारसा सांगणारे रिपब्लिकन पक्ष सुद्धा संतापजनक अवस्थेला येऊन पोचलेत. बुद्ध व बाबासाहेबांच्या नावाचा स्वतःच्या पैसा, प्रतिष्ठा व सत्ता यासारखा 'मध्यमवर्गीय' आकांक्षाकरता फायदा करून घेतला जातोय. इतिहासात जसे सर्व धर्मांचे भ्रष्टीकरण झाले व नुसता सांगाडा राहिला, त्या प्रक्रियेची सुरुवात रिपब्लिकन पक्षानुयायात बौद्ध-धर्माबाबत होण्याची शक्यता आहे.

जे जे जागे आहेत, तरुण आहेत, अन् जन्माने, पैशाने वा सांस्कृतिक कारणामुळे खालच्या वर्गातले आहेत त्या सगळ्यांमध्ये प्रचंड असंतोष व असमाधान आहे. त्यांना कोणत्याही पक्ष वा प्रणालीविषयी भक्ती नाहीं. त्यांची फार फसवणूक झाली आहे. अन चालली आहे. ते आता सगळेच तपासून घेतील, आपले मार्ग आपण घडवतील. त्यांना आपल्यात ओढण्याचे प्रयत्न सगळीकडून होतील. स्वतःच्या क्रांतीच्या वाटा धुंडाळतील.

या वाटा कोणत्या असतील ? आजवर तुंबलेल्या, कधी जाग्या होऊन अणुधानही परत गढूळ झालेल्या, भोवऱ्यात फिरणाऱ्या खालच्या वर्गाच्या जाणीवांना आता दिशा कोणत्या ? समाज जीवनात सामाजिक लोकशाही आणण्याचे मार्ग कोणते ? पण याचा विचार करण्याआधी दलित साहित्य नेमके कुठे आहे ते पाहू या. स्वतःच्या स्थानाशी स्पष्ट जाण येणे ही पुढच्या दिशा शोधण्याची पहिली पायरी होईल. शंभर वर्षापूर्वी सुरू झालेल्या एका संपूर्ण युगाचा आज

त्यांचे सुंदर मणी करून माळ बांधायला समर्थ आहोत. उलट तुमचेच मणी काळवंडतायत आणि वितळतायत.

हे सामर्थ्य, ही प्रगल्भता व आत्मजाणीव (सेल्फ कॉन्शसनेस) अत्यंत परिश्रमाने दलित साहित्याने राखायला हवीत. कडक आत्मपरिक्षण व वरच्या वर्गाचे साहित्य आत्मसात करण्यावाचून हे होणार नाही. नाहीतर पुन्हा प्रचारी मूर्खपणात ते अडकतील, पुन्हा जुन्याचा भाग होतील. नव्या दिशा त्यांच्या हातून दाखवल्या जाणार नाहीत.

संमेलनात प्रा. वा. ल. कुलकर्णी आणि प्रा. सदा कऱ्हाडे यांनी एक मुद्दा मांडला की कविता वगैरे करणे सोपे असते, त्याबरोबरच आता खालच्या वर्गातल्या साहित्यिकांनी वैचारिक क्षेत्रात पडले पाहिजे. आणि हे खरेच आहे. नुसते खरेच नाही, अत्यंत महत्त्वाचे कारण आजच्या समाजात विचार व भावना यांची फार फारकत करून टाकली गेलीय. एकीकडे फार छान विचार, सिद्धांत, तत्वप्रणाली आणि दुसरीकडे नीच भावना, एकीकडे स्वातंत्र्य, समता, प्रेम, मानवतावाद ह्या संकल्पाना अन् तिकडे स्वार्थ, हावरेपणा, तुच्छभाव, क्रौर्य. एकीकडे आकृतिबंध, कलात्मकता तिकडे अस्सल उत्कट अनुभव दोहोची एकात्मकता, एकमेकांशी वैशिष्टचपूर्ण द्वंद्वात्मक संबंध आज नष्ट झाला आहे. आयुष्य ज्या फॉर्ममध्ये घेतले गेले आहे त्यावर थुंकावेसे माणसाला वाटते आहे. आजवरची कोंडी फोडायची तर खालच्या वर्गातून कवी, कथालेखकांप्रमाणेच विचारवंत निर्माण झाले पाहिजेत. कारण थोडेसे सोडले तर उच्चवर्गीय विचारवंत निरुपयोगी नव्हे मारकच आहेत. ते विचारवंत नाहीत, ते पूर्वग्रहवंत कूपमंडूक आहेत. आपल्या परंपरा, साहित्य, समाज, राजकारण, अर्थशास्त्र सगळ्या विषयी संशोधन करून शास्त्र पुढे नेल्याशिवाय, आपल्याला जे अस्पष्ट, काव्यमय तऱ्हेने जाणवते आहे ते स्पष्ट वैज्ञानीक पदांमध्ये मांडून घेतल्याशिवाय पुढे जाणे कठीण आहे. मार्क्स-लेनिन पाठ म्हणता आले व त्यांची तत्वे समजली की संपते, असली अल्प संतुष्ट वृत्ती आता निकामी आहे. गेल्या शंभर वर्षातल्या ज्ञानाची भर घालून मार्क्सवादाचा विस्तार व खोली वाढवणे जरूर आहे. हे करतानाच आपल्याला वैशिष्टचपूर्ण भारतीय समाजेतिहासाचा संपूर्ण दृष्टीतून अर्थ लावण्याची क्षमता येईल. आज जगभर ही प्रक्रिया चालू आहे. रशिया, पूर्व युरोप, चीन व क्यूबा आणि पाश्चात्य राष्ट्रात नव्या कल्पना, नवे विचार यांची

खळबळ चालू आहे. मार्क्सवादाला एवढे चांगले दिवस बऱ्याच दिवसात आलेले नव्हते. या सगळ्यांचा विचार इथे सुरू झाला पाहिजे. फुले, आगरकर, केतकर, जावडेकर, कोसंबी इत्यादींचे विचार अभ्यासले पाहिजेत. आणि अर्थात् बाबासाहेबांचे पण. मार्क्सवादासाठी येथेही गंमत चाललेली दिसते आणि वाईट वाटते. दलित साहित्यिकांनी मागे होऊन गेलेल्या कुणालाही देव केले की ते मेलेच. मग मार्क्स असो वा आंबेडकर. बाबासाहेबांच्या विचारांचा अभ्यास शास्त्रीय दृष्टीने व्हायला हवा, प्रत्येक गोष्टीविषयी शंका घेणे माझ्या जीवनाचे ब्रीदवाक्य आहे असे मार्क्स म्हणाला होता बाबासाहेबही तसेच म्हणाले असते यात शंका नाही.

परवाच कोणीतरी म्हटले की दलित साहित्य मूठभर आणि आरडाओरडा खंडीभर. आणि हे खरे आहे. याचे कारण नवे विचार निर्माण होऊन त्याचा प्रसार व्हायला हवा. तो झालेला नाही. तरच प्रगल्भता व सेल्फ कॉन्शसनेस येतो. साहित्य निर्मिती होते. नाहीतर त्याच त्याच भावना आपणही प्रस्थापितातल्या मंडळींसारख्या उगाळत राहू. मग कविता करणे सोपे असते. त्यांच्या भावना सांद्र, धुके वृक्ष, स्तन इत्यादींच्या असतील. आपल्या नव्या फॅक्टस्वर आधारलेल्या असतील. एवढेच पण विचारांमुळे समज व आवाका वाढतो आणि सकस साहित्य निर्माण होते. शिवाय चळवळी तर विचाराशिवाय चालणेच अशक्य. साहित्य विचार व लढे बरोबरच चालतात, चालू शकतात. पण त्याविषयी येथे नको.

शेवटी, दलितांना आत्मजाणीव खऱ्या अर्थी येत असतांना त्यांना आपले स्वरूप लक्षात येते आहे आर्थिक व सामाजिक स्थितीमुळे, पैसा व जातधर्मामुळे पिडले जाणारे सर्व लोक दलित आहेत व त्यांना एकदमच मुक्ती साध्य होईल हे त्यांना जाणवते आहे म्हणजेच बौद्धधर्मीय व हिंदुमधील अनुसूचित जाती जमाती, आदिवासी आणि सर्व कामगार, व शेतमजूर यांचे हितसंबंध वस्तुनिष्ठदृष्टया क्रांतीमध्येच आहेत भारतात ही अशीच क्रांती शक्य आहे व हवी आहे दलित साहित्याने त्याची जाण या वर्गांना व जातींना आणून द्यायला हवी ते आता इतके प्रगल्भ आहे की हे करणे त्याला शक्य होईल.

या प्रश्नात वर म्हटल्याप्रमाणे तात्विक पातळीवर काही मांडणी करावी लागेल समाजजीवनाचा आर्थिक आशय व सांस्कृतिक फॉर्म यांचे परस्पर

संबंध मार्क्सवादात कोणते आहेत ? आधुनिक संशोधनाने असे जास्त-जास्त सिद्ध होते आहे की हे संबंध कारण कार्य या प्रकारचे नसून द्वंद्वात्मक आहेत परस्पर क्रिया करणारे आहेत ही मार्क्सची धारणा आहे म्हणूनच नीती कल्पना, धर्म, कायदा, राजकीय संस्था इत्यादी घटकांना समाजशास्त्रीय विश्लेषणात योग्य स्थान मिळायला हवे आजवर ऐतिहासिक भौतिकवादाच्या खाली भंकसपणाच चालला होता तो थांबायला हवा. भारताच्या संदर्भात त्याचे फार मोठे महत्त्व आहे मार्क्सने भारतीय खेड्याच्या व्यवस्थेचे उत्कृष्टपणें विश्लेषण केले आहे, जाती व्यवस्थेचा व धर्म नीति कल्पनांचा विचार त्यात आपल्याला भरीस टाकून, नवीन विचार घडवावे लागतील. याचबरोबर साहित्य व कला यासंबंधीच्या जुन्या 'मार्क्सवादी' कल्पनाही आता बदलत आहेत. त्याच्यातही यांच्यातही यांत्रिकपणा, एकांगीपणा टाळण्याकरता परस्पर शास्त्रीय संशोधन होत आहे.

( आम्ही, मे १९७१ )

# दलित साहित्य : मराठीचे एक आशास्थान

* रा. ग. जाधव

सामान्यतः बहुजिनसी समाजातील काही प्रश्न असे असतात, की त्यांची उगममीमांसा करणे इष्ट असले, तरी अवघड बनते व म्हणून अनावश्यक ठरू पहाते. ती उगममीमांसा आवश्यक मानून करू गेल्यास त्या प्रश्नाचे जीवित्वच विकृत होण्याची वा संपुष्टात येण्याची शक्यता असते. संबंधित प्रश्नाच्या उपन्यासकाराला व नंतरच्या चर्चाकारांना त्याची उगममीमांसा यथार्थतेने ज्ञान असतेच असे नाही. आणि ते ज्ञान असूनही तिचे सम्यक महत्त्व प्रतिपादनीय वाटतेच, असेही नाही. मराठीत अलिकडेच चर्चाविषय झालेला दलित साहित्याचा प्रश्न, एकजिनसी नसलेल्या आपल्या समाजात एकविध नसलेल्या संदर्भ कक्षांच्या चक्रात सापडून भोवंडत असल्यासारखा दिसतो. ज्या दलित समाजियांनी या प्रश्नाचा उपन्यास केला आहे, त्यांना त्याचे औपपत्तिक स्वरूप यथार्थतेने समजले नसावे व कदाचित ते तसे समजूनही यथार्थतेने व्यक्त करता आले नसावे. दलितेतरांना दलित समाजाचे मनोगत नेटकेपणाने समजले आहे, असे मानण्यासारखीही परिस्थिती नाही ते मनोगत दलित समाजाच्या सांस्कृतिक संक्रमणावस्थेचे अंकुरण आहे व अशा अवस्थेच्या वेणा दलित समाजाला जशा व ज्या तीव्रतेने जाणवत आहेत, त्या तशा व त्याच तीव्रतेने दलितेतरांना जाणवतील, असे मानता येणे कठीण आहे याचा अर्थ दलित साहित्याच्या प्रश्नाचा बोध दलितेतरांना होणारच नाही असा नाहीं, एवढेच की, त्या बोधास सम्यक्‌दर्शन प्राप्त होणार नाही आणि तो बोध वैचारिक पातळीवरून भावनेच्या पातळीवर केव्हा घसरेल, हे सांगता येणार नाही. प्रस्तुत प्रश्नच असा आहे, की भावनांच्या आक्रमणापासून तो अलिप्त राखणे, दोन्ही समाजना अवघड व्हावे. बहुजिनसी समाजात एखाद्या प्रश्नाची उगममीमांसा अवघड बनू पाहते व मग अनावश्यक वाटू लागते, याचे कारण त्याची चर्चा स्तरांतरीत होते हे होय.

दलित साहित्याचा प्रश्न स्तरांतरित होण्याची संभाव्यता आहे व म्हणून त्याची स्तरनिश्चिती करण्यासाठी या समाजाची संक्रमणावस्थाच नीटपणे समजावून घेतली पाहिजे, असे मला वाटते.

संक्रमणागतांना आत्मस्थितीचे ज्ञान व बोध होण्यास वेळ लागतो, असा इतिहास आहे. परतंत्र भारतातील परंपरासंपन्न अशा उच्चवर्गीयांनाही आत्मस्थितीचे यथार्थ ज्ञान होण्यास व त्यास यथार्थ अभिव्यक्ति देण्यास अर्धशतकाहून अधिक काळ लागला हे आपण जाणतोच. दलित समाज आज स्वतःच्या सांस्कृतिक अभिव्यक्तीसाठी धडपडत आहे. धार्मिक क्षेत्रात बहुसंख्य दलितांस बौद्धदर्शनाची एक अभिव्यक्ति गवसली, किंबहुना आत्मस्थितीचे एक बोधचिन्ह म्हणून त्याने आपल्या कोऱ्या पाटीवर बौद्धदर्शनाची एक खूण कोरून ठेवली. ती खूण त्याच्या संक्रमणगत मनःस्थितीचे एक झटकन जाणवलेले प्रतीक आहे. आत्मबोधाच्या पहिल्या वहिल्या जाणिवांची ती साक्षात्कार स्वरूप अभिव्यक्ति आहे. तिचा अर्थ करणे, अर्थवत्ता शोधणे, अंगीकार करणे व आदर्शानुकरण करणे या नंतरच्या प्रक्रिया आहेत. दलित समाजाला या प्रक्रिया करण्यास ऐतिहासिक नियती भाग पाडीलच, यात शंका नाहीं. या प्रक्रिया एका पिढीत कालावधीत पूर्ण होणे शक्य नाही आणि या क्रिया घडत नाहीत, म्हणून दलितांची नवी धार्मिक अभिव्यक्ति चूक किंवा हास्यास्पद किंवा अस्वाभाविक ठरविण्याची तर्कदुष्ट भूमिका दलितेतर समाजांनी स्वीकारणेही योग्य ठरणार नाहीं.

दलित साहित्याचा प्रश्न हाही या समाजाच्या सांस्कृतिक अभिव्यक्तिच्या प्रयत्नापैकी एक प्रयत्न आहे ज्या शब्दांनी हा प्रश्न प्रत्यक्षात मांडलेला आहे, त्या शब्दांचा काथ्याकूट करण्यात स्वारस्य नाही पुस्तकी पांडित्य आणि कसरती यापेक्षा अधिक व वास्तविक अर्थ अशा काथ्याकुटास नाही जी एक आकुल सांस्कृतिक मनःस्थिती आजचा दलित समाज अनुभवत आहे, त्या मनस्थितीचे, हा प्रश्न म्हणजे दुसरे बोधचिन्ह आहे रुढ भाषाप्रयोगांनी हे बोधचिन्ह मांडून तो समाज आत्मविशदीकरणाचा स्वाभाविक व सर्वमान्य प्रयत्न करीत आहे सांस्कृतिक अभिव्यक्ति ही किती दुर्घट प्रक्रिया आहे, याची कल्पना नसणारांना आजच्या दलित समाजाचे कोणतेच प्रश्न यथार्थपणे समजणार नाहीत, असे मला वाटते, तसेच त्या प्रक्रियेचे अज्ञान खुद्द दलित समाजीयांनाही असणे शक्य आहे, हेही पटवून घेणे आवश्यक आहे सांस्कृतिक क्षेत्रात

बौद्ध दर्शनाच्या स्वीकारासाठी दलित समाजाला ज्या अटळ प्रक्रिया इतिहास-क्रमानें अंगिकाराव्या लागतील, त्याच अटळ प्रक्रिया साहित्य क्षेत्रातही दलित साहित्याच्या सिद्धतेसाठी त्याला पार पाडाव्या लागतील. यासाठीही प्रदीर्घ काळाची गरज आहे कोणत्याही समाजाची साहित्यिक अभिव्यक्ति एक पिढी रुपास आणू शकत नाहीं जागतिक साहित्येतिहासांचा हा निर्विवाद निर्वाळा आहे.

दलित समाज सांस्कृतिक संक्रमणावस्थेत आहे ही अर्थसंपृक्त वस्तुस्थिती ज्या दलित व दलितेतर सामाजियांना समजावून घ्यावयाची नाहीं, त्यांना 'दलित' या सोयीसाठी वापरलेल्या विशेषणाची कोणतीही विशेष्ये आकलन होणार कशी ? आजच्या दलित व दलितेतर समाजात सारख्याच तोलामोलाचे सामाजिक व वाङ्मयीन अभ्यासक आहेत. दोहोंतही वादपटुव्यक्ती आहेत. साहित्यिक आहेत. समीक्षकही आहेत. ते विरुद्धपक्षीय असले, तरी त्यांच्या विचारांची मूस तत्वतः एकसारखीच आहे. एखादा नवीन प्रश्न मांडतांना तो लक्षवेधक ठरण्यासाठी एकांतिक विवेचन करणे, इतिहासाचा चातुर्याने हवाला देणे, फड जिंकी दाखले देणे, शाब्दिक तरतराने परस्परास निरुत्तर करणे आणि पोटतिडकीचा मंद्र स्वर लावणे या व या प्रकारच्या बौद्धिक झटापटी करण्याच्या मनस्वी प्रवृत्ती दोहातही आढळतात. त्यामुळेच दलित साहित्याच्या प्रश्नाला चमत्कारिक फाटे फुटतात. निग्रो समाज व साहित्य यांची दलित समाज व साहित्य यांच्याशी सांगड घातली जाते व ती मान्य झाल्याचा भावडा होकार दिला जातो. निग्रो समाज हा स्वतःची निश्चित आदिम व सांस्कृतिक परंपरा असलेला समाज आहे. अमेरिकेतील निग्रो समाज त्या परंपरेला छेद देऊन गेलेली परंपरा खंडनाची एक दुर्दैवी आपत्ती आहे. देशत्यागाने निग्रो समाजाने संस्कृतित्याग केला आहे हे म्हणणे योग्य नाही. निग्रो साहित्याचा इतिहास याला साक्ष आहे. येथील दलित समाज निग्रो समाजाशी कसा तुल्य ठरतो, हे मला तरी समजलेले नाही. दलितांची सामाजिक समस्या निग्रो समाजापेक्षाही व्यापक व वेगळी आहे. स्वेतरांच्या सांस्कृतिक पडछायेत हा समाज शतकानुशतके जगत राहिला. निग्रोची अभ्यासमुक्ततेची जाणीव प्राधान्याने आर्थिक, सामाजिक, राजकीय स्वरूपांची आहे, तर दलित समाजाचा भ्रमनिरास प्राथमिक मानव्याचा आहे. आपण माणूसच नव्हतो, अशा आशयाचे हे भासभंजन आहे. म्हणूनच समाज म्हणून व निग्रोच्या विद्रोही निषेधी साहित्यासारखे साहित्य म्हणून दलितांच्या समाजाचे व साहित्याचे प्रक्षेपण करणे अप्रयोजकपणाचे आहे, असे मला वाटते.

या लेखाच्या प्रारंभीच मी सुचविले होते, की काही प्रश्नांचे प्रश्नत्व शोधणे इष्ट असले, तरी नेहमीच आवश्यक असते, असे नाहीं. दलित साहित्याचा प्रश्न, प्रश्न म्हणून समजावून घेण्याची जी तयारी दलित व दलितेतर समाजात हवी, ती अशी आज सिद्ध आहे असे दिसत नाही. विशेषतः दलितेतर समाजाला तशी तयारी करण्याची गरजही नाही. व्यक्तीजीवनात काय किंवा समाज-जीवनात काय, ज्याचे प्रश्न त्यानेच सोडवावयाचे असतात. या कामी अन्यांच्या सहकार्याचा नि सहानुभूतीचा तसेच असहकाराचा नि विरोधाचा काहीही उपयोग होत नसतो. आजच्या उच्च अभ्यासक्रमात धर्मशास्त्र, समाजशास्त्र यात डॉ. आंबेडकरांसारख्या मूलगामी विचारवंतांच्या विचारसरणीचा अंतर्भाव नाही. समाजशास्त्र घेऊन पदव्युत्तर पदवी घेतलेल्याने "हू वेअर द शूद्राज?" ह्या ग्रंथाचे नावही ऐकलेले नसते. वर्चस्वाचा वर्गकलह आपण समजू शकतो व म्हणून ही गोष्टही समजू शकतो. लोकमान्य टिळक लोकशाहीवादी होते, हा धडा शिकावयास आपणास पाऊणशे वर्षे लागतात. विशिष्ट वर्गकलहाचाच हा एक विशिष्ट परिपाक होय. संत ज्ञानेश्वरांपासून तुकोबांपर्यंत सर्वच संतांनी स्त्री-शूद्राना सहानुभूतीने थोपटले. आजच्या मराठी साहित्याच्या पदवी वर्गातील दलित विद्यार्थ्याला हे थोपटणे अस्वस्थ करते. त्यासाठी थोपटणे नसणारे प्राचीन मराठी वाङ्मय कोठून आणावयाचें? प्राचीन मराठी कथाकाव्य तर महाभारत-रामायण भागवत यावर आधारलेले? ज्या नवबौद्ध तरुणांचा या हिंदू ग्रंथावर विश्वासच नाही, त्यांना त्या कथाकाव्यांच्या आस्वादाची अनुकूल मनोभूमिका कशी प्राप्त होणार? "श्यामची आई" चांगली खरी, पण ती "भीमाची" आई होणार कशी व एखाद्या "भीमाला" आत्मप्रत्यय किंवा पुनः प्रत्यय येणार कसा? इतिहास बदलता येत नाही, केवळ ऐतिहासिक दृष्टिकोनाची आवश्यकता व अटळता पटवून देता येते, मग दलित विद्यार्थ्यांसाठी प्राचीन बौद्ध साहित्याची व पुरोगामी मराठी साहित्याची अभ्यासक्रमात सोय करावयास हरकत कसली? हाही ऐतिहासिक दृष्टिकोनच आहे. मराठी त्यांची मातृभाषा, म्हणून हा नवा अभ्यासक्रम मराठीत आणावयास कसली अडचण आहे? दलित समाजियांकडेच हे कार्य सोपवावे आणि खरे तर, त्यांनी स्वतः होऊनच ते करावे. निग्रोसाहित्य दलित समाजाचे मानसिक प्रति-बिंब दाखवू शकते. असे म्हणणारांनी ते निग्रो साहित्य तरी मराठीत आणावे पाली साहित्यही अनुवादासाठी तिष्टत आहे हे सर्व अखेर दलित समाजियांनीच केले पाहिजे याला पर्याय नाहीं, लघुमार्गही नाही दलिते-

तरांच्या कार्यावर दलितांचा विश्वास नाही आणि दलितेतरांनीही उगाच दलितांचा विश्वास, हात दाखवून' गमविण्यात अर्थ नाही.

दलित समाजाच्या सांस्कृतिक अभिव्यक्तीच्या संदर्भात जाणवणारे कांही प्रश्न वर निर्देशिलेले आहेत. त्यांचा निर्देश करण्याचा हेतू, दलित साहित्याच्या प्रश्नाचे प्रश्नत्व समजावून घेण्यात समाजाची साकल्यात्मक मनोभूमिका किती अनुकूल आहे, असू शकते, हे सुचविणे एवढाच आहे. दलित समाजाच्या धर्मांतराशी काय किंवा त्यांच्या अभ्यासक्रमीय पुनर्रचनाकांक्षेशी काय, अगदी मनोमन समरस होणे आपणांस अजून साधलेले नाही. या बाबतीत अनेक शंकास्थळे आपल्या मनांत थाटलेली आहेत. खुद्द दलित समाजातही त्या बाबतींत एकसंध भूमिका निर्माण झालेली नाही. अनेक जाती जमातींत विखुरलेला दलित समाज नवबौद्ध दर्शनाने चैतन्यमय एकतेचा साक्षात्कार होऊनही एकमय झालेला नाही. दलित समाजाच्या संक्रमणावस्थेचेच हे एक गमक आहे आणि तेही आपण समजू शकतो.

दलितेतर समाज हे सारे आकलन करण्यास काहीसा असमर्थ आहे. याचे कारण हा समाजही काही सांस्कृतिक प्रश्नानी पछाडलेला आहे. आपली सांस्कृतिक पुनराभिव्यक्ती साधण्यासाठी तोही धडपडत आहे. अतिवास्तववादी किंवा अस्तित्ववादी साहित्य निर्माण करून या वर्गातील नवा साहित्यिक आत्मस्थितीचे बोधचिन्ह रेखाटू बघत आहे. पूर्वपरंपरा त्यानेही त्याज्य मानली आहे. त्याच्या जवळही कोरीच पाटी आहे. एका दृष्टीने हा साहित्यिक एका प्रकारचा दलित साहित्यिकच आहे. फरक एवढाच की, एखादा दिलीप चित्रे पांच हजारातून पांच हजार उणे करून वजाबाकी शून्यावर आणतो, तर एखादे बाबुराव बागूल शून्यातून शून्य वजा करून वजाबाकी शून्य लिहितात.

दलित साहित्य–समाजाचे प्रश्न आपले प्रश्नत्व हरवून बसतात, त्याचे कारण, सांस्कृतिक प्रश्नाच्या स्थूल साम्यामुळे त्यास दलितेतर संदर्भकक्षा चटकन् देण्याचा मोह अनावर होतो, हे होय. त्यामुळे प्रथम बृहन्मराठी, नंतर बृहन्भारतीय व अखेर अखिल मानवी सांस्कृतिक प्रश्नांच्या ऐसपैस श्रेणीबंधात दलितांचे प्रश्न गुंतविण्यात येतात. अशी गुंतवणूक विवेचनीय नसते, असे नाही. पण तीतून अवघड प्रश्नांना सोपी उत्तरे दिली जाण्याची शक्यता असते. साहित्य म्हणजे काय, साहित्य वर्गाविशिष्ट असते तरी काय, साहित्याचे

आवाहन वर्गीय असते काय, यासारख्या प्रश्नांची चर्चा करून दलित साहित्याच्या प्रश्नांचे प्रश्नत्वच संपुष्टात आणले जाते. ऐतिहासिकता, मानवता आधुनिकता यांसारख्या विषयांचे विवेचन करून दलित समाजाचे सामाजिकत्वच अयथार्थ ठरविले जाते. थोडक्यात साहित्य–समाज विषयक गृहित संकल्पनांनी मूळ प्रश्नास ढगाळ संदिग्धता व धूसर व्यापकता प्राप्त होते. आजचे समाजमन दलितांचे प्रश्न जाणून घेण्यास अनुकूल नाही असे म्हणावेसे वाटते, ते याच दृष्टीने.

दलित साहित्याची खरीखुरी गरज स्वच्छ व चोख दार्शनिक अधिष्ठानांची आहे. दलित समाजाला साहित्यिकापेक्षा निष्ठावंत विचारवंतांची अधिक आवश्यकता आहे. विचारदरिद्री समाजात कोणतीच कला निर्माण होऊ शकत नाही. बौद्धाचे तत्त्वज्ञान दलित समाजाचे मौल्यवान धन आहे. केवळ काही नित्य नैमित्यिक संस्कारांपुरते हे धन बाहेर काढून, पुन्हा लगेच ते पुरून ठेवले तर ती घातक कृपणता त्या धनाचा क्षय करील, बौद्धदर्शनाचे कालानुरुप एक नवे दार्शनिक रसायन करण्याची एक आव्हानप्रद अवस्था दलित समाजास प्राप्त झाली आहे. जगातील कोणत्याही पुरोगामी विचारात जेवढी आहे, तेवढी वैचारिक व प्रेरक शक्ती बौद्ध दर्शनात आहे. मुख्य म्हणजे, बौद्ध जीवनमूल्यांची कास धरल्यास दलित समाजाचे केवळ नकारात्मक विचारसरणीपासून संरक्षण होईल. कदाचित साम्यवादासारख्या प्रलोभनीय विचारसरणींलाही तो चार हात दूर ठेवू शकेल. बौद्ध विचारप्रणाली मनोमन रुजविण्याचे व दलित मने दृढ करण्याचे महत्त्वाचे ऐतिहासिक कार्य दलित समाजीय विचारवंतांनी केले पाहिजे. समाज वाढतो व विकासतो, तो विद्रोहाने नव्हे व निषेधानेही नव्हे, तो विधायक विचारप्रणालीच्या खांद्यावर विश्रब्धपणे विसावलेला नसेल, तर प्रगतीची वाटचाल करण्यास त्यास बळ लाभणार नाही. डॉ. आंबेडकरांना खरा वैचारिक शिष्य लाभला नाही तर दलित समाज महान स्वप्न पाहू शकला नाही, असाच त्याचा अर्थ होईल. निग्रो समाजाचा व साहित्याचा अभ्यास करण्यापेक्षा बुद्ध जीवनाचा व पाली साहित्याचा अभ्यास अधिक प्रेरक आहे. असे आवर्जून सांगणाऱ्या एकनिष्ठ दलित विचारवंताची दलित साहित्याला व समाजाला अधिक गरज आहे.

दलित साहित्याची दुसरी गरज नव्या मराठी धर्मग्रंथांची व पुराणांची आहे. बौद्धदर्शनांच्या आधारे नवीन रामायण महाभारत निर्माण करणे आव-

श्यक आहे. नव्या मिथ्स निर्माण होणे आवश्यक आहे. नवबौद्ध दलित समाज रामायण महाभारत मानीत नाहीं. दलितांच्या बालकांना एखादी आजीबाई कोणत्या गोष्टी सांगणार? दलितांतून एखादा शिवाजी निर्माण करण्यास कोणते संस्कारी साहित्य वापरणार? आरत्या, स्तोत्रे, पदे याबरोबरच आख्याने कथाकाव्ये, भाष्ये, पोथ्या वगैरेचीही निर्मिती करणे भाग आहे. प्राचीन बौद्ध साहित्याची या दृष्टीने पाहाणी करण्याचे काम दलित साहित्यकाचे आहे. "फोडिले भांडार" अशी आरोळी देणारे कविलेखक पुढे आले, तरच ते शक्य आहे. सगळचाच दलित साहित्यकांनी 'सूडाच्या' कथा लिहिल्या तर संस्कृति संभवाचे हे पूरक कार्य कोण करणार? ....... हे विसावे शतक आहे, वैज्ञानिक युग आहे, त्यामुळे पुराणसाहित्य निर्मिती कालविसंगत व म्हणून अशक्य आहे, असे काहीचे म्हणणे असेलही, परंतु आधुनिकतेचा हा हवाला देऊन, दलित समाजाचे वाङ्मयीन प्रश्न कधीच सुटणार नाहीत. उलट पुराण-साहित्यनिर्मिती हे आधुनिक काळाचेच एक आवाहन समजले पाहिजे. सांस्कृतिक अभिव्यक्तीची प्रक्रिया कालसापेक्ष असली तरी कालकल्पनेहून ती अधिक प्रबळ असते. बौद्धदर्शन रूपास आणणारा गौतम बुद्ध, एका दृष्टीने, तत्कालीन आधुनिक कालातच वावरत होता. नव्या दर्शननिर्मितीची त्याची प्रेरणा म्हणजे सांस्कृतिक अभिव्यक्तीचीच प्रेरणा होती, प्रक्रिया होती व ती त्याच्या 'आधुनिक' कालापेक्षा अधिक बलवत्तर होती. वैज्ञानिकता सांस्कृतिकतेला काटछेद देऊ शकत नाही. अचल निदृढतम दार्शनिक आत्मप्रत्ययातून कलासाहित्यासारखी आत्मभिव्यक्ती समाज संसिद्ध करू शकतो आणि तसा अचल व दृढतम दार्शनिक आत्मप्रत्यय केवळ धर्मश्रद्धाच निर्माण करू शकते. ही महत्त्वाची वस्तुस्थिती दलित समाजियांनी लक्षात घेतली नाही, तर साम्यवादाच्या, विद्रोहाच्या व निषेधाच्या कांचनमृगाचा मोह पडून, तो एका घातक भुलभुलय्यात अडकून पडल्याशिवाय राहाणार नाही. यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट, म्हणजे एका अनिष्ट सांस्कृतिक पोकळीत तो स्वतःस टांगून घेईल आणि या देशात पुन्हा एकदा बौद्धदर्शनाचा पूर्ण पराभव होईल.

दलित साहित्याचा तिसरा प्रश्न इतिहास जमा होऊ लागलेले पूर्व पिढ्यांचे जीवनानुभव नव्या पिढीने साहित्य स्वरूपात "अक्षर" करण्याचा आहे. हा प्रश्न बनतो, याचे एक कारण असे की १९५० नंतर जन्मास आलेली दलितांची जी नवी पिढी आहे, ती पूर्व पिढ्यांच्या तुलनने अगदी वेगळ्या वातावरणात मोठी झालेली आहे. संविधानिय तरतुदी व सामाजिक परिवर्तन यांच्या

परिणामाचे फायदे नव्या पिढीस लाभलेले आहेत. अशा नव्या पिढीतील दलित साहित्यिकांना जुन्या पिढीचे व पिढ्यांचे चित्र काढावयाचे आहे.

दलितेतर साहित्यिकांनीही गेल्या दोन शतकात पूर्व पिढ्यातील जीवनाचे चित्रण मराठीत केले आहे. राजे मारतरांची व माणदेशी माणसांची अशी चित्रणे दलितेतर साहित्यिकांच्या सांस्कृतिक पुनराभिव्यक्तिचे प्रयत्न होत. नव्याचे आव्हान स्वीकारता आले नाही अथवा नव्याचे आकलन करता आले नाही, की जुन्याकडे वळणे पुष्कळदा अनिवार्य असते कारण जुने व्यवस्थाक्षम असते किंवा असल्यासारखे भासते आणि नवे तितके व्यवस्थाक्षम नसते किंवा नसल्यासारखे भासते. दलित साहित्यिकांच्या पूर्वजीवनचित्रणास सामाजिक उत्तरदायित्वाची जी महत्त्वाची पार्श्वभूमी आहे, ती तशी दलितेतर साहित्यिकाच्या पूर्व जीवनचित्रणास नाही. याचेही कारण एवढेच की, हे दोन्हीं समाज एकाच अर्थाने सांस्कृतिक संक्रमणावस्थेत नाहीत. राजे मारतरांच्या कथा व माणदेशी माणसांच्या कहाण्या कुठल्यातरी अर्थाने जीवनापासून दूरगमन करणाऱ्या आहेत, उलट जात चोरणारांच्या कथा कुठल्यातरी अर्थाने पण जीवनाकडे निकटगमन करणाऱ्या आहेत. या निरिक्षणाचा अर्थ करण्याची गरज दलितेतर साहित्यिकापेंक्षा दलित साहित्यिकालाच अधिक आहे.

"आम्ही आमची दुःखे विसरण्याचा प्रयत्न करीत आहोत, तुम्ही मात्र कठोरपणाने ती दुःखे आम्हास लिहावयास सांगत आहात" असे भावव्याकुळ उद्‌गार अनेक तरुण दलित बांधवांनी माझ्याजवळ काढलेले आहेत. त्यामागील भावना मला समजते, पण विचार मात्र विशद करणे इष्ट वाटते, तरुण दलित साहित्यिकांनी आजचे जीवनानुभव व्यक्त करू नयेत, असे नाही. आणि काल-परवाचे जीवनानुभव त्यातील दुःखमयतेवर भर देऊनच लिहावेत, असेही नाही. दुःखानुभव विलक्षण अर्थसंपृक्त असतो. व मानवी जीवनाचे जे नाट्य आहे, त्याचे तो आश्रयस्थान असतो. दुःखानुभवाचा आविष्कार करणे म्हणजे दुःखा-नुभवाचा पुनः प्रत्यय घेणे नव्हे, तर त्या दुःखानुभवाचा अर्थ करणे होय. तरुण दलित साहित्यिकांनी पूर्वपिढ्यांची दुःखयात्रा वर्णन करावी असे मला वाटते, याचा अर्थ एवढाच की, त्या दुःखयात्रेचे जे अर्थतीर्थ आहे, त्याचे दर्शन त्यांनी घडवावे. ललित साहित्य ही अखेर एक सर्जनशील अर्थप्रक्रिया आहे. ती सोपी नसते हे खरेच, पण दलित साहित्यिकांना मानवतेच्या आधारे तिला सोपे व सुलभ करुन उपेक्षितांचे अंतरंग उघड करता येईल आणि बौद्ध दर्शनाच्या

कालोचित अधिष्टानाने ती अर्थक्रिया संपन्न करुन, त्या अंतरंगाचेही अंतरंग व्यक्त करता येईल. पूर्वजीवनाचा सोपा अर्थ करणारे व संपन्न व अर्थ करणारे अशा दोन्ही प्रकारचे तरुण दलित साहित्यिक आज हवे आहेत. ज्या सांस्कृतिक अभिव्यक्तिसाठी दलित समाज धडपडत आहे, त्या अभिव्यक्तीला पूर्वपिढ्यांचे कसल्याही प्रकारचे, पण प्रामाणिक, जीवन चित्रण एक निश्चित पार्श्वभूमीही देऊं शकेल.

दलित साहित्याला प्रभावी समीक्षकाचीही गरज आहे. आपल्या समाजाची भाषा व भावना जाणणारा आणि त्यांच्याशी मनःपूर्वक समरस होणारा टीकाकार दलित साहित्यिकाला फार मोठी प्रेरणा देऊ शकेल. प्रचारी टीकाकार व भलावणीकार समीक्षक हे दोघेही अनिष्टच ठरतील. पहिला अतिस्तुतीने व दुसरा औपचारिकतेने साहित्याचा खेळखंडोबाच करणार यात शंका नाही. समीक्षक ही आधुनिक साहित्य क्षेत्रातील एक अत्यावश्यक संस्था आहे. दलित्त समाजात आज अनेक व्यासंगी लोक आहेत. त्यांनी सामाजिक जबाबदारीच्या जाणिवेने दलित साहित्यिकांना समजावून दिले घेतले पाहिजे. दलित साहित्यातील आशय आकाराचे प्रश्न जाणून घेतले पाहिजेत आणि समतोल चिकित्सेद्वारा दलित लेखकांना प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने मार्गदर्शन केले पाहिजे. दलित साहित्यिक किंवा कोणताही साहित्यिक काय, वाङ्मयीन संकेतांच्या व अनुकरणाच्या आहारी जाणे सहज शक्य असते. दलित साहित्याच्या समीक्षकाने या बाबतीत दक्ष राहून अनिष्ट सांकेतिकता वा अनुकरण याविरुद्ध वेळीच इशारा दिला पाहिजे.

दलितेतरांची शाबासकी किंवा मान्यता मिळविण्याचा प्रयत्न करणे व तो अयशस्वी झाल्यास हेत्वारोप करीत सुटणे किंवा तो प्रयत्न यशस्वी झाल्यास स्वतःस धन्य समजणे, या सर्वच प्रकारापासून आज उद्याच्या दलित साहित्यिकाने दूर रहावे असे वाटते. आपण साहित्य लिहितो ते आपल्या समाजासाठी हे त्यांनी कधीच विसरू नये. मराठी भाषा दलितेतर समाजाचीही आहेत. गरज भासली, तर निग्रो लेखकांचे इंग्रजी साहित्य वाचणाऱ्या गोऱ्या अमेरिकी माणसाप्रमाणे हा समाज दलित साहित्यिकांचेही साहित्य वाचील म्हणून भ्रामक मोठेपणाच्या कल्पना उराशी बाळगून, पुन्हा त्या खोट्या ठरल्या, म्हणून विफलग्रस्त होण्याची दलित लेखकास गरज नाही.

दलित साहित्याची खरी गरज साहित्यिकाची नसून समीक्षकाची आहे. हे म्हणणे सकृद्दर्शनी चमत्कारिक वाटेल, पण ते खरे आहे. कवी, कथाकार यांचा उदय निसर्गक्रमाने होत असतो. त्यांचा जन्म निसर्गतः व्हावा लागतो. समाज त्यांची आई बनू शकत नाही, तर केवळ दाई बनू शकतो. समाजाचे हे दायित्व, व खरे तर दायित्वही, तेव्हांच सफल होऊ शकते, जेव्हां कलावंतांच्या 'बाळांना' तो वैचारिक पोषणाची सुविधा उपलब्ध करून देऊ शकतो. समाजाच्या हाती अनुकूल वैचारिकता व परंपरा संसिद्ध करणे ही महत्त्वाची गोष्ट आहे व दलित समाजाने या बाबतीत पूर्व तयारी केली पाहिजे. साहित्यिकांची गरज निसर्ग भागवू शकेल पण साहित्याची गरज समाजालाच भागवावी लागेल. म्हणून दलित समीक्षक जेव्हां खराखुरा दलित वाचकवर्ग निर्माण करण्याचा प्रयत्न करील, तेव्हांच अठरापगड दलित जातिजमातींतून साहित्यिकांचा मेळावा उदयास येऊ शकेल.

दलित साहित्याच्या संदर्भात आणखी एक प्रश्न उल्लेखनीय आहे. तो म्हणजे सामाजिक प्रश्न व साहित्यिक प्रश्न यांची गल्लत करण्याचा मोह. असा मोह संक्रमणावस्थेचा (की सनातनावस्थेचा?) एक स्वाभाविक परिपाक असतो व म्हणून तो सार्वत्रिक असतो. अशा प्रकारचा मोह दलितेतर समाजियांनाही टाळता आला नव्हता. आधुनिक मराठी समीक्षा अशा मोहाचा निर्वाळा देऊ शकेल. म्हणून दलित समाजाचा हा मोह ओजस्वी खंडनाचा विषय करण्यात अर्थ नाही व अवघडपणाही नाही. अशा मोहाच्या संदर्भात काही गोष्टी लक्षात आणून देणे इष्ट ठरेल : एक म्हणजे जगातील कोणत्याही समाजात साहित्यिकाला साहित्यिक म्हणून कोणतेच सामाजिक विशेषाधिकार कधीही लाभलेले नाहीत. दुसरे म्हणजे, कोणताही समाज साहित्यिकांच्या चरितार्थाची जबाबदारी कधीही स्वीकारीत नाही. आणि खरी महत्त्वाची गोष्ट अशी की, समाजाला साहित्यिकाची साहित्यिक म्हणून गरजच नसते. समाज स्वतःच्या साहित्येतर गरजांच्या सापेक्षतेने साहित्यिकाला महत्त्व देतो. दुसऱ्याला मानधन देतो. तिसऱ्याला पारितोषिक देतो नि चौथ्याचे जन्म-शताब्दि समारंभ साजरे करतो. समाजाची ही भूमिका दलित साहित्यिकाने व समीक्षकाने यथार्थपणे समजून घेतली नाही तर दलित समाजच त्याचा गैरफायदा उठविण्याचा धोका आहे. विशेषतः आजच्या दलित समाजाचे सामाजिक व राजकीय प्रश्नोपप्रश्न ज्या निकडीच्या अवस्थेत आहेत, ती अवस्था साहित्यिकाला साहित्येतर साध्यासाधनात साधनीभूत करण्याइतकी तीव्र आहे. शंकररावजी खरात व बाबुराव बागूल

यांच्या हातील लेखण्या यांच्या नकळत काढून तेथे मोर्चाचे फलक स्थापण्याची करामत ती अवस्था सहजपणे करु शकेल. लेखकाने समाजाभिमुख असावे, विशेषत: आजच्या दलित लेखकाने तर समाजाभिमुखच असण्याची तीव्र गरज आहे. पण कोणत्याही समाजातील लेखकाची इष्ट समाजाभिमुखता म्हणजे अनिष्ट समाजाधीनता नव्हे. उद्या दलितेतर समाजातील चारचौघांनी व दलित समाजातील पाच पंचवीसांनी दलित लेखकाच्या सुखनैव चारितार्थाची सोय केली, तरी लेखक जगविण्याची ती सामाजिक सुविधा लेखन-निर्मितीची संभाव्यता सिद्ध करु शकेलच असे नाही. दलितेतर समाजातील हजारो वर्षांचा साहित्यकांचा जीवनपट पाहिला तरी त्यातही लौकिक जिण्याची निरामय अशी सामाजिक सोय असल्याचे आढळून येत नाही. स्वत:चा काय किंवा स्वेतर काय, कोणताच समाज इतका साहित्यप्रेमी नसतो. दलिताचे सामाजिक प्रश्न सामाजिक पातळीवर समाज सोडवील, त्यांचे साहित्यिक प्रश्न साहित्यिक पातळीच्या स्वावलंबी वातावरणात दलित साहित्यिकालाच सोडवावे लागतील. या जगात आपले काय किंवा परके काय, स्वत:च्या हेतूप्रीत्यर्थच सहकार देतील. समाज ही संस्था तर अशी आहे, की ती आवळा देऊन कोहळा वसूल करण्यास पुढे सरसावेल. ही कटू पण सत्य वस्तुस्थिती दलित साहित्यिकाने समजावून घेणे, दलित साहित्याच्याच हिताचे ठरेल. जगणे लिहिणे व प्रकाशित करणे या बाबतीत दलित साहित्यिकाला जुन्याच मळवाटेने गेले पाहिजे. या मळवाटेवर त्याला निवारा (?) लाभेल, तो फक्त पूर्वसूरींच्या उपेक्षेचा, रक्ताचा, अश्रूंचा, असाहाय्यतेचा नि वैफल्याचा ! ती मळवाट महालाच्या मंझिलाची नाही. तर माणसाच्या प्रबल कलासक्तीची आहे आणि लौकीक सुख-स्वप्नांना कुर्बान करणाऱ्या व्रतस्थ उपासकाची आहे. दलित साहित्यिकांनी मनोमन तरी साहित्यिक जीवनाची ही अटळ नियती स्वीकारली पाहिज, नाहीतर सामाजिक गोंधळातील भुत्याची भूमिका त्याच्या नशिबी आल्याशिवाय राहणार नाही.

भारतीय संविधान आणि कायदेकानून यांच्या आधारे दलितांचे साहित्येतर प्रश्न सुटण्याच्या अवस्थेत आहेत. खरे तर, त्या प्रश्नांचा प्रश्नपणाच आता संपुष्टात आला आहे. दलितांचा खरा प्रश्न पृथगात्म सांस्कृतिक दलितेतर अभिव्यक्तीचा आहे आणि ही अभिव्यक्ति दलितेतर समाजावर चिडून, संतापून साधणार नाही. तत्त्वत: चिडण्यासारखे आता काही उरलेले नाही. अस्पृश्यावर अत्याचार होतो हे खोटे नाही. पण त्याचा बीमोड करण्याची विधिव्यवस्था उपलब्ध आहे. म्हणजे दलितांच्या जीवनाचे दलितेतर समाजसापेक्षा नाटच आता नाटच-

पणच गमावू लागले आहे. सामाजिक संघर्षाचे कंगोरेच संविधान, कायदेकानू यांनी छिलून टाकले आहेत. अशा संघर्षाचे चित्रण केलेच, तर त्यात "मध्ययुगीनता" निर्माण होण्याची दाट शक्यता आहे. दलित समाजाचे साहित्य विषय होऊ शकणारे महान नाटय बौद्धदर्शनाच्या कालोचित्त आंगणावणाच्या प्रक्रियेत दडलेले आहे. बाबुराव बागुलांनी अशा भानाने "सूड" घेतला असता तर मध्ययुगीनत्वाच्या कक्षेतून बाहेर पडून ती कथा खऱ्याखुऱ्या दलित समाजाच्या महान अभिव्यक्तीची द्योतक ठरली असती. मी बागुलांना मित्र भावाने ओळखतो, त्यांना दोष देण्याचा उद्देश अर्थातच नाही. दलित साहित्याचा ध्रुवतारा बौद्ध-दर्शन आहे, याचा विसर दलित साहित्यिकांना पडू नये म्हणून हे लिहिले. हा ध्रुवताराच मध्यमवर्गीय साहित्याच्या चौकटीतून दलित साहित्यास विमुक्त करील. एवढेच नव्हे, तर गेल्या आठशे वर्षात ज्या साहित्याची व्याख्यादेखील मराठी सारस्वतांना करता आली नाही. त्या दलित साहित्याची एक विधायक व्याख्या वर्णनासह व पुराव्यासह संसिद्ध करु शकेल. "दलित" हा शद्बच नव्या अर्थानि व अर्थवत्तेने भारून टाकील. शद्ब अखेर एक चिन्हच, त्या चिन्हाचा नवा अर्थ साधण्याचे तेजस्वी कार्य दलित साहित्यिकांना करवयाचे आहे. म्हणूनच आम्ही विचारवंतांनी हा शद्बाच्या मागे लागण्याचा बाळचाळा सोडला पाहिजे. "हा शद्ब गंर्भार आहे, त्याच्या आसपास फिरकू नका, तो अपत्य संभवाच्या नाजूक अवस्थेत आहे, थांबा किंवा हळूच जा." अशा स्वयंशिस्तीची आज खरी गरज आहे.

नव्या दर्शनाच्या चैतन्याने प्रेरित झालेले दलित साहित्य, मी म्हणतो त्या वळणाने विकसित होत गेले तर मराठी सारस्वताला आजवर संस्कृत व इंग्रजी वळणाच्या ज्या दोनच मिती होत्या, त्यात कादाचित बौद्ध वळणाच्या तिसऱ्या मितीची भर पडेल. आणि ही तृतीय मितीच कदाचित दलितेतर साहित्यि-कांनाही खऱ्या अर्थाने दलित साहित्यिक होण्याचा अनावर मोह निर्माण करील. कदाचित या तिसऱ्या मितीमुळेंच मराठीला नोबेल पारितोषिकही मिळेल. ज्या दलित साहित्याला बौद्धदर्शनाचे अधिष्ठान सुदैवाने लाभले आहे, त्याने दलिते-तरांच्या संभ्रमित साहित्याचेही नेतृत्व करण्याची धमक ठेवूनच आत्मप्रत्यय-पूर्वक साहित्यनिर्मितीचे प्रस्थान ठेवावे . . . . . . . . . . .

दलित साहित्य हेच आमच्या मराठी साहित्याचे आशास्थान आहे, असे मला मनःपूर्वक वाटते . . . . . . .

('आम्ही' ऑगस्ट १९७१)




# दलित साहित्य : एक आवश्यक आविष्कार

* वि. स. खांडेकर

"दलित साहित्य" या शब्दप्रयोगासंबंधानं आणि त्या अनुरोधानं दलितांच्या जीवनांचं चित्रण करणाऱ्या लेखनाविषयी आपल्याकडं चर्चा सुरू झाली आहे. गतवर्षी नोव्हेंबरमध्ये महाबळेश्वर येथे भरलेल्या एका विभागीय साहित्य संमेलनात या विषयावर परिसंवाद झाला. फौजदारी खटल्यात दोन्ही बाजूच्या वकिलानी अटीतटीची भाषणं करावीत तशी, भाषणंही तिथं झडली. त्यानंतर महाडला दलित साहित्य संमेलन झालं. या संमेलनात दलित साहित्याचं स्वरूप, तशी त्याचे उद्देश वगैरे गोष्टीविषयी पुष्कळ उहापोह झाला.

अशा प्रकारच्या चर्चा होणं हे साहित्याच्या कक्षा रुंदावण्याच्या व त्याचा विकास होण्याच्या दृष्टीने एक शुभ चिन्ह आहे. शिक्षणाचे पाझर आता दलित समाजापर्यंत पोचले आहेत. त्यातल्या तरुण मनाना आत्मविकाराच्या प्रेरणांचे नवे कोंब फुटले आहेत. आपली लहानमोठी सुखदुःखें, आपल्यावर होणारे अन्याय व अत्याचार आणि आपल्या साऱ्या समाजाला शृंखलाबद्ध करणाऱ्या समस्या या साऱ्या गोष्टी कुठलाही आडपडदा न ठेवता जगापुढं मांडायला ही मंडळी आसुसलेली आहेत. मराठी साहित्य सरितेचं पात्र अधिक रुंद आणि अधिक खोल व्हायला ही घटना निश्चितपणे उपकारक ठरेल.

असं असूनही दलित साहित्य नावाचा सवतासुभा ही मंडळी का स्थापन करीत आहेत, असा साळसुद सवाल अनेकाकडून केला जात आहे. तात्त्विक भूमिकेच्या मखमली पडद्याआडून असली शरसंधान नेहमी चालतात. साहित्यात नवं आणि जुनं, पांढरपेशांचं आणि कष्टकऱ्यांचं, मध्यमवर्गीयांचं आणि दलितांचे असे भेद करणे म्हणजे साहित्य कशाशी खातात या विषयी आपले अज्ञान प्रगट करण्यासारखं आहे. असा या मंडळीचा सूर असतो.

साहित्याची ही तात्विक बैठक प्रत्येक रसिकाला ठाऊक असते. कलेत किंवा साहित्यात हवाबंद कप्पे नसावेत, सरस्वतीच्या विशाल मंदिरात भाड्याच्या आशेने भिंत घालून ८×१० च्या खोल्या करू नयेत हे म्हणणं चूक नाहीं पण दूध म्हटलं की, त्याचा रंग, त्याचे गुणधर्म, त्यातली जीवनसत्वं ही जशी सर्वत्र सारखी, तसं सारं साहित्य इथून तिथून एकच हे प्रतिपादन फक्त तात्विक दृष्टीने मान्य करता येईल. दुधाचंच उदाहरण घेतलं तर गाईचं दूध, गाढवीचं दूध (हे तर दूध लहान मुलांच्या मुडदुसासारख्या विकारावर फार गुणकारी असत म्हणे ! अशा सर्व प्रकारच्या दुधात काही घटक समान असले तरी काही बाबतीत फरक असतोच ना ! दुधाच्या या विविध प्रकाराशिवाय गवळ्यांचं बिनपाण्याचं दूध, त्याचच निम्मं पाणी घातलेलं दूध वगैरे अनेक प्रकार सांगता येतील. पिठात पाणी घालून अश्वत्थाम्याच्या आईनं त्याला जे काही प्यायला दिलं होतं तेही बाह्यतः दूधच होतं की !

तात्पर्य एवढंच की, केवळ तात्त्विक चर्चेनं व्यवहार चालत नाही, त्यातले प्रश्न सुटत नाहीत. मग ते प्रश्न साहित्यासंबंधीचे असोत किंवा समाजवादी समाज रचनेचे असोत-दलित साहित्याच्या वेगवेगळेपणावर आक्षेप घेणाऱ्यांनी त्यात साहित्यगुण असले पाहिजेत किंवा कलाकृती म्हणून त्या लिखाणाचं मूल्य करण्याचा अधिकार रसिकांना आहे असं प्रतिपादन करण्यात काही चूक नाही मात्र दलित साहित्य हे शुद्ध निर्मितीचा म्हणजे केवळ कलात्मक आनंद देण्या-साठी जन्माला येत नाही. आणि त्याच्यामागच्या प्रेरणा साहित्यबाह्य असतात असं म्हणून हा प्रश्न निकालात काढता येणार नाही. कारण अशा प्रकारच्या प्रेरणातूनही श्रेष्ठ प्रतीचं साहित्य निर्माण झाल्याचे दाखले वाङ्मयाच्या इति-हासात सर्वत्र आढळतील. सामाजिक आशय असलेले दलित वाङ्मय जो निर्माण करतो त्याच्या भावविश्वात अगणित मुक्या वेदना तडफडत असतात. "आम्हाला वाचा दे––आम्हाला वाचा दे" असं म्हणत त्या त्याची पाठ पुरवतात. अंतरीच्या वेदना आणि संवेदना प्रगट करण्याकरिता तो साहित्याचा आश्रय घेतो. प्रतिभेचं देणं लाभलं असेल तर तो या आविष्काराला कलारूप देऊ शकतो.

हरिभाऊ आपट्यांचंच उदाहरण आपण घेऊ. हरिभाऊ मराठीतले पहिले श्रेष्ठ कादंबरीकार, त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यात पांढरपेशा समाजाचं जे जीवन चित्रित झालं आहे. त्याचा मागमुससुद्धा आज कुठं दिसणार नाही.

असं असूनही त्यांच्या "मी" "पण लक्षात कोण घेतो ?" या कादंबऱ्या आणि 'कर्मयोग" "यशवंतराव खरे" इत्यादि कादंबरीतले काही भाग आजच्या वाचकानासुद्धा शुद्ध कलात्मक आनंद देतात. पण याचा अर्थ हरिभाऊंनी हे लेखन केलं त्यावेळी एक कलाकृती निर्माण करणं एवढाच त्यांचा उद्देश होता असा होत नाही. ज्या पांढरपेशा समाजात हरिभाऊ जन्माला आले आणि वाढले त्यातल्या स्त्री पुरुषांच्या विशेषतः स्त्रियांच्या वाट्याला येणारी अनेक लहान मोठी दुःखं ते बालपणापासून पहात आले होते. त्या दुःखानी या प्रतिभावंताच्या काळजाला घरं पाडली होती. ती दुःख दूर झाली पाहिजेत, क्रूर सामाजिक रुढी नाहीशा झाल्या पाहिजेत असं त्यांना पोटतिडकीनं वाटत होतं. काळजातल्या या करुणेशी त्यांच्या प्रतिभेचा संगम झाला. आणि जिचा अभिमान मराठीने सदैव बाळगावा अशी सामाजिक कादंबरी जन्माला आली.

आजच्या दलित साहित्याशी अगदी जवळचं नातं असलेलं दुसरं एक उदाहरण मुद्दाम इथं देतो. प्रज्ञा किंवा प्रतिभा या गुणांच्या बाबतीत ज्ञानेश्वर-तुकारामाशी संत चोखामेळयाची तुलना करता येणार नाही. पण भेदभाव सर्व अमंगळ असं ज्ञानेश्वर तुकाराम परोपरीनं सांगत असले तरी "ऊस डोंगा परि रस नोहे डोंगा" या चोखामेळ्याच्या अभंगास अंतःकरण हलवून सोडणारी जी आर्तता आहे, ज्या मुक्या दुःखाचे कढ आहेत, काळीज कापीत जाणारी वेदनेची जी धार आहे ती इतर संत वाङ्मयात सारे संत समतेचा पुरस्कार करीत असूनही आढळणार नाही.

असं होण्याचं कारण एकच आहे. बुद्धीने एखादं दुःख जाणणं किंवा सहानुभूतीनं एखाद्या वेदनेशी समरस होण्याचा प्रयत्न करणं हे निराळं आणि ते दुःख रात्रंदिवस भोगणं, ती वेदना सतत जगणं, हे निराळं. अस्पृश्य म्हणून बहिष्कृत जीवन कंठणाऱ्या आपल्या परमदेवताची मूर्ती डोळे भरून पाहण्याची चोरी असलेल्या, हे दुःख उरी बाळगणाऱ्या आणि प्रतिभेच्या किमयेनं ते उत्तम रीतीने व्यक्त सतत करू शकणाऱ्या एका आत्म्याचं दर्शन आपल्याला चोखोबांच्या या अभंगात होते. अजूनही अस्पृश्यावर होत असलेल्या अन्यायांचा आणि अत्याचारांचा विचार मनात आला आणि त्या संदर्भात हा अभंग वाचला म्हणजे मन पिळवटून निघतं. हा अभंग असा आहे,—

ऊस डोंगा परि रस नोहे डोंगा
काय भुललासी वरलिया रंगा

कमान डोंगी परि तीर नाही डोंगा
काय भुललासी वरलिया रंगा
नदी डोंगी परी जळ नोहे डोंगे
काय भुललासी वरलिया रंगे
चोखा डोंगा परि भाव नाहीं डोंगा
काय भुललासी वरलिया रंगा

उस वाकडा दिसला तरी त्याचा रस गोडच असतो ही माणुसकीची कैफियत किती सत्य किती सुंदर आहे. जन्मतःच सारी माणसं सारखीच, त्यात उच्चनीच हा भेद नाहीच, हे अमेरिकेच्या राज्यघटनेतलं प्रमुख सूत्र चोखोबाच्या या एका ओळीत किती काव्यमय रीतीनं प्रकट झालं आहे. आपलं दुर्दैव हेच की, शतकामागून शतकं गेली काळपुरुषाला आमच्या बथ्थड डोक्याना आणि बधीर काळजाना हीच साधी, सरळ गोष्ट पुनः पुन्हा समजावून सांगावी लागत आहे.

या अभंगात जाणवणारी विलक्षण आर्तता कुठून आली ? जन्मभर वाहात राहिलेल्या कवीच्या काळजाच्या जखमेतूनच ना साहित्य हे माणसाच्या मुक्या सुखदुःखाना वाचा फोडण्याचं सर्वोत्कृष्ट साधन आहे. माणूस बोलू लागला, लिहू लागला तेव्हांपासून ते कुशलतेनं वापरीत आला आहे. ज्याचं जळतं त्याला कळतं एवढंच नव्हे तर तोच वेदनेनं विव्हळतो. आक्रोश करतो. धर्माच्या जातीच्या, पोटजातीच्या आणि व्यवसायांच्या जाडजूड भिंती घालून व शतकानुशतके या भिंतीमधल्या बिळात लपून बसून आम्ही आपल्या समाजाचेच तुकडे केले असं नाहीं, तर समग्र जीवनाचा अनुभव घेण्याच्या प्रतिभावंताच्या सामर्थ्याचेही तुकडे तुकडे करून टाकले. या तुकडे पद्धतीमुळे आमचं साहित्य पुष्कळसं एकांगी राहिलं. हरिभाऊ आपटयांची सामाजिक दृष्टी संकुचित नव्हती. त्यांची सहानुभूतीची शक्ती मोठी होती. पण त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यात केवळ त्या काळाकाळातल्या शहरी पांढरपेशांचच चित्रण झालं याचं याचे कारण एकच आहे,––आमच्या सामाजिक जीवनाचे प्राचीन काळापासून झालेले तुकडे तुकडे. हरिभाऊंची प्रतिभा खुरटी नव्हती पण त्यांच्या अनुभूतीचं जग मर्यादीत होतं. ते ज्या बेटावर जन्मले आणि वाढले त्याच्यापापून ब्राह्मणेतर आणि दलित वर्ग यांची बेटं त्याकाळी फार फार दूर होती.

याचा अर्थ उघड आहे. प्रतिभेचं देणं लाभलं असलं तरी, सहानुभूती अस्सल अनुभूतीची जागा घेऊ शकत नाही. संवेदनेचं सहजासहजी वेदनेत रूपांतर होत नाही. परिणामकारक नवनिर्मितीला ही वेदना, हे झपाटले जाणं अत्यंत आवश्यक असतं. वाचकांच्या अंतःकरणाला भिडणाऱ्या साहित्याला जी धार यावी लागते ती एखाद्या दुःखाच्या किंवा समस्येच्या बौद्धिक आकलनातून निर्माण होणार नाही. बनसोडे यांच्या 'मुक्तिसंग्राम' या कादंबरीत दलितातल्या अगदी अलिकडल्या एका संघर्षाचं जे चित्रण आलं आहे ते मराठीतल्या आजच्या अग्रगण्य पांढरपेशा कादंबरीकारालाही करता येणार नाही. त्यासाठी लेखकाची उत्कट अनुभूती आणि ती फुलविणाऱ्या भावना, कल्पना, चिंतन इत्यादी गोष्टी यांची पाळंमुळंच कथावस्तुच्या भूमीत खोल गेलेली असावी लागतात. त्या मुळांना त्या मातीच्या आसवांचा ओलावा लाभावा लागतो. तिच्यात पडलेल्या घामाचा वास यावा लागतो.

म्हणून दलितसमाजातल्या सर्व तरुण लेखकांना मी एवढंच म्हणेन, "दलित साहित्य" असा काही वाङ्मयाचा निराळा प्रकार होऊ शकतो की नाही याविषयी काथ्याकूट करणारांना तो खुशाल करू द्या. तुम्ही तुमचे जळते आणि वाहते अनुभव, तुमची नाना तऱ्हांची सुखदुःखे, तुमच्या साऱ्या आशा–आकांक्षा मुक्त कंठानं सांगायला लागा. निबंधापासून कादंबरीपर्यंत तुम्हाला जमेल त्या वाङ्मय प्रकाराचा स्वीकार करा. तथाकथित वरिष्ठ-वर्गीय भारतीय समाजाला ज्यांची स्वप्नातही कल्पना करता येणार नाही असे दाहक आणि भयानक अनुभव तुमच्यापैकी ज्या प्रतिभावंतापाशी असतील ते त्यांचं सोनं करू शकतील. खेड्यातल्या अस्पृश्य स्त्रीवर होणाऱ्या अत्याचाराला तुमच्यातला जातिवंत कलाकार द्रौपदीवस्त्रहरणाच्या कथेचं बळ प्राप्त करून देईल. मात्र एक आवश्यक लक्षात ठेवा. अनुभव हा साहित्यातला कच्चा माल आहे. तो कलेच्या पातळीवर नेण्याकरिता सतत जागरूक रहावं लागतं संताप कितीही योग्य असला तरी साहित्यात नुसत्या संतापाला अर्थ नाही, त्याला तपाची जोड हवी. साहित्याला मोठेपण मिळतं ते त्यामुळं. कलात्मक पातळीवरून ते आबाल वृद्धांना आवाहन करू शकतं. जातिपातीची आणि भेदभावांची सारी कुंपणं ओलांडून. अजून तुमच्यातला हरिभाऊ आपटे मराठीला मिळायचा आहे. त्याच्याकडे माझ्यांसारख्यांचे डोळे लागून राहिले आहेत.

('आम्ही' दिवाळी अंक, १९७१)

# दलित साहित्य : एक विचार

* शरच्चंद्र मुक्तिबोध

दलित वाङ्मयाची चर्चा अलिकडे बरीच चालली आहे. निरनिराळ्या दृष्टीकोनातून या चळवळीचा विचार करण्यात आलेला आहे. कलात्मक शक्यतांच्या दृष्टिने या चळवळीकडे पाहण्याचा हा एक प्रयत्न आहे.

दलित वाङ्मयाची चळवळ बरी की वाईट, हे ठरविण्यापूर्वी ती एकाएकी का उद्‌भवली असावी ते पाहिले पाहिजे. या प्रश्नाबाबत दलित लेखक आज मोठ्या पोटतिडीकेने लिहित आहेत. पूर्वी त्यांना दलित लेखक म्हटल्याने राग आला असता. आज त्यांची तशी अवस्था नाही. आज ते ही गोष्ट आग्रहाने सांगत आहेत व स्वतःचे वेगळेपणा स्पष्ट करू पाहत आहेत. या चळवळीचे समर्थक स्वतः लेखक, कादंबरीकार व कवी आहेत, प्रतिभावंत आहेत. हे कलावंत आपले वेगळेपण आज आवर्जून का सांगत आहेत? आपल्या दलितपणाचा उच्चार अभिमानाने का कारीत्त आहेत? या घटनेचा अर्थ शोधायचा प्रयत्न अगोदर झाला पाहिजे.

"कायद्याने अस्पृश्यता नष्ट झाली, स्कॉलरशिप मिळू लागल्या, आर्थिक दृष्टया प्रगती झाली व होत आहे, तरीही अस्पृश्यतेच्या नावाने ओरडा करण्यात येतो, याचा अर्थ काय?" असा प्रश्न अनेकजण विचारतात. असा ओरडा वारंवार करण्यामागे काही तरी धूर्त डाव असला पाहिजे, असेही लोकांचे मत दिसते.

या प्रश्नांचा सांगोपांग विचार करणे शक्य येथे नसले तरी थोडक्यात काही ठळक गोष्टी आपणाला सांगता येतील. गेल्या पाच वर्षातील वर्तमानपत्रे नुसती चाळली तरी एक गोष्ट स्पष्ट दिसते. ती ही की, अस्पृश्यतेचा प्रश्न

आपण समजतो तसा संपलेला नाही. अस्पृश्यांवरील अत्याचारांचे प्रमाण खेडे-विभागात वाढले आहे. ग्रामीण विभागात होणारे अत्याचार मुख्यतः भूमि-प्रश्नाशी निगडित आहेत. वरिष्ठ वर्णाचे जमीनमालक व कनिष्ठ वर्णाचे भूमि-हीन शेतकरी यांच्यातील संघर्ष अत्यंत क्रूर स्वरूप धारण करतो. आर्थिक हितसंबंधाच्या जोडीला वर्णश्रेष्ठत्वाचा अभिमान सूडाची भावना अधिक प्रज्वलित करतो व अनन्वित अत्याचार होतात. जाळपोळीच्या व हत्येच्या बातम्या वारंवार कानावर येतात, याचेही हेच कारण आहे या कारणाच्या जोडीला अंधश्रद्धेमुळे व केवळ वर्णश्रेष्ठत्वाच्या गर्वामुळेही अत्याचार होतच आहेत. महाराष्ट्रातील शहरी विभागातील दलित आता काही अंशी सुशिक्षित झालेला आहे. बऱ्याच प्रमाणात तो मध्यमवर्गात दाखल होत आहे. त्यामुळे जुन्या पांढरपेशा वर्गाशी जाणीवेच्या पातळीवर अटळपणे संघर्ष देत आहे. स्कॉलर-शिपा व राखीव जागांमुळेच त्यालाही सुस्थिती आलेली आहे हे खरे. परंतु, या सवलती जुन्या पांढरपेशा वर्गाच्या औदार्यामुळे त्याला मिळाल्या आहेत, असे कोणी समजू नये. राष्ट्रीय चळवळीने व मुख्यतः या वर्गाच्या धुरंधर नेत्यानेच त्याना त्या मिळवून दिल्या आहेत. म्हणजे त्यानी त्या स्वतःच मिळविल्या आहेत. याचा परिणाम व्हायचा तोच होत आहे. या वर्गाची बौद्धिक व सांस्कृतिक क्षमता वाढल्यामुळे व उर्जितावस्थेमुळे त्यांच्या मनुष्य या नात्याने अपेक्षा स्वाभाविकपणे उंचावल्या आहेत. कायदा त्यांच्या बाजूला आहे हे खरे. परंतु कायद्यापेक्षा वेगळी अशी मानवी समानतेची स्वयंपूर्ण वागणूक त्याना हवी आहे. या बाबतीत मात्र समाज त्यांचा दलितपणा विसरण्यास तयार आहे असे म्हणवत नाही. मूळ कारणे आर्थिक असतात हे खरे असले तरी त्यांचा आविष्कार जातीय पातळीवर होत असतो. याचा अर्थ असा नव्हे की सर्वच माणसे जातीय दृष्टीने विचार करणारी असतात. ज्यांच्या मनाला हा विचारही शिवत नाही अशाही शेकडो व्यक्ती असतील व आहेत. परंतु तेवढ्याने सर्व सामान्य वस्तुस्थितीत बदल होतो असे मात्र वाटत नाही. वाढलेल्या व डोळस बनलेल्या संवेदनशीलतेमुळे या वर्गाला आपल्या अस्पृश्यतेचे, म्हणून समाजातील अस्पृश्यतेचे हीन स्वरूप स्वच्छपणे दिसणे अटळ आहे. स्वातंत्र्य मिळून आज तेवीस वर्षे झालेली आहेत. या अवधीत स्वतंत्र भारताच्या नव्या परिस्थितीत वाढलेली फक्त एकच पिढी पुढे आलेली आहे. या पिढीलाच, तिच्यापुढे येणाऱ्या, प्रक्रीयेतच दलित जीवनाचा अर्थ स्वच्छपणे व समग्र सामाजिक अर्थासह प्रतीत व्हावा यात नवल ते कोणते ?

थोडा अधिक विचार केल्यास आणखी एक गोष्ट लक्षात येते. भारतात एकोणिसाव्या शतकात सुरू झालेले सामाजिक प्रबोधनाचे (रेनेझांस) कार्य सामाजिक क्रांतीचे कार्य स्थगित झालेले होते. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या मूल्यानेच समाजजीवनात मध्यवर्ती स्थान पटकावले होते. स्वातंत्र्योत्तर काळात ही प्रक्रिया पुन्हा वेगवेगळ्या पातळ्यांवर सुरू व्हावी यात आश्चर्य नाही. आर्थिकदृष्ट्या गतिमान झाल्यामुळेच हे वर्ग आपोआपच आता स्थगित राहिलेले कार्य स्वतःच हाती घेत आहेत. ही ऐतिहासिक प्रक्रिया अटळ अशीच वाटते. युरोपमध्ये सामाजिक आर्थिक क्रांती अगोदर व मग राजकीय क्रांती असा क्रम होता. तर भारतामध्ये पारतंत्र्यामुळे प्रबोधनाचे कार्य राजकीय स्वातंत्र्यानंतर वेग धारण करीत आहे. भारतीय मार्क्सवादाने आरंभापासून अमूल सामाजिक परिवर्तनाचे चित्र उभे केले खरे, परंतु मुख्यतः भांडवली अर्थरचनेने निर्माण झालेल्या वर्गवैषम्याचे लढेच तेवढे लढविले गेले. या क्षेत्रात अर्थातच् त्यानी थोर कामगिरी बजावली. परंतु ज्या समाजात क्रांती घडवून आणावयाची त्याचे सर्वांगीण स्वरूप कळल्याशिवाय क्रांतीचा विचार फोल ठरतो. भारताचे चातुर्वर्ण्यविशिष्ट स्वरूप मार्क्सवाद्यांनी खऱ्या अर्थाने लक्षात घेतले असावे असे वाटत नाही. तसे झाले असते तर भारतीय परिस्थितीला अनुकूल असा मार्क्सवादाचा सृजनशील असा वेगळा विकास झाला असता. हे सृजनात्मक कार्य टाळल्यामुळे किंवा नकळत टाळले गेल्यामुळे मुख्यतः आर्थिक आघाडीवरच मार्क्सवादाला कार्य करता आले. भारतात मार्क्सवालाला तीन कामे करावयाची होती.—

(१) शेतकरी कामगारांचे आथिक लढे लढविणे.
(२) स्वातंत्र्याच्या चळवळीत इतर वर्गासह सामील होणें.
(३) थातुरमातुरपणे पूर्वी अंमलात आणलेली सामाजिक प्रबोधनाची प्रक्रिया व्यापक सखोल आणि जलद करणे.

या तिन्ही कार्यांना एकाच सुसंगत धोरणाच्या तत्त्वात गोवून टाकून तद्नुसार क्रांतीची साधने सिद्ध करणे हे कार्य भारतीय मार्क्सवादासमोर होते. पैकी पहिले कर्तव्य मार्क्सवाद्यांनी महत्त्वाचे मानले. दुसऱ्याबद्दल (स्वातंत्र्य चळवळीत भाग घेऊनही) त्याना नीटसा निर्णय घेता आला नाही व तिसऱ्या कामाची वैचारिक पातळीवर त्यांची दखलच घेता आली नाही. हे काम अर्थातच सामान्य स्वरूपाचे नव्हते. मार्क्सवाद्यांच्या ठायी अतुल त्याग, थोर बुद्धिमत्ता

वगैरे गुण असुनही त्याचा या कामी उपयोग होण्यासारखा नव्हता. असामान्य सर्वगामी प्रतिभेचीच या कामी गरज होती. कलेच्या क्षेत्रांत तर मार्क्सचा विचार वरवरचा राहिला. पुरोगामी लेखकांचे लक्ष फक्त आर्थिक लढ्यांवर केंद्रित करण्यात मार्क्सवादाने जणू लेखकांना एक विषयच नेमून दिला. आणि त्यामुळे भारतीय तळजीवनाचा वास्तव व स्वयंस्फूर्त उद्‌गार बाहेर येऊ शकला नाही व मोठ्या दर्जाचे पुरोगामी वाङ्मयही तयार होऊ शकले नाही. इतिहासाला गती देण्याऐवजी इतिहासानेच भारतीय मार्क्सवादाला धक्के देत पुढे ढकलले आहे असेच म्हणावे लागेल.

सारांश असा की पूर्वी पुरोगामी लेखकांची चळवळ, महाराष्ट्रापुरते बोलायचे झाल्यास, कलावंतांची स्वतःची स्वयंस्फूर्त अशी चळवळ होऊ शकली नाही, तर आजची दलित वाङ्मयाची चळवळ ही मात्र स्वतः लेखकांनी व कवींनी स्वयंस्फूर्तीने चालविलेली चळवळ आहे, निर्मात्यांची चळवळ आहे, असे म्हणता येऊ शकेल.

दलित लेखकांची जाणीव अन्य वर्गीय लेखकांच्या जाणीवेपेक्षा भिन्न स्वरूपाची आहे असेही दिसते. जाणीवेच्या दृष्टीने कोण कुठे उभे आहे ह्या-दृष्टीने पाहिल्यास या लेखकांची उभे राहण्याची जागा इतर लेखकांपेक्षा भिन्न आहे. त्याचे तारतम्य (प्रीस्पेक्टिव्ह) भिन्न आहे. वर्तमानाशी व भूतकाळाशी त्यांचा संबंध भिन्न आहे. त्यामुळेच आपले आकलन, आपणाला गवसणारा जीवनाचा गर्भितार्थ व आपले दुःख भिन्न आहे असे या लेखकांना वाटते ते बरोबर आहे, यात संशय नाही. जीवनाशी असलेले आपले संबंध असे रेखी-वपणे अनुभवाच्या पातळीवर ज्ञात असणे हे निर्मात्याच्या दृष्टिने फार महत्त्वाचे असते. एवढेच येथे नमूद करतो. त्याचे कलात्मक रूप जाणवणे हा नंतरचा टप्पा आहे.

दलित कलावंताची ही जाणीव संकुचित नव्हे काय? समाजवादाच्या काळात हे प्रतिगामी पाऊल ठरणार नाही काय? असा एक प्रश्न विचारता येणे शक्य आहे. चातुर्वर्ण्य ज्या सरंजामशाहीच्या आधारावर टिकू शकते ती नष्ट झाली आहे. जातीयतेचा असा आधारच निघून गेल्यावर तिचा उच्चार आता पुढील प्रगतीस मारक ठरणारा आहे, असा एक विचार असू शकतो या संदर्भात एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे असे वाटते. भौतिक परिवर्त-

नाची व मनोविश्वांच्या परिवर्तनाची गती सारखीच नसते; भौतिक परिवर्तन झाल्यावर तात्काळ ती जाणीव नष्ट होत नसते. भौतिक परिस्थिती नष्ट झाली तरी तिच्यावर आधारलेली जाणीव अखेरीस टिकू शकत नाही, हे अगदी खरे आहे परंतु ती अगदी हळुहळू व वेगवेगळ्या क्षेत्रात वेगवेगळी रुपे घेऊन व जोरदार लढा देत देतच नष्ट होत असते हे लक्षात घेतले पाहिजे. सरंजामशाही नष्ट झाली असे मान्य केले तरी तिला धरून असलेल्या सरंजामी जाणीवाही तात्काळ नष्ट झाल्या असे म्हणता येणार नाही. शुद्ध मानवतेच्या भूमिकेवरूनही तद्विरुद्ध संघर्ष ही एक आवश्यक बाब आहे, म्हणूनच ही चळवळ प्रबोधनाची चळवळ आहे, असे मी अगोदर म्हटले आहे. या संदर्भात या चळवळीचा एक विशेष नमूद करायला हवा. तो असा की दलित साहित्याच्या चळवळीची जाणीव ही मूल्यगर्भ जाणीव आहे. जातिद्वेष ही आपल्या लेखनाची प्रेरणा नव्हे असे या चळवळीच्या समर्थकांनी वारंवार सांगितलेले आहे. त्यावर अवश्य विश्वास ठेवला पाहिजे, असे मला वाटते. तेव्हां या चळवळीला प्रेरक ठरलेले मूल्य कोणते ? ते एका प्रतिभावंत दलित लेखकाच्याच शब्दांत सांगणे योग्य ठरेल,—

"दलित साहित्य माणसाला केंद्र करते. माणसाला महान मानते. माणसाच्या स्वातंत्र्याचा प्राणपणाने उच्चार करते." (बाबुराव बागूल, अध्यक्षीय भाषण, दुसरे महाराष्ट्र बौद्ध साहित्य संमेलन, महाड) याच भाषणात श्री. बाबुराव बागूल पुढे म्हणतात,—"माणूस हा निसर्गाचा छोटासा आकार आहे. निसर्ग सतत गतिशील आणि सृजनशील असला पाहिजे."

दलित वाङ्मयाची जाणीव अशी मूल्यगर्भ जाणीव आहे. "स्वातंत्र्य" हा दलित वाङ्मयाच्या जाणीवेचा गाभा आहे. तेव्हां दलित वाङ्मयामागील जाणीवा आणि पुरोगामी लेखकांची जाणीव भिन्न मूल्याधिष्ठित नाही, विरोधी नाही हे लक्षात घेतले पाहिजे.

तेव्हा दलित लेखकांची जाणीव (१) अन्य लेखकांपेक्षा भिन्न म्हणून वैशिष्टयपूर्ण अशी आहे. (२) तशीच ती संकुचित जाणीव नसून मूल्यगर्भ जाणीव आहे, या गोष्टी आपण पाहिल्या.

या जाणीवेच्या संदर्भात चालू अतिव्यक्तिवादी कलेच्या जाणीवांचा विचार केला तर काय दिसून येते ?

अतिव्यक्तिवाद खरे तर व्यक्तीच्या विविध गुणवैशिष्टयांच्या पलीकडे जातो. विशिष्ट मनोवस्थांच्या रूपातच तो शिल्लक उरतो. या मनोवस्था असतात एकाकीपणाच्या, अगतिकतेच्या. आदिम प्रेरणा आणि विश्वाचे यांत्रिक नियम यामुळे ही अगतिकता जाणवते. विश्वाची अर्थशून्यता, भयाकुल अस्तित्वानुभव ही या जाणीवेची महत्वाची अंगे आहेत. विश्वात अर्थ असो व नसो परंतु जीवनसंबंधांच्या निरर्थकतेच्या जाणीवेतूनच हे वाङमय उभे राहिले आहे यात शंका नाही. मराठी जीवनातील मध्यमवर्गाच्या विशिष्ट अवस्थेतच अशा प्रकारचे वाङमय पुढे आले आहे. मात्र या ठिकाणी जीवनातील मध्यमवर्गाच्या सीमेच्या एका मताचा कटाक्षाने उल्लेख करावासा वाटतो. 'व्हाट इज लिटरेचर' या पुस्तकात सार्त्रने म्हटले आहे की, अतिव्यक्तिवादाची जाणीवही ऱ्हासकाळातील वर्गाची ऱ्हासशील जाणीव आहे हे खरे. परंतु तिच्याद्वारे एका शाश्वत मानवी अवस्थेचे (ह्यूमन कंडिशन) चे दर्शन घडू शकेल हेही खरे.. असे जेव्हा घडते तेव्हा ती श्रेष्ठ कला ठरते यात संशय नाही. मला हे मत मान्य आहे. परंतु अशा स्थितीत लेखक परिस्थितीचा गर्भितार्थ ओळखणारा तटस्थ निरीक्षकही असावा लागतो. म्हणजे तो तिच्या बाहेर जात असतो, हे लक्षात घ्यावे लागेल. वाङमयीन प्रवाह या नात्याने विचार केला तर सामान्यतः सामाजिकतेचा विरोध या प्रवृत्तीच्या वाङमयात दिसून येतो. या प्रवाहाच्या विरुद्ध दलित वाङमयाची जाणीव दिसते. एक अगतिकतेची तर दुसरी स्वातंत्र्याची. एक वर्गतः प्रगतीच्या सर्व शक्यता गमावून बसलेल्याची, तर दुसरी वर्गतः प्रगतीच्या सर्व शक्यता पुढे असलेल्यांची. दलित वाङमयाची चळवळ या संदर्भात विशेष अर्थपूर्ण वाटते यात शंका नाही. दलित लेखकांची जाणीव खऱ्याखुऱ्या मानवी स्वातंत्र्याचा आविष्कार करू शकल्यास, या जाणीवेद्वारे श्रेष्ठ वाङमयनिर्मिती होण्याची शक्यता मान्य करणे आवश्यक आहे यात शंका नाही.

दलित वाङमयाची जाणीव ही निर्मात्यांची जाणीव आहे हे लक्षात न घेतल्यामुळे पुढील आक्षेप घेण्यात येतो. तो असा,——

दलित वाङमयाचा सवता सुभा स्थापिल्याने काय साधणार आहे? कलेच्या कसोटीत उतरेल ते खरे वाङमय. ते दलित वाङमय नसले तरी श्रेष्ठच. व या कसोटीत न उतरणारे कोणताही वाङमय असो ते निकृष्टच. जेव्हा कलेच्या दृष्टीने पाहता दलित वाङमयाची चळवळ निरर्थक होय.

हा आक्षेप वरवर पाहता बिनतोड वाटतो. परंतु या विशिष्ट संदर्भात तो तसा नाहीं. वरील आक्षेपांत पुढील गोष्टी गृहीत धरल्या आहेत,--

(१) कलेच्या कसोटचा स्थिर असतात;

(२) निर्मात्यांची भाषा व कलेच्या मूल्यमापकांची भाषा एकच असते. हे दोन्ही समज बरोबर नाहीत असे म्हणावेसे वाटते.

"कलेच्या कसोटचा स्थिर असतात, ठराविक कसोटचांवर वाङ्मय पारखून पाहिले की प्रश्न मिटला– 'एवढी साधी ही गोष्ट नाही, कलेच्या कसोटचांचा उच्चार केल्याबरोबर प्रश्न विचारावासा वाटतो--कलेच्या' "कोणत्या कसोटचा ?" "कला" या संज्ञेद्वारे दर्शविल्या जाणाऱ्या गोष्टी इतक्या विविध स्वरूपाच्या, विविध अंगांनी विविध रूपे घेणाऱ्या आहेत व घेत राहण्याची शक्यता आहे की "कला" या संज्ञेच्या निश्चित निर्देशक सांगणे केवळ अशक्य आहे. कला ही संकल्पना अस्थिर व बदलणारी आहे. कलेचे स्वरूप अमर्याद असल्यामुळे तिची निश्चित कसोटी देणे कठीण असते.

कलेच्या इतिहासाकडे पाहिले तर भिन्न भिन्न काळात भिन्न भिन्न निकष असल्याचे आपणास स्पष्ट दिसते. साहित्यशास्त्रांचे, निकर्ष आधुनिक वाङ्मयाला लागू होऊ शकले नाहीत. ते अपुरे पडू लागले. स्वच्छंदतावादी कलेने स्वतःचेच निकष पुढे आणले व स्वच्छंदतावादाच्या अस्तानंतर आता पुन्हा कलेचे निकष भिन्न झालेले दिसत आहेत. ज्या ज्या वेळी नव्या जाणीवेतून नवे वाङ्मय निर्माण झाले त्या त्या वेळी ही कलाच नव्हे, असेही रूढ कलेचे समर्थक म्हणाले. चित्रकलेचा इतिहास या दृष्टीने मोठा उद्बोधक आहे. तेव्हां "कलेच्या कसोटी उतरले म्हणजे झाले" या म्हणण्यामागील समजूत बरोबर नाही हे लक्षात घेतले पाहिजे. तात्त्विक सौंदर्यशास्त्र तर तत्वज्ञानाच्या बदलत्या स्वरूपाबरोबर बदलत असते. मर्ढेकरांचे "लय" तत्व हा कलेचा निकष आहे की कलेची अवश्योपाधी आहे, हा प्रश्न अजून ठरायचा आहे.

लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी की असा आक्षेप घेणे मुळातच चुकीचे आहे. येथे थोडा समजुतीचा घोटाळा दिसतो. दलित वाङ्मयाची जी चळवळ आहे ती दलित लेखकांची वाङ्मय निर्मात्यांची निर्मितीशील कलावंतांची चळवळ आहे, हे लक्षात घेतले पाहिजे. कलेच्या कसोटचांच्या दृष्टीने कलावंत बोलत

नसतात. आपण एक "सुंदर" आकृती निर्माण करणार आहोत अशी कलावंतांची आणि विशेषतः वाङ्मय निर्मात्यांची दृष्टी नसते. आपण आता लयनिष्ठ आकृतीबंध निर्माण करू या असे म्हणून मर्ढेकर कविता लिहायला खासच बसले नसतील. ते आपली जाणीव व तीमुळे निर्माण होणारे विविध अनुभव साकार करण्यासाठीच बसलेले असणार. आपले अनुभव त्यांना कलात्मक पातळीवर जाणवले असतील म्हणजे तरी काय झाले असेल ? तर त्यांचा व्यक्तिसंबंध स्वरूपात जाणवलेले विवक्षित अनुभव व्यक्तिसंबंधता गळून त्याच्या व्यापक गर्भितार्थासह प्रतीत झाले असतील. याचाच अर्थ असा की कलात्मक पातळीवरचा अनुभव म्हणजे रूप घेऊ पाहणारा व्यक्तिनिरपेक्ष असा अधिक विरुद्ध जीवनानुभवच ही जाणीव प्रकट करण्यासाठी मर्ढेकरांना प्रयत्न करावा लागला असेल स्वतःच्या जाणीवांबद्दल निर्मात्यांना तळमळ वाटत असते, मग कलेच्या मान्य कसोटचा कोणत्याही का असेनात. दलित लेखकांची भूमिका ही निर्मात्यांची भूमिका आहे. त्यांना आस्था वाटते ती त्यांच्या स्वतःच्या जाणीवां-बद्दल. या जाणीवा रेखीव व मूल्यगर्भ आहेत. त्यामुळे त्यांना आपले अनुभव विशुद्ध जीवनानुभवाच्या पातळीवर, म्हणजेच कलात्मक पातळीवर आणता येणे अधिक शक्य आहे. कलावंतांच्या संदर्भात कलात्मक पातळीवर आलेला अनुभव रसिकाच्या संदर्भात साकार जीवनानुभव म्हणजेच मानवी अनुभव, बनलेला असतो, सामाजिकाच्या पातळीवर त्याला तो अनुभव आस्वाद्य होतो. खाजगी पातळीवर नव्हे. मुख्य मुद्याकडे वळायचे तर ही निर्मात्यांची चळवळ आहे एवढे लक्षात घेतले पाहिजे. स्वतःच्या जीवनानुभूतीबद्दल आस्था वाटणे हा निर्मात्यांचा धर्मच आहे. ती प्रकट करण्यासाठी म्हणूनच कलावंतांची आयुष्येच्या आयुष्ये नष्ट झालेली आढळतात. जाणीवा जाणीवांचे झगडे उत्पन्न होतात व ते प्राणपणाने लढविले जातात. "सौंदर्य" निर्मिती करणे हेच जर निर्मात्यांचे ध्येय असते तर शतकाशतकांमधून शांतपणे एकाच रांगेत खुर्च्यांवर बसून कवी गुण्यागोविंदाने कविता लिहिण्यात दंग झालेले आढळले असते व चित्रकार अधूनमधून परस्परांकडे स्मितपूर्वक पाहत चित्रे काढण्यात गुंग झालेले दिसले असते. परंतु तसे असत नाही, म्हणून दिसत नाही. जुन्यानव्या जाणीवांचा झगडा असतो, व तो कलेच्या क्षेत्रातही लढविला जात असतो.

तेव्हां दलित लेखक जर आपले म्हणणे उत्कटतेने मांडीत आहेत तर ते त्यांच्या कलाकारांच्या भूमिकेला साजेसेच आहे असे म्हटले पाहिजे.

दलित लेखकांची जाणीव बाह्य जीवनातील व मनोजीवनातील विसंगतीचा प्रत्यय आणून देणारी आहे. मूल्यगर्भ व प्रामाणिक आहे. कोणी सांगावे अस्सल भारतीय जीवनाचे समर्थ चित्र कदाचित त्यामुळे रेखाटले जाऊ शकेल भारतीय मानवतेचा तो एका पातळीवरील उद्गार आहे. पुरोगामित्वाला विरोध करणारी ही जाणीव नसून त्याचाच तो एक स्वतंत्र उन्मेष आहे, असे प्रस्तुत लेखकाला वाटते.

दलित लेखकांवर फार मोठी जबाबदारी आहे असे मी समजतो. काव्य कादंबरी, कथा इत्यादी क्षेत्रात त्यांना स्वतःच्या अनुभूतीची रूपे शोधावी लागतील. अतिव्यक्तिवादी कलारूपापेक्षा ती भिन्न स्वरूपाचीच असणार. आपल्या जाणीवांबाबत दलित लेखक जसे जागरूक आहेत तसेच त्यांना आपल्या काव्य कादंबरी, कथा इत्यादीच्या रुपांबद्दलही जागरूक व्हावे लागेल. तसे न केल्यास अण्णाभाऊ साठे यांच्यावर जसा रंजनप्रधान कादंबऱ्यांचा पगडा बसू लागला होता तसेही होऊ शकेल. रूप आणि आशय हे कलाकृतीत वेगळे नसल्यामुळे अतिव्यक्तिवादी कलात्मक रुपांचा अंतर्रचनेचा स्वीकार ठरेल. यासाठी दलित लेखकांनी नीग्रो वाङ्मयाच्या जोडीला युरोपीय, अमेरिकन व विशेषतः रशियन वास्तववादी वाङ्मय सेवकांचे वाङ्मय आत्मसात करणे योग्य ठरेल असे मला तरी वाटते. आपल्या अनुभवाचा फॉर्म किंवा रूप गवसणे म्हणजेच आपल्या अनुभवाचे स्वरुप अधिक सखोलपणे व रेखीवपणे जाणून घेणे होय. मराठी वाङ्मयातील स्वानुकूल परंपरेबरोबर ही परंपराही दलित लेखकांनी आत्मसात करणे उपकारक ठरेल असा माझा समज आहे. दलित वाङ्मयाच्या द्वारे मराठी वाङ्मयात मोठी भर पडण्याची शक्यता आहे एवढेच येथे नमूद करावेसे वाटते.

**('जीवन आणि साहित्य' या ग्रंथातून)**

# दलित साहित्य हे तर माणसाचे साहित्य

* बाबूराव बागूल

मानवी समाजात मालकी हक्काचा जन्म झाला तेव्हापासून शोषण सत्तेचा दुःख, दैन्य, दास्याचा, दैवधर्माच्या कर्मकांडाचा, स्वर्ग नरकाचा आणि पिळवणुकीच्या पुरस्कार करणाऱ्या अनेक तत्वाचा, संकल्पनाचा सत्तेच्या गरजे-प्रमाणे आविष्कार होऊ लागला व आदिम गणराज्यात्मक संकल्पनांचा क्षय होऊ लागला. शोषण सत्तेला पाहिजे तशी संस्कृतीची व समाजाची रचना होऊ लागली.

एकतंत्री राज्य सत्तेच्या उदयकाळी व गणराज्याच्या अस्तकाळी भगवान बुद्धाचा धम्मोदय झाला. समाजात होणारे संपत्तीचे केंद्रीकरण, सत्ता संपत्तीच्या केंद्रीकरणासाठी उसळणारी युद्धे, यादव्या, त्यामळे होणारी हिंसा, वाढणारी विषमता दुःख, दैन्य, दास्य पाहून महान कारुणिकाने धम्मचक्र फिरविले व दुःख कोठे आहे ते सांगितले आहे. दुःखाच्या निरोधाचे मार्ग सांगितले, शोषणाचा पुरस्कार करणाऱ्या तत्त्वाचा व या तत्त्वाद्वारे घडत असलेल्या सामाजिक व्यवस्थेचा व वैचारिकतेचा धिक्कार केला. पण एकतंत्री शोषण सत्ता कोसळली नाही. सत्ता संपत्तीचे केंद्रीकरण रोखले गेले नाही. गुलामांना स्वातंत्र्य मिळाले नाही. सत्ता संपत्तीचे सामाजिकरण हा विचार सर्वमान्य झाला नाही. युद्धे वाढत गेली दास्य वाढत गेले, सत्ता संपत्ती व शस्त्रे ज्याच्याकडे संख्येने अधिक आहेत ते अधिकाधीक गुलामाचे स्वामी होत गेले. राष्ट्रच्या राष्ट्रे गुलाम होऊ लागली. विषमता वाढू लागली. वर्णाचा वर्गाचा, पुरस्कार करणारी तत्त्वे समाज व विचार व्यवस्थेचे दृढीकरण करू लागले. विषमतेच्या आगीत सर्व समाज होरपळू लागला. फक्त भगवान बुद्धाच्या संघात सामाजिक लोकशाही नांदत होती. समुद्रात अनेक नद्या मिळाव्या तसे अनेक वर्णाचे आणि अनेक वर्गाचे लोक संघात येऊन एकरूप होत होते. सामाजिक लोकशाहीचे, समता, शांतीचे सुख अनुभवित जगत होते.

शोषणसत्तेचे एक स्वाभाविक वैशिष्टच असते. ती तीला उपकारक होईल तीच अवस्था, ती तत्त्वे जिवंत ठेवीत असते वाढवीत असते. जे विघातक वाटते ती तत्त्वे, मते ती नष्ट अथवा भ्रष्ट करते. विषमता, अस्पृश्यता शोषण-सत्तेला पाहिजे होती. म्हणून तिने ती टिकविली. वाढविली. आणि तशीच संस्कृतीची आणि विचाराची रचना केली. परंतु विषमतेचा, अस्पृश्यतेचा पुरस्कार न करणाऱ्या तत्त्वांचा एकतर नष्ट केले अथवा भ्रष्ट केले आणि वाढू दिले नाही. राज्यसत्तेला अनात्मवाद, तिच्या वर्गीय हिताचे संरक्षण न करणारा वाटतो तो मान्य केला की परमात्म्याचा व त्याच्या पावित्र्याच्या, त्या पावित्र्याचे प्रतिनिधि असलेल्या धर्मसत्तेचा, दंडसत्तेचा विलय आपोआप होतो. श्रेष्ठ कनिष्ठातील धर्मरेषाच ही तत्त्वे पुसून टाकतात. देवाने दिलेली विषमताच लुप्त होऊन गेलेली असते. अशा वेळी कोणालाही गुण-कर्तृत्वाच्या जोरावर पुढे जाता येते. हे एकतंत्री राज्यसत्तेला मृत्यु, एवढेच अप्रिय असते. परंतु गणराज्य सत्तेत मात्र अनात्मवाद वनीश्वरवाद जीवना एवढाच प्रिय असतो. कारण तो तिला स्वाभाविक असतो.

बुद्धधर्म शोषणसत्तेचा, विषमतापूर्ण समाजाचा स्वाभावसिद्ध धर्म होवू शकत नाही. बुद्धधर्माची तत्त्वे शोषणसत्तेच्या विषमतेच्या विरोधात स्वाभाविक-पणे आहेत म्हणून एकतंत्री राज्यसत्तेच्या विस्तार काळात तो फक्त मार्ग-दर्शकच होऊ शकत होता, एक आदर्शच राहू शकत होता. त्या आदर्शाकडे त्या प्रकाशाकडे पाहून एक एक व्यक्ती किंवा काही व्यक्ती अथवा व्यक्तीचा समूह आकर्षित होऊ शकत होता तसेच होत होते. व एक एक येऊन संघात सामील होत होता. शोषित, शोषक, शासक समाजातील भिक्षू होत होते वर्ण, वर्णविहीन समाजाचे सुखीजीवन संघात अनुभवित होते. बहुजन कल्याण, बहुजन हित साधीत होते. बुद्धाचा संघ हे वाळवंटातील ओयासीस होते. तो संपूर्ण समाज, ते संपूर्णयुग शोषणसत्तेचा पुरस्कार करणारे होते म्हणून बुद्ध-धर्माची तत्त्वे ही सामाजिक व्यवस्था निर्माण करणारी व तशीच मानसिकता निर्माण करणारी होऊ नयेत असेच शोषणसत्तेला वाटत होते. म्हणून सर्व पातळ्यावरून शतकानुशतके बुद्ध धर्माशी सतत संघर्ष चाललेला होता. शोषण सत्ता जेव्हां कळसास पोहोचली तेव्हां विषमता आणि अस्पृश्यताही पक्की झाली. येवढे की, अंत्यजापैकी बोधिसत्व म्हणून जातक कथांचा नायक कोणीही होऊ शकला नाही. जातककथांचे जेवढ्या संख्येने ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व पशु-पक्षी नायक आहेत त्या मानाने त्यावेळच्या उपेक्षित समाजातील नायक नाहीत

याचे कारण सुविधा उपेक्षितांना समाजात राहिली नव्हती. म्हणजे अस्पृश्यतेची कल्पना अनेक संकल्पनाशी पक्की जखडलेली होती व सर्व सत्तानी आणि शक्तींनी अस्पृश्यता एक स्वाभाविकता म्हणून स्वीकारलेली होती.

सत्ता, संपत्ती व सामाजिक वर्चस्व समाजातील दुसऱ्या वर्णाकडे जाऊ नये म्हणून व दुसऱ्यावर लादलेले दैन्य, दास्य व दुःख कनिष्ठत्व मानलेल्या वर्णाकडे जाऊ नये म्हणून वर्ण व जात जन्माधारित करण्यात आली. जन्माला पूर्वकर्माचा, पूर्व पापपुण्यांचा व ईश्वरीय न्याय बुद्धीचा अतूट आधार देऊन टाकला. त्यामुळे वर्ण व जात अपरिवर्तनीय झाले. हे मालकी हक्काचे अतिशय कुटील कौशल्य पूर्ण असे रूप आहे. यामुळे समाज भीषण विषमतेने तुकडे तुकडे होऊन विभागला गेला. हे तुकडे तुकडे वरिष्ठ वर्णीयांना त्यांच्या वर्गीय स्वार्थासाठी हवे होते. एका बाजूला सुख, संपत्ती, सत्ता देवधर्माचे प्रियत्व प्रतिनिधित्व बहाल केलेले लोक तर दुसरीकडे देव धर्माने निषेधनीय ठरविलेले लोक ज्यांच्याकडे दुःख दैन्य, दास्य व शूद्रत्व चिरंजीव होवून आलेले. या लोकांना उद्धाराचे मुक्ततेचे सर्व मार्ग व साधने व ईश्वरीय इच्छेच्या नावाने नाकारलेले आहे. त्यामुळे सामाजिक उत्पादनाच्या प्रक्रियेतून ते दूर ठेवले गेले.

सामाजिक उत्पादन साधने व त्यांचे स्वामी या दोहोंमध्ये बदल झाले की वर्ग बदलतात व समाज पुढे जातो. व समाजात वर्गीय बदल होतात. परंतु हे बदलही सामाजिक उत्पादन क्रियेचा विकास न झाल्याने होऊ शकले नाही.

ज्यांना पूजनीयत्व व देवत्व मिळाले आहे, अशानीच पाप पुण्य, पुनर्जन्म दैववाद, नियतीवाद, नशीब इत्यादि भाकडकथा सांगून या भाकडकथांना पूजनियत्व प्राप्त करून दिलेले आहे. यामुळे अन्याय, अत्याचार करणारा, दुःख दैन्य देणारा वर्ग व समाजव्यवस्था अदृश्य करून जो दिसत नाही असा परमेश्वर पुढे करण्यात आला त्यामुळे पिळवणूक करणाऱ्याचा सुगावा पिळल्या गेलेल्याना लागला नाही. म्हणून दलितांनी त्यांच्या दुःखाविरुद्ध सामुदायिक उठाव केल्याचे दाखले दिसत नाही, ते दिसू नये अशी रचना केलेली आहे. भारतीय जीवनात सामुदायिक जीवनाचा निषेध केलेला आहे. मोक्ष एकटचाने करून घ्यावा असेच प्रमेय मांडलेले आहे.

माणसाचे शरीरच दुःखाचे मूळ आहे. शरीर नसते तर दुःख नसते दुर्दैव नसते. माणूस मेला की दुःख मरते दुर्दैव मरते म्हणून जिवंतपणच

दुःखदायक, जिवंतपणं म्हणजे वासना विकाराचे चलनवलन. तेच नष्ट करून टाकावे असा प्रचार, म्हणजे सामाजिक जाणिवा, सामुदायिक जाणिवेतून येणारा बंधुभाव, क्रोध, प्रतिकार आपोआप नष्ट होत सामान्य माणसाला कुठल्याही पातळीवरून त्याच्या दुःखाची त्याच्या वास्तवाची त्याला दुःख देणारे कोण आहेत याची जाणीव होऊ नये म्हणून हिंदू सामंतशाहीने सर्व पातळयावर काम केलेले आहे याचबरोबर सैन्य, शिपाई, तुरुंग व स्मृतीही वापरल्या आहेत. व या सर्वांनी धार्मिकत्वही दिलेले आहे. यावरून असा निष्कर्ष काढता येईल की या युगायुगांच्या इतिहासात एखाद्या सत्तेला जर वाटले असते तर तिने या वैचारिक व सामाजिक रचनेच्या विरोधाला असणारे मत वाढू दिले असते जगू दिले असते, जेव्हां शासन सत्तेने अनात्मवाद, अनीश्वरवाद, बुद्धीप्रामाण्यवाद, गतिवाद, वाढवू दिला तेव्हां बुद्धधर्म फोफावला. पण जेव्हां शोषण सत्तेला तो नकोसा वाटला तेव्हां तिने शस्त्रांनी व भ्रष्टाचारानी नष्ट करून टाकला. म्हणून दोष केवळ एका जातीचा नाही तर हिंदू सामंतशाहीचा आहे. तिने रचलेल्या व्यवस्थेचा आहे ती समग्र व्यवस्थाच, ती युगेच राजेशाहीची युगे होती. पावित्र्याची दैवी अवतारी पावित्र्याच्या, मांगल्याच्या, स्वर्गीयत्वाच्या दैवी, अवतारी व अपौरुषत्वाच्या संकल्पनाना जन्म देणारी व वाढविणारी ती युगे होती. सर्व प्रेषितांचे जन्म आणि धर्माचे जन्म या युगाने दिलेले आहेत.

हिंदू धर्माने देव करून देवळात बसविले आणि पुज्यनीयत्व हे वीर पुरुष सत्तेसाठी लढलेले आहेत. त्यांची युद्धे त्या युद्धाची कथानके पवित्र ग्रंथ म्हणून पूज्यनीय झालेले आहेत, अनेक सणवारीही या वेळोवेळी झालेल्या युद्धाशी संबंधित आहेत. जे या सत्ता प्राप्तीच्या युद्धात पराभूत झाले त्या त्या सत्ताधाऱ्याचे राक्षसीकरण केलेले आहे व विजयी वीराचे उदात्तीकरण झालेले आहे. सूड, द्वेष, मत्सर, वैर तिरस्कार, अहंकार या हिंसक प्रवृत्तींना आदर्श म्हणून स्थान आहे. या सर्वांना सांस्कृतिक महत्त्व आहे. यावरून हिंदु संस्कृतीत युद्धाचे अग्रस्थान आहे. सत्ता आणि सामर्थ्य दुसऱ्या वर्णाकडे व पंथाकडे गेली तेव्हां व समझोता झाला तेव्हां वेगळे आदर्श समाजापुढे आले. हा क्रम वाढत गेला असता तर सीता शूर्पनखेची विटंबना करणारा, खांडववन जाळणारा पवित्र ग्रंथात, देवळात बसला नसता. आदर्श (मिथ्स्) झाला नसता. परंतु सत्ता सामर्थ्य, ब्राह्मण, क्षत्रिय, या वर्णाकडेच राहिल्यामुळेच त्यांनी सत्ता स्थापणारे देव झाले. नायक झाले. त्यांना हवी तशीच सामाजिक व्यवस्था बनत गेली.

म्हणून पौराणिकता व मानसिकता वर्णानुकूल राहिली व साहित्य रचना या आदर्शानुसार होत गेली. तुच्छता, मत्सर, अहंकार ही विषमतेची अपत्ये आदर्शवत राहिली. परंतु करुणा, प्रेम, बंधुभाव, समता इत्यादी आदर्शांना साहित्य आणि समाजात प्राथमिकता व महत्ता आली नाही.

जिजस ख्रिस्ताने परमेश्वर मानला. त्याचे स्वर्गाचे राज्य मानले. स्वतःला परमेश्वराचे परम प्रिय पुत्र मानले. आदाम इव्हने पाप केले, म्हणून त्यांना स्वर्गातून हाकलले. स्त्री पुरुष संबंध हे पाप आहे असे मानले. परंतु जिजसच्या सांगितल्याप्रमाणे वागल्यास म्हणजे प्रेम, करुणा, बंधुभाव, समता, त्याग, सहनशीलता इत्यादी सद्‌भावनानें जीवन व्यतीत केल्यास स्वर्गातील परमेश्वराचे प्रेम संपादन करता येते. पश्चात्ताप प्रार्थना याद्वारेही परमेश्वराचे प्रेम प्राप्त होते. ख्रिश्चन समाज व संस्कृती–साहित्य या तत्वांवर उभे असल्याचे गरीब श्रीमंत, रंकराव हे भेद असूनही दुःखी दुर्दैवी जनविभागाला धर्मात व साहित्यात स्थान मिळाले. या उलट हिंदू धार्मिक व ललित साहित्यात शूद्र अति शूद्रांना स्थान मिळाले नाही. कारण पूजनियत्व, अपौरुषयत्व प्राप्त झालेल्या देवांनी व ग्रंथानी शूद्र अतिशूद्र या गरीब दुबळचांच्याविरुद्ध शत्रुत्वपूर्ण प्रचार केलेला आहे. ईश्वरच आणि ईश्वरीय पुस्तके जर द्वेष, मत्सराचा, तिरस्काराचा, अहंकाराचा प्रचार करतात तर त्यांना म्हणजे शूद्र अति शूद्रांना समाजात व साहित्यात स्थान कसे मिळणार ? म्हणून बंधुभाव, समता, स्वातंत्र्य बुद्धी-प्रामाण्यवाद व आजचे लोकशाही समाजवाद इत्यादींना भारतीय हिंदू समाजात व साहित्यात पौराणिकता नाही. आधार नाही. आदर्श नाही. संत साहित्य-देखील साहयभूत नाही. परंतु वंशवादाला, विकृतीकरणाला व फॅसिझमला भरपूर वाव आहे.

ज सत्तेवर होते व ज्यांनी हिंदुधर्माची रचना करण्यासाठी तत्त्वे दिली, मते दिली, युद्धे केली त्यानाच संस्कृत भाषेतील ललित व धार्मिक साहित्याचे नायकत्व मिळाले. तेच देवळातले देव झाले. हे आपण पाहिले त्यांचीच जिवने साहित्याचे विषय झाले. पण ज्यांना धर्मदंड सत्तेने निषेध नियम ठरविलेले होते त्याच्यापैकी कोणीही नायक अपनायक वा देवी झालेला नाही. म्हणजे संस्कृत ललित व धार्मिक साहित्य धर्मदंडसत्तेशी प्रतिबद्ध होते. वरिष्ठ वर्णातील राजा महाराजांची देवत्व प्राप्त झालेल्यांची स्तुती, प्रशस्ती करीत हे साहित्य संख्या-त्मक दृष्टीने वाढत आलेले आहे. या दोन वर्णाशिवाय एक दोन अपवाद वगळले

तर दुसरे वर्ण साहित्यात आलेले आठवत नाही. सत्ता, संपत्ती व शिक्षण या वरिष्ठ वर्गाकडेच असल्यामुळे साहित्य स्मृतीच्या परिघा बाहेर गेलेले नाही. म्हणून ते एकसूरी आहेत. त्याची वर्णव्यवस्थेशी प्रतिबद्धता पाहून ते दलित साहित्याची पौराणिकता व पूर्ण परंपरा होऊ शकत नाही.

इस्लामी आक्रमण भारतावर आदळू लागले. इस्लामी सत्तेच्या विजयाच्या व हिंदूसत्तेच्या अस्ताच्या संक्रमण काळास संत साहित्य उदयास आले. कोसळल्या हिंदुसत्तेला व वर्णव्यवस्थेला सावरून धरण्याचे व इस्लामी धर्माचे प्रसरण रोखण्याचे काम संतसाहित्याकडून झाले. वर्णाच्या वैचारिकतेचा प्रसार झाला.

या अंदाधुंदीच्या हिंदुसत्ताच्या अधःपतनाच्या व मुसलमानी संतांच्या उगवत्या काळात समाजाच्या वेगवेगळ्या थरातून शूद्र अति शूद्रातून, स्त्री-वर्गातून प्रवक्ते उगवू लागले. हिंदू सत्तेचे दमणयंत्र मुस्लीम आक्रमणाच्या आघाताने निकामी झाले नसते तर हा चमत्कार शूद्र अतिशूद्रातून प्रवक्ते कलावंत, बुद्धिवंत येण्याचा चमत्कार घडला नसता. हिंदू सत्तेचे दमणयंत्र खिळखिळे झाल्यामुळे अल्पकाळ का होईना समाज सृजनक्षम झाला.

पुढे इस्लामी सत्ता स्थिर झाल्या. मांडलीक होऊन अथवा स्वतंत्र राहून हिंदू सत्ता सावरल्या गेल्या वर्णव्यवस्था पुन्हा दमणक्षम झाल्या. इस्लाम संतानीं शोषण यंत्रणेस उपयुक्त असलेली हिंदू समाजव्यवस्था पाहून तिला जशीच्या तशी ठेवण्याचे ठरविले. यामुळे समाजाची सृजनक्षमता ब्रिटीशसत्ता येईपर्यंत करपून गेली. तसे पाहिले तर संत साहित्य संक्रमण काळातले आहे. शतकाच्या युद्धकाळाची त्याला पार्श्वभूमी आहे. या काळाची वाङ्मय रचना कशी असायला हवी होती ?

युद्धकाळात जन्मलेले संत साहित्य पूर्णपणे वर्णव्यवस्थेशी, तिने निर्माण केलेले वैचारिक व वाङ्मयी आदर्शाशीच बांधलेले राहिले. या संस्कृत साहित्याने रुढ केलेल्या संकल्पना, सिद्धान्त व नायक आणि पिळवणुकीचा पुरस्कार करणारी तत्त्वे संत साहित्याने जशीच्या तशी स्विकारली व प्रकट केली शोषण व्यवस्था, वर्ण यामुळे अधिक बळकट झाली. जातीप्रथा आणि तिची मानसिकता इस्लाम समाजानेही आत्मसात केली. संताची भवती ती सामाजिक समता खपवू शकली नाही. त्यानी केलेली समीक्षा आदर्श होऊन, पौराणिकता होऊन

समाजापुढे येऊ शकली नाहीं. भक्तिमार्ग सर्वत्र पसरला पण भक्तांच्या टोळ्या जातीजातीतच अडकून राहिल्या, कर्मवाद, पुनर्जन्मवाद, दैववाद आणि "अनंते ठेविले तैसेची रहावे" ही प्रवृत्ती सार्वत्रिक झाली. हिंदुसामंतशाहीला अशीच वैचारिक व सामाजिकव्यवस्था हवी होती. व ती तशी राहिली.

ब्रिटिश आले आणि हिंदु इस्लाम सत्तांचा पूर्ण पराभव करून भारताचे सत्ताधारी झाले. तसेच नवे ज्ञान-विज्ञान यंत्र-यंत्रे, उद्योग आणि व्यवसाय इथे प्रस्थापित झाले. आणि समाजाच्या उत्पादन पद्धतीत बदल येऊ लागल्यामुळे सामाजिक चौकट खिळखिळी झाली. नवी वैचारिकता स्वीकारण्यास जागा रिकामी झाली. त्यामुळे युरोप-अमेरिकेतील वैचारिक जागृतीचे प्रकाश किरण इकडे येऊ लागले. आणि आत्मसमीक्षेचे विचार इथे उभे राहू लागले. या आत्मटीकेच्या विचारातून व ललित साहित्याच्या अभ्यासातून आधुनिक ललित साहित्याचा अवतार होऊ लागला. पहिल्या प्रथम आध्यात्मिक, पारलौकिक, धार्मिक विषयाऐवजी सामाजिक विषय आकारबद्ध, शब्दबद्ध होऊ लागला.

जे पूर्वीपासून धर्मामुळे समाजाच्या अग्रभागी होते, अर्थसत्ता, धर्मसत्ता व दंडसत्ता ज्यांच्या हातात होती, तेच उच्चवर्णीय आपले कौटुंबिक प्रश्न येऊन सामाजिक चळवळीचे जसे पुढारी होते तसेच लेखक, कवी म्हणूनही पुढे येत होते. व्यासपिठावर त्यांचेच कौटुंबिक प्रश्न चर्चिले जात होते. या साध्या चर्चेसाठीही हिंदुधर्माची समीक्षा करणे भाग पडत होते. शेकडो वर्षांनंतर ही समीक्षा अवतीर्ण झाली होती. ती जरी सुधारणा मागत होती तरी त्यातून समाजाची मानसिक प्रगती होत होती.

शेकडो वर्षांनंतर साहित्याच्या विषय होऊन स्त्री येऊ लागली. बाल-विधवा, बाल-विवाहिका, सासुरवाशीण अशी एकत्र हिंदु कुटुंबात चिरडली जाणारी स्त्री ची विविध रूपे साहित्यात प्रगट होऊ लागली. नवे ज्ञानविज्ञान, नवे धंदे-व्यवसाय, व नवे वाङमयीन, वैचारिक आदर्श समाजापुढे आल्यामुळे स्त्री जीवन चित्रित करण्याचे धाडस लेखकानां करता आले.

स्त्री पाठोपाठ तिच्या प्रमाणेच उपेक्षित असलेला शूद्र अतिशूद्र हा विचाराचा विषय व्हायला काही अडचण उरली नव्हती. पेशवाई नव्हती केवढे तरी बलाढ्य साम्राज्य सर्व शक्तीनिशी उदारमतवादाचा पुरस्कार करीत

होते. केवळ शासनसत्ता नव्हेच तर चळवळीही पाठीशी उभ्या होत्या. स्त्रीला साहित्यात स्थान दिले म्हणून शंबूकाप्रमाणे साहित्यिकांचा शिरच्छेद ब्राह्मणांच्या कागाळ्या येऊन राज्यकर्त्यांने केलेला नव्हता उलट कायद्याचा पाठींबाच होता आणि नवे उद्योगधंदे व हुद्दे प्राप्त झाल्यामुळे ब्राह्मणवर्गामध्ये फूट पडलेली होती. सुधारणावादी ब्राह्मण आणि पुरामतवादी ब्राह्मण असा संघर्ष इतिहासात पहिल्यांदाच उद्भवला होता. आता स्त्री च्या पाठोपाठ शुद्राला अडचण नव्हती. एवढेच नाहींतर इंग्रजी वाङ्मयात शूद्र अति शूद्राप्रमाणे असलेल्या गरीब दुबळ्याची चरित्रेही नाव्हेलात आलेली होती. इतकी अनुकूलता असूनही शूद्र अति शूद्रांना साहित्यात प्रवेश मिळाला नाही. असे का? हे लेखक कलावादी होते? त्यांना प्रबोधन नको होते? दैन्य, दास्य, दुःख, दुर्दैव मांडण्याचे शब्द सामर्थ्य त्यांच्या ठायी नव्हते?

ते असमर्थ होते असे म्हणता येणार नाही. त्यांना सामाजिक सुधारणा हवी होती. प्रबोधनही हवे होते. परंतु त्यांना शुद्र अति शुद्र दिसले नाही व त्यांनी ते साहित्यात मांडले नाहीत याचे कारण त्यांचे संस्कार, त्यांचे मन, आणि त्याची पौराणिकता हे होय.

इंग्रजी लेखकांना गरीब दुबळे लोक दिसले त्याला कारण ते येसु ख्रिस्ताला दिसले होते. तो परमेश्वराचा पवित्र पुत्र असूनही त्यांनी गरीब दुबळ्यांना अपवित्र मानले नव्हते. तुच्छ मानले नव्हते. पापाची संकल्पना त्यांनी स्वीकारली होती. पण पाप-पुण्याची वाटणी जन्मावर, जातीवर आधारित नव्हती. गरीबासाठी प्रेम व करुणा देण्यासाठी त्याने आपले दोन्ही बाहू दिशात पसरले होते. परमेश्वराच्या पुत्राने येशु ख्रिस्ताने गरीब दुबळे जवळ केले म्हणून ख्रिश्चन धर्माला, ख्रिश्चन संस्थानाला ख्रिश्चन समाजाला ते जवळचे वाटले. म्हणून बुद्धिवंतांना आणि कलावंतानां ते जवळचे वाटले. हा आदर्श, ही पौराणिकता ख्रिश्तानी साहित्याला होती. म्हणून प्रेमातून, करुणा क्रोधातून क्रांतिकारक उठावानाही जिजस ख्रिस्तांची प्रेरणा मिळत होती.

हिंदू लेखकाना शूद्र अति शूद्र दिसले नाही त्याचे कारण हिंदूच्या नायकांना, परमेश्वरत्व प्राप्त झालेल्यांना व अपौरुषेयत्व प्राप्त झालेल्या पवित्र पुस्तकानाच ते कधी दिसले नव्हते. असंख्य अवतार झाले, संत आले परंतु शूद्र अति शूद्र व स्त्रियांचे दुख कोणाला दिसले नाही. देव, संत आणि धर्म जर गरीब दुबळ्याबद्दल शत्रुता आणि तुच्छता प्रकट करतात तर हिंदु पौराणिक-

तेत, संस्कारात शूद्रांना कसले स्थान असणार? म्हणून समाजात व मनात कुठून जागा असणार? हिंदूच्या वर्णव्यवस्थेत करुणेचा, प्रेमाला, मातृभावाला समाजात व साहित्यात स्थान नव्हते म्हणून त्यांच्या उद्धाराचे मार्गहि कोणालाच सुचले नव्हते. कोणीही त्यांच्यामध्ये जाऊन त्यांना अंगीकारले नव्हते. तसेच शिकविले नव्हते. संघटीत केले नव्हते. लढ्यास उठविले नव्हते त्यांना लढ्यास उठविणे म्हणजे कर्मवादाचा पुनर्जन्माचा आणि पिळवणुकीचा पुरस्कार करणाऱ्या विचार व्यवस्थेचा व समाज व्यवस्थेचा निःपात करणे. हे शक्यच नव्हते म्हणून सर्वांनी वर्णव्यवस्थेच्या गरजेतून आलेल्या तत्वाचा व पौराणिकतेचा प्रचार व पुरस्कार केला आहे.

परंतु बुद्ध धर्म लोकांचे मन घडविणे एवढा प्रभावशाली राहिला असता तर भारतीय पौराणिकतेमध्ये प्रेम करुणेला महत्त्वाचे स्थान असते. ख्रिश्चन धर्माप्रमाणेच शाळा, आश्रय, दवाखाने व गरीब दुबळ्यांची सेवा करणाऱ्या अनेक धार्मिक संस्था ठायीठायी अस्तित्वात असत्या. या सर्वांच्याद्वारे मानवतेचे अनंत आदर्श समाजापुढे आले असते. एवढेच नव्हे तर अनात्मवाद, अनिश्वर-वाद, बुद्धिप्रमाणवाद, व गतिवाद अनेक शास्त्राना व सामाजिक उत्पादनाच्या साधनांचा सतत विकास करण्याला साह्यभूत झाला असता. सामाजिक उत्पाद-नाची साधने नुसती विकसित झाली तरी सामाजिक रचनेत बदल होतात. सामाजिक उत्पादकाचे मालक बदलले की समाजात क्रांतिकारक बदल होतात हे बदल केवळ सामाजिकच बदल करतात असे नाही. तर ज्ञान-विज्ञानाच्या क्षेत्रातही अनेक नवी संशोधने आणून परिवर्तने घडवितात. भारतीय वैद्यक रसायन, व्याकरण कायदा व तत्वज्ञान यांच्याकडे तशीच कलेमध्ये बौद्धधर्माने प्रचंड भर टाकलेली आहे.

भगवान बुद्धाचा जन्मधर्म गती, प्रगती व क्रांतीवादी आहे. अनात्मवाद स्थितीशिलतेचा तो पुरस्कर्ता होऊ शकत नाही. ईश्वर व आत्मवाद मात्र होऊ शकतो. बुद्धाचे तत्वज्ञान त्याच्या मूलभूत सिद्धान्तावर समाजाला लोक-शाहीकडे घेऊन गेले असते. अन् लोकशाही जेव्हां मानसिकता होते तेव्हां आर्थिक विषमता असली तरी, सत्ता धनवंताच्या हातात असली तरी सामान्य माणूस अस्पृश्य, उपेक्षित, तुच्छ, तिरस्कृत असत नाही, तो विचाराचा विषय होऊ शकतो.

बौद्ध धर्मात तो तसा झाला होता म्हणून थेर, थेरी, गाथामध्ये त्या-वेळच्या उपेक्षितांना स्थान मिळाले आहे. तात्पर्य हे की जशी पौराणिकता असेल तशी मानसिकता असते व कला साहित्यही तसेच तयार होते.

जेव्हां इंग्रजी साहित्याच्या अनुकरणाने आधुनिक साहित्य अवतारत होते. तेव्हां शासनसत्तेचा आशय बदललेला होता. पाप पुण्य कर्म पावित्र्य, आत्मा आणि जन्म म्हणजे काय, अस्पृश्यतेच्या पाठीशी शोषण व शतुत्व कसे आहे हे दाखविण्याची शक्ती असलेले तत्वज्ञान शासन व उत्पादनाच्या साधनातून प्रकट होणाऱ्या ज्ञानाच्या जोरावर ते स्पष्ट करू शकले असते. महात्मा फुले यांनी मूलभूत विचाराचे धन समाजापुढे ठेवले होते. त्यांचे कार्य, त्यांचे विचार घेऊन बुद्धीवादी वर्गाला लोकशाहीकडे सामाजिक चळवळी करून जाता आले असते. पण असे कांही झाले नाही, याचे कारण आपला बुद्धीवादी वर्ग प्रस्थापित व्यवस्थेला, विचाराशी पूर्णपणे बांधलेला असतो. कारण तो त्या वर्गाचा पुत्र आणि प्रति-निधी असतो. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी विचारलेल्या एका प्रश्नात आपल्या बुद्धीवादी वर्गाचे वर्गीय स्वरूप स्पष्ट झाले आहे. त्यांनी विचारले आहे, "ब्राह्मणाची ज्ञानाची परंपरा इतकी प्रदीर्घ असून एकही व्हाल्टियर का दिला नाही ?"

व्हाल्टियर होण्यासाठी धर्मसत्तेविरुद्ध उभे रहावे लागते. ते इथल्या ब्राह्मणांना आणि बुद्धीजीवी वर्गाला शक्यच नव्हते. कारण धर्म आणि सत्ता पिळवणुकीचा पुरस्कार करणारी सर्व व्यवस्था त्याने व त्याच्यासाठी निर्माण केलेली आहे. लेखकही त्याच वर्णातून येत असल्यामुळे त्याचे लेखन मनुस्मृतीच्या कक्षेतील असण्याचे कारणही तेच आहे.

राष्ट्रीय प्रबोधनाच्या वेळी वर्णव्यवस्थेला आव्हाने देत हिंदू समाजाच्य जाती-जातीतून जागृती उठू लागली आणि केवळ इथला ब्राह्मण टिकेचा विषय होऊ लागला. खरे म्हणजे ब्राह्मण आणि क्षत्रिय हाही अन्यायकारक व्यवस्था रचणारा आणि सांभाळणारा होता. एकाच्या हातात शासनसत्ता होती. दुसऱ्याच्या हातात धर्मसत्ता होती. इथल्या बुद्धीवादी वर्गाने या जाती-जातीतून उठणाऱ्या सामाजिक चळवळीचे पुढारीपण करायला पाहिजे होते या सामाजिक चळवळींना लोकशाहीचा, आशय द्यायला पाहिजे होता आर्थिक राजकीय विचार घेऊन ती सामाजिक चळवळ राष्ट्रीय विमोचनाची क्रांती-

कारक चळवळ करायला पाहिजे होती. परंतु इथल्या बुद्धिवादी वर्गाने म्हणजेच राष्ट्रीय पुढाऱ्यांनी राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीला फूट पाडली. राजकीय चळवळीविरुद्ध सामाजिक चळवळ असे या प्रबोधनाचे दोन भाग करून त्यांना युद्धाच्या छावणीचे स्वरूप दिले. सामाजिक चळवळ करणारे शेतीसंबंधी विचार मांडणारे ब्रिटिशांचे हस्तक, देशद्रोही ठरवून टाकले.

राष्ट्रीय चळवळीलाही क्रांतीकारक लढ्याचे स्वरूप न देता ऐतिहासिक, पौराणिक काळाचे, पूर्वज पूजेचे स्वरूप दिले. खरे म्हणजे गतकाळातील, युद्धांचे व त्यातील वीरांचे पूजन करण्याचे काही कारण नव्हते. गतकाळामध्ये सामान्य माणूस आणि स्त्री गुलाम होते. त्या काळाचा आणि सामान्य माणसाचा काही ऋणानुबंध नव्हता. बैठ-बिगार करणारा, चिरडला जाणारा, युद्धात, यादव्यात आणि पेंढाऱ्याच्या पुंडाईत उध्वस्त होणारा हे त्याचे त्या युगातील पददलित स्थान होते. त्याला अस्तित्व या युगात प्राप्त झाले. सामाजिक उत्पादनाच्या प्रक्रियेतील त्याच्या स्थानामुळे विज्ञानामुळे त्याचे स्थान निर्णायक व महत्त्वाचे ठरले. त्याच्या संख्याबळानी लोकशाही तत्त्वज्ञानाने संघर्षात त्याला नेतृत्व बहाल केले. भूतकाळात जे जातीन, वर्णाने, वंशाने मोठे मानले जात होते, तेच अग्रपुजेचे मानकरी होते. पण यंत्रयुगाने व त्याच्या ज्ञान विज्ञानाने पारडे बदलून टाकले. जे वर होते ते खाली गेले. आणि समाजाचे लोकशाही स्वरूप ज्यांना नको होते व जे सामाजिक विषमतेचा पुरस्कार करीत होते त्यांनी इतिहास, पुराणाचे, व गतकाळाचे उदात्तीकरण काव्य नाटकाद्वारे सुरू केले. कारण पौराणिक व ऐतिहासिककाळी ते सर्व श्रेष्ठ होते. जेते होते, नेते होते, तो काळ त्यांचा म्हणून त्याचा आणि पूर्वज पुजेची आठवण इथल्या बुद्धी-बादी वर्गाला होत होती. शूद्र अति शूद्रांचे दुःख दैन्य, दास सांगणारे वर्ण व्यवस्थेवर आघात करणारे, सामाजिक, आर्थिक राजकीय पूर्नरचना मागणारे फुले, आगरकर, गोखले, रानडे यांना शत्रू ठरवून शत्रूवर करावेत तसे चौफेर हल्ले त्यांच्यावर करीत होते.

त्यामध्ये त्यांना यश आले. भारतीय स्वातंत्र्याचा लढा एकांगी करण्यात यशस्वी झाले. बाकीचे लढे दुय्यम ठरविण्यात त्यांना यश आले.

या उलट युरोपमध्ये घडले. नवे विचार, नवी संशोधने, नवे ज्ञान विज्ञान व नवी उत्पादन साधने प्रस्थापित करण्यासाठी ते धर्म-दंडसत्तेशी लढले.

त्यांनी मरण, देहदंड स्वीकारले व जनलढे, जनजीवन पुढे नेले. हा फरक कां दिसतो? तिथला बुद्धिजीवी वर्ग जाती व्यवस्थेतून जन्माचा, धर्माचा खास अधिकार, आशिर्वाद घेऊन श्रेष्ठ म्हणून येत नाहीं. धर्मानें त्याला सत्तेत समाजात व संपत्ती संपादन करण्यात अग्रहक्क दिलेला नाही. तो स्वतःच्या गुणकर्तृत्वाने पुढे येवू शकतो. पण अिथल्या बुद्धिजीवी वर्गाला भूतकाळ प्रिय असतो. देव झालेल्या, परमेश्वर झालेला, वीर झालेला त्याचा पूर्वज असतो. वर्तमानकाळ यंत्रयुगामुळे, ज्ञान-विज्ञानामुळे भूतकाळातील त्यांचे नेमके मूल्य देतो. अन् श्रमणाऱ्याला अग्रस्थान देतो. हा वर्तमानकाळ त्याच्या क्रांती व क्रांतीवत्तेसह स्विकारणे इथल्या वर्णीय बुद्धिवाद्यांना नको असतो.

त्यांना सत्ता, सामर्थ्य देणारी ही नवीं ज्ञान-विज्ञान, त्यांची उत्पादनसाधने हवी असतात. पण ह्या युगाची क्रांतीवत्ता नको असते. त्यांना समाजवादी व्यवस्था नको असते. वर्णव्यवस्था हवी असते. सुधारणा चालते. एक दोघांना अथवा काहींना खालून वर जावू देण्यासाठी ते वैदिक काळाचा आधार पुढे करतील. पण सम्यक् परिवर्तन-वर्ग-वर्ण उच्चाटन, जाती निर्मूलनसमता स्थापून त्यांना नको असते.

म्हणून त्यांनी सम्यक् परिवर्तनामध्ये विकसित होणारे सामाजिक लोक-शाहीचे लढे रोखले. एकाकी पाडले आणि पारंपारिकतेचा रंग देऊन स्वातंत्र्य लढयाला आपल्या वर्णाकूल वर्गानुकूल केले.

या सामाजिक अवस्थेतून, या वैचारिकतेतून स्वातंत्र्य संघर्ष काळातले अर्वाचीन साहित्य निर्माण झाले. अपवाद आहेत.

जेव्हां राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा म्हणजे सामाजिक, राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक परिवर्तनाचा लढा होऊ दिला जात नव्हता. तेव्हा डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा सामाजिक क्रांतीचा लोकशाहीचा संघर्ष उभा राहिला. जीवना-चाच तो अपरिहार्य आविष्कार होता. पण आधीच्या सामाजिक लढयाचे भवितव्य ह्या लढयाचे भवितव्य ठरणार होते. तो राष्ट्रीय होऊ दिला जाणार नव्हता. एकाकी उभे राहिले. राहणारच होते. कारण दुःख त्यांनी साक्षात अनुभवलेले होते. जगले होते. म्हणून ते हवानल झाले होते. महान करुणेने महान संतापाने, करुणा आणि क्रोध जेव्हां एक होतो तेव्हां क्रांतीचा अवतार होतो व युगाचा आरंभ होतो.

बाबासाहेब बोलू लागले. लढू लागले. अन् अनेक चिरंजीव धाराशयी होऊ लागले. जे कधी रडलेही नव्हते, लढलेही नव्हते ते दिनदुर्बळ, दुर्दैवी आपल्या डोक्यावरचे डोंगर भराभर भिरकावून देऊन युद्धाला उभे राहिले. कुठेय शत्रु ..... असे ललकारू लागले.

शत्रूने अवघे भारतीयत्व व्यापून टाकलेले होते. तो रितीरिवाजात होता. तो रचनेत, व्यवस्थेत, पुस्तकात, शब्दात आणि मनातही होता. आणि मित्रांचा तर राष्ट्रीय लढ्यात पराभव होत होता. कम्युनिस्ट, सोशलिस्टांचे राष्ट्रीय लढ्याला श्रमिक मध्यवर्तीत्व देण्याचे प्रयत्न अपयेशी ठरले होते. सरंजामशाहीने आणि भांडवलशाहीने स्वातंत्र्य लढ्याला आपल्या हातात ठेवले होते. मानवेंद्र-नाथ रॉयसह सर्व क्रांतीकारक बाजूलाच सारले गेले होते.

अशा वेळी शेकडो वर्षानंतर पहिल्या प्रथम शुद्र अतिशुद्र उपनायक म्हणून आला. पण तो आंबेडकरी विचार बोलत नव्हता. बोलू शकतही नव्हता. कारण राष्ट्रीय चळवळीनेच वर्णवाद नाकारलेला नव्हता. सर्व समाजच जातीत होता. बुद्धिजीवी वर्ग हा धर्माशी संबंधीत होता. भांडवलदार वर्ग हा क्रांतीचे नेतृत्व करू शकत नव्हता. तो सरंमजामदार वर्गाचा निकटवर्ती होता. बुद्धिजीवी वर्ग याच प्रस्थापित वर्गातून आलेला असल्यामुळे त्याची पौराणिकता, वैचारिकता व मानसिकता प्रस्थापित वर्गाशी जखडलेली असते. वर्णाचे व जातीचे एक वैशिष्टच असते. एक गरीब असला दुसरा अतिश्रीमंत असला तरी या दोहोत वर्ण हा वर्गजाणिव निर्माण होऊ देत नाही. त्याचप्रमाणे हिंदु तत्त्व-ज्ञानातील संकल्पना दैव इत्यादी ही वर्गजाणिव दुबळे करीत असतात यामुळे आंबेडकरी विचाराचा नायक म्हणजे विज्ञानवादी विद्रोही नायक हिंदु, लेखकाना झेपवत नाही. पण कर्ण एकलव्याप्रमाणे असणारा नायक त्यांच्या संस्काराशी आणि पौराणिकतेशी सुसंगत असतो.

वर्ण व्यवस्थेला शरण गेलेला पण वर्णव्यवस्थेत योग्य ते स्थान न मिळाल्यामुळे कर्ण एकलव्याप्रमाणे जन्म एक दुःख आहे असे मानणारा शूरवीर पण धर्म प्रतिकुलतेमुळे (दैव नियतीचे खेळणे बनलेला). नायक खूप दुःख, खूप नाट्य, खूप रसात्मकता व समरप्रसंग देत असतो. या नाटकाद्वारे नियतीचे तत्त्वज्ञान म्हणजे वर्गीय समाजात जगण्यासाठी स्विकारलेली धर्मशरणता प्रकट करता येते. जन्म हे दुःख आहे हे वाचकाला पटवून देता येते. त्याला पटतेही

नायकाचे चरित्र चित्रण वाचकाला पूणःप्रत्ययाचा आनंद देत असते. ही कलाकृती हिंदु पौराणिकता व मानसिकताच व्यक्त करीत असते. या आदर्शाला अनुसरून जे साहित्य निर्माण होते त्याचा परिवेष जरी आधुनिक असला तरी ते पारंपारिक असते.

फुले, आंबेडकरवादी नायक अथवा विषय वा विचार ज्यांचा पिंड हिंदु संस्कारांनी घडलेला आहे त्या लेखकाना रुचतच नाही. ते जिवंत शब्दबद्ध करण्याचे सामर्थ्य त्यांच्याठायी नसते परंतु मार्क्सवादी लेखकानांही हिंदु पौराणिकतेशी व मानसिकतेशी जडलेले नायक निवडलेले आहे. खरे म्हणजे फुले, आंबेडकरी नायक हा जात धर्म, धर्माधिष्ठीत अर्थ व समाजव्यवस्था नाकारीत असतो. आणि सहजपणे लोकशाही समाजवाद स्विकारीत असतो. विषमतेचा तो कट्टर विरोधक असल्यामुळे विषमतापूर्ण समाज रचनेतून आलेल्या विभूती अवतार, पुरुषोत्तम इत्यादी संकल्पनांना त्याचा स्वाभाविक विरोध असतो. ही समाजवादी लोकशाहीवादीवृत्ती फुले, आंबेडकरी, विचारातून आपोआप प्राप्त होते. असा नायक मार्क्सवादी लेखकांना आकर्षित करू शकतो. परंतु स्वातंत्र्य पूर्वकाळात ती आकलन झाली नाही. हे सत्य आहे. ते वर्णवादी आहेत हे त्याचे कारण खरे नाही पण संस्कार व वर्णीय मर्यादा किती प्रबळ असतात हे मात्र त्यातून स्पष्ट होते. दलित साहित्याचा विचार प्रगतिशील क्रांतीदर्शी व सामाजिक बांधिलकी मानणाऱ्या लेखकांना का सुचला याची कारण परंपरा ही अशी आहे.

भारतीय सामाजिक सुधारणेच्या चळवळीचा इतिहास हा स्वातंत्र्य लढयाच्या इतिहासापेक्षा मोठा आहे. स्वातंत्र्य मिळाले. पण अनेक सामाजिक प्रश्न मात्र अजूनही सुटलेले नाहीत. देशाने लोकशाही स्वीकारली आहे. आणि घटनेने अस्पृश्यता नाकारून हजारो वर्षाची धार्मिक व सामाजिक रचना व्यर्थ ठरविली आहे. घटनेने हिंदु धर्मावर मात केलेली आहे. तरी अस्पृश्यता आहे. विषमता आहे. येवढेच नव्हे भारतात लोकशाही आहे तशी वर्णव्यवस्थाही आहे. भिमस्मृती आहे तशी मनुस्मृतीही आहे भारत एकाच वेळी विसाव्या शतकात आणि मध्ययुगात, एकाचवेळी दोन समाज दोन जीवनपद्धतीत आणि दोन व्यवस्थात जगतो आहे.

देश आणि देशवासीय अशा द्विधा स्थितीत असण्याचे कारण काय? लोकशाही असताना जातिभेद कसा काय? लोकशाही आणि जातीव्यवस्था

एकत्र जगू शकत नाहीं. त्या परस्परविरोधी शक्ती असतात. वर्णव्यवस्था अथवा जातीव्यवस्था असल्यावर लोकशाही अव्यंग आहे असे म्हणता येणार नाही. परंतु भारतात लोकशाही आहे व वर्णव्यवस्था आहे. याचा अर्थ भारतीय लोकशाही औपचारिक लोकशाही आहे. भांडवलशाही लोकशाही आहे. भांडवलशाही लोकशाही आर्थिक विषमता जशी सांभाळते तशीच धार्मिक, वांशिक, विषमतेच्या विरोधी नसते. अस्पृश्यता असल्याने व जातीच्या नावाने लोकसमूहाचे वाटोळे होत राहिले तरी भांडवलशाही लोकशाहीला खेद वाटत नाही. ती कायदे करते. पण ते तात्काळ अंमलात आणण्याचे नसतात. अस्पृश्यता असल्याने आणि त्यात अनेक व्यक्तिमत्त्वाचा होम होत असल्याने भांडवलशाहीचे काहीही नुकसान होत नसते. अन् भारतीय भांडवलशाही ही काही एक सामाजिक गरजेतून, विकारातून उत्पादनसाधनाच्या मालकीत्वाच्या संघर्षातून उदयाला आली नाही तर तिला ज्ञान-विज्ञानासाठी दिलेल्या लढ्याचा इतिहास नाही तर ज्या वर्गाला धर्माने सत्ता संपत्ती धारण करण्याचा खास हक्क दिला होता त्यांनीच संचिताच्या आधारे यंत्रे विकत घेऊन कारखाने काढले, वाढवले, नफे केले, यंत्रांबरोबर त्यानी त्याचे स्वाभाविक पुढारीपण केले नाही. उलट कामगार वर्ग, समाज, जातिभेदात धर्मभेदात दुभंगलेला असेल तर वर्गीय लढा संघटित होण्यास, वर्गीय समाज उभा राहण्यास अडथळे येतात. म्हणून भांडवलशाहीस समाजात धर्माने विभागलेला हवा होता.

स्वातंत्र्यानंतर भांडवलशाहीचा पुष्कळ विकास झालेला आहे. लहान सहान युद्धे जिंकण्याची क्षमता तिच्याठायी आलेली आहे. पण सामाजिक विषमता त्या गतीने कमी झाली नाही. उलट गरिबी, श्रीमंत प्रचंड प्रमाणात वाढलेले आहे.

भांडवलशाहीच्या आर्थिक विकासाने सामाजिक प्रश्न सुटतात असे नाही उलट भांडवलशाहीच्या विकासाने युद्धाचा, वसाहतवादाचा आणि फॅसिझमचा अवतार होतो हा इतिहास आहे. सर्वाधिक युद्धे भांडवलशाहीनेच जीवनावर लादलेली आहेत. वसाहती जिंकण्यासाठी बाजारपेठा मिळविण्यासाठी व विरोधी लढे व तत्त्वज्ञान नष्ट करण्यासाठी. म्हणजे नफ्यावर आधारलेला आर्थिक विकास सामाजिक प्रश्न सोडवतो असे नाही.

पण केवळ सामाजिक चळवळीनेही अस्पृश्यतेचा प्रश्न सुटलेला नाही. अस्पृश्यता अजून टिकून आहे. म्हणून दलित साहित्य आपल्या सामाजिक

जाणिवा व्यक्त करताना अर्थकारण कसे असावे, राजकारण कसे असावे, सत्ता कशी असावी, समाजरचना कशी असावी या प्रश्नांचा आणि त्याच्या तत्त्वज्ञानाचाही विचार करते, कारण दलितांचे जीवन या सर्व प्रश्नांशी निगडीत आहे.

साहित्याने येवढा व्यापक विचार करावा काय? ज्यांनी सामाजिक बांधिलकी स्वीकारली आहे, दलित समाजाचे प्रवक्तेपण स्वीकारले आहे त्या साहित्याने दलित साहित्याने येवढा व्यापक विचार करणे जरूरच आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे दलित साहित्याचे पुराणपुरुष आहेत, आदर्श आहेत. दलित साहित्याची ते पौराणिकता आणि अस्मिता आहेत. मिथ्स आहेत. त्यांनी ह्या सर्व प्रश्नांचा विचार केला आहे. त्यासाठी आंदोलने केली आहेत. भारतीय लोकशाहीला आदर्श देण्यासाठी त्यांनी अनात्मवादी, अनीश्वरवादी गतिवादी व माणसाला केंद्रवर्तित्व देणाऱ्या बुद्धधर्माची पुनः स्थापना केली आहे. जमिनीचे आणि उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयीकरण करावे हे त्यांनी सांगितले. जीवनाच्या सर्व प्रश्नांसंबंधी त्यांनी आपले विचार मांडले आणि त्यासाठी चळवळी केल्या आहेत.

म्हणून जे प्रश्न दलितजनांचे आहेत ते प्रश्न दलित साहित्याचेही आहेत. सामान्यजनांशी दलितजनाशी एकरूप झालेले हे साहित्य म्हणून प्रस्थापितांच्या विरोधी आहे. प्रस्थापितांच्या विरोधी असल्यामुळे ते डावे आहे. म्हणून भारताच्या भवितव्याला आकार देणारेही आहे.

भारतामध्ये वर्णाधिष्ठित हिंदुधर्म सर्व धर्मात मोठा धर्म आहे. बौद्ध धर्माचा लोप झाल्यामुळे भारतीय समाजावर संस्कृतीवर आणि म्हणून जनमानसावर हिंदु धर्माचा सर्वाधिक प्रभाव आहे. भारतातील बहुसंख्य जनता हिंदु धर्माचेच अनुसरण करते पोथी पुराणातील अन् वेद उपनिषदातील अनेक स्वीकारते पुराणांनी, पोथ्यांनी ज्यांना देव अथवा राक्षस मानले आहे त्यांना देव म्हणून पूजा व राक्षस म्हणून तिरस्कार करते निषेध करते.

भारतात हिंदु बहुसंख्य आहेत. म्हणून शासनयंत्रणा आणि राष्ट्राच्या आर्थिक, सांस्कृतिक नसनाड्या हिंदुंच्याच हातात आहेत. भारतातील मुसलमान जनता देवधर्म, पूजा प्रार्थना वेगळी करत असली तरी त्यांची मानसिकता

हिंदुचीच आहे. आणि परमेश्वर, आत्मा, स्वर्ग, नरकाच्या, पापपुण्याच्या कल्पना सारख्याच असल्यामूळे भारतातील इतर धर्म या अर्थाने हिंदुधर्माचे बंधूधर्मच आहेत. म्हणून हिंदु, अहिंदुची मनोधारणा सारखीच आहे. म्हणून साहित्य रचना जवळजवळ सारखीच आहे. हिंदु मानसिकता पौराणिकता प्रभावी आहे.

म्हणून आजच्या युगाच्या तत्त्वज्ञानाला समता, स्वातंत्र्य, बंधुभाव म्हणजे लोकशाही समाजवादाला भारतीय मानसिकतेत, पौराणिकतेत आधार नाही. संत साहित्यही पुरेसा आदर्श देत नाही पण फॅसिझमला, वर्ण अथवा व्यक्ति-वर्चस्वाला, पुरुषोत्तमत्वाला, अहंकार तिरस्काराला, द्वेषमत्सराला भरपूर वाङमयीन व वैचारिक आधार आहे.

लोकशाही समाजवाद, ज्ञानविज्ञान ज्याचे पंचप्राण आहेत, आजचे क्रांतीमग्न वर्तमान युग ज्याचे सारसर्वस्व आहे त्या दलित साहित्याला ही पूर्वपरंपरा स्वीकाराहार्यही वाटत नाही. दलित साहित्याची प्रेरणा क्रांतीदर्शी साहित्यात आहे, जे साहित्य माणसाला नायकत्व देते आणि समाजवादाचा पुरस्कार करते ते साहित्य दलित साहित्याचा आदर्श आहे.

माणूस मूलतः दलित, उपेक्षित अथवा अस्पृश्य नसतो, त्याला ह्या अवनत अवस्थेला व्यवस्था पोहचवते. ती बदलून टाकली म्हणजे माणूस फक्त माणूस होतो. आणि म्हणून त्याचे चरित्र चित्रण करणारे साहित्यही दलित साहित्य नसते हे ठावे असूनही एक प्रभावी धारा आपल्या लेखनाला दलित साहित्य म्हणवून घेते. हे म्हणणे हाच मुळी उद्देश आहे. कारण वर्णाधिष्ठित समाजाने आणि त्याच्या साहित्याचे दलित म्हणजे हीन, तुच्छ, तिरस्कृत, गत-जन्माचा पापी, आणि इहलोकी दुःखी दरिद्री अपमानीत ज्याला काही इतिहास नाही. ज्याच्या पूर्वजाना देवळात अथवा ग्रंथात पूजनीयत्व मिळाले नाही. असा मानलेला आहे. भारतीय समाजाचे हे सारे दुःख, दैन्य, दास्य, अपमान अवहेलना, तुच्छता, तिरस्कार दलित साहित्याने शिरावर धारण केले आहेत. बुद्धाने जसे दुःख स्वीकारले. अनेक क्रांतिकाराने दलितपण, स्वीकारले तसे दलित साहित्याने दलितत्व स्वीकारले आहे. स्वप्नरंजन प्रस्थापिताचे चित्रण, त्यांचे जे जे काही आहे ते कितीही सुंदर (सत्तेमुळे) दिसत असले तरी त्यांनी स्त्री शूद्रांना गुलाम केले, अस्पृश्यत्व दिले, हे विसरता येत नाही. सामाजिक क्रांतित्व बनलेले, मित्थ्य बनलेले, आदर्श बनलेले, आणि दलितांच्या पौराणिकता

झालेले डॉ. बाबासाहेब आंबेडकर त्यांना महार मानीत होते. म्हणून ते दलितांचे नेते झाले नाहीं तर दुःख, अस्पृश्यता, जातीभेद नष्ट करण्यासाठी ते दलितांचे नेते झाले. ते पूर्वकर्माला, पूर्वपापाला म्हणून जन्माला, जातीला, वर्णाला आणि वर्गाला बळकट करणाऱ्या वैचारिकतेला मानत होते. म्हणून ते दलित झाले होते असे नाहीं. ते महान क्रांतीकारक योद्धे होते. महापंडीत होते तरी त्यांनी स्वतःला दलित अस्पृश्य म्हणवून घेतले. त्यांची जी कारणपरंपरा आहे. त्याचमुळे जागतिक श्रेष्ठ साहित्यामध्ये ज्यांचे लेखन स्थापन मिळविल असे लेखक आजचे आणि उद्याचेही स्वतःला दलित साहित्यिक म्हणवून घेत आहेत.

भारतातील प्रस्थापित साहित्य हे हिंदु साहित्य आहे हे आणि सम्यक् परिवर्तन करू शकणारी विज्ञान आणि समाजवाद सहजपणे स्वीकारू शकणारी भारतातील क्रांतीकारक ताकद दलित समाजच आहे. दलित हे विशेषण सम्यक् क्रांतीचे नांव आहे. क्रांतीचा साक्षात्कार आहे.

**('सिंहगर्जना,' दिवाळी अंक, १९७५)**

# भारतीय क्रांती आणि दलित साहित्य

* शशिकांत गावसकर

'मी ठामपणे बजावतो की, दुनिया दलितांच्या बाहुंवर आधारलेली आहे शेष नागाच्या मस्तकावर नव्हे म्हणून ह्या दलितांच्या जीवनाचे चित्रण प्रांजळपणे आणि आस्थेने मी करीत आलो आहे आणि करीत राहीन.'

वरील उद्‌गार आहेत अण्णाभाऊ साठ्यांचे. १९६०–६१ सालच्या पहिल्या महाराष्ट्र बौद्ध साहित्य सम्मेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलतांनाचे.

साहित्यातून फसफसणारा हा उद्रेक केवळ नीतिमूल्यांची शिकवण देणाऱ्या सत्व कहाण्या नव्हत्या. दलित जनतेच्या आर्थिक सामाजिक क्लेशांशी साहित्याचा ऋणानुबंध सांधण्याची ही जाणीव म्हणजे साक्षात्कार नव्हता. ख्रिस्तपूर्व ८०० ते ४०० वर्षापासूनच्या उपनिषदांची परंपरा सांगत परब्रम्हाच्या आत्म्याचा शोध घेणाऱ्या सवर्णांच्या 'साहित्य मंदिरातून' खोबऱ्याची वाटी पळवणारे 'फकिरा' म्हणजे अवतारी पुरुष नव्हते.

ज्यांच्या सावलीने देव विटाळती, ज्यांच्या संसर्गाने हवा दूषित होते. ज्यांच्या तहानने पाणी विषारी बनते (?) अशी माणसं चाबकाचा मार खात, दंडाच्या विळख्यात सरत धर्म थोतांडाच्या विखारी आणि रानटी भावनांना आहुती पडत होते. ह्या सामाजिक चित्रणांची कात्रणे वेशीवर चिटकविण्याचे काम भावनेने भारावलेल्या असंतोषाने पेटलेल्या, क्रोधाने तापलेल्या लेखण्यांनाच पेलणारे होते कारण ज्या भूमीत ते उमगले ते भूमी चातुर्वर्णियांची होती. ज्या वातावरणात ते वाढले ते वेशींबाहेरचे होते. पद्धतशीर कप्प्याकप्प्यात विभाजित समाजाच्या थयथयाटाला आपल्या छातीवर सहन करीत आल्याने हृदयाची स्पंदन हरवलेल्या समाजाला लांछनास्पद ठरलेल्या ह्या वर्णाचे दलितांचे ते जीवनकाव्य होते.

दुसऱ्या दलित साहित्य संमेलनात अध्यक्ष बाबुराव बागुल बोलले, "मानवाची महत्ता आणि म्हणून त्याच्या मुक्तीची घोषणा करणारे हे साहित्य आहे. इतिहासाची ही एक आवश्यकता आहे म्हणून दलित साहित्याने आपले अलग नांव धारण केले आहे."

दलित साहित्यिकांनी, दलितांविषयी लिहिलेल्या या साहित्याने साहित्याचा विषय बदलला, मांडणी बदलली, आशय बदलला. या साहित्यातून बदलत्या सामाजिक परिस्थितीचे महत्वाचे पैलू प्रतिबिंबित झाले. साहित्य हे साहित्य निर्मितीसाठी असावे की, साहित्य हे मानवाच्या करमणुकीसाठी असावे हे दोन्ही प्रश्न दलित साहित्याने मोडित काढलेत. 'कर्तव्यनिष्ठ' दृष्टिकोनातून साहित्याकडून पाहाण्याचा दृष्टिकोन त्याने धुडकावून लावला, साहित्यांची भाषा हमल्याची बोली ठरली. दलित साहित्याची जनमान्यता दलित पँथरच्या झेपेने स्पष्ट झाली. परंतु त्याचबरोबर दलित साहित्यातील विरोधाभासाच्या सोयीस्कर घटकांचा (मानवतावादाचा) राजकीय भांडवल म्हणून उपयोग करून त्याला राजमान्यता सुद्धा लाभली, हे विसरता कामा नये.

मनुष्याला केंद्रबिंदु मानून, मानवाच्या स्वातंत्र्याची घोषणा देणाऱ्या, गतिशील आणि सृजनशील निसर्गावर भिस्त असणाऱ्या (मानव निसर्गाचाच घटक आहे एवढे पुरेसे नसले तरी जरूरी आहे.) दलित साहित्यातील आणि त्या अनुषंगाने दलित चळवळीत उतरलेला हा विरोधाभास हा भारतीय समाजरचनेतील अंतर्गत प्रवाहाच्या आणि स्थित्यंतरांच्या गुंतागुंतीत गुंफलेला आहे. ह्याच विरोधाभासाची उकल न झाल्याचा परिणाम म्हणून दलित साहित्य मुख्यत्वे ग्रामीण दलितांच्या-(खासकरून महार-मांग) जीवनातील आकांताला वाचा फोडणारे, शहरी संवेदनशील बुद्धिशील तरुण दलितांच्या मनोभावनांचा आविष्कार बनून राहिले आहे. दलित साहित्याचा सामाजिक पाया सामाजिक विरोधाभासांच्या प्रक्रियेने नव्या आर्थिक संबंधात (मोल-मजुरी शोषणाच्या संबंधात) गुंतत चालला आहे. संक्रमण अवस्थेत असलेल्या ह्या पायावर आधारलेले साहित्य "मानवाची महत्ता आणि मुक्ती" यासाठी एक-बाजूला आदर्श दिव्यत्ववादाशी परंपरा राखते आणि दुसऱ्या बाजूला भौतिक-वादी समाज विज्ञान त्याला आकर्षित करते. ह्या भौतिकवादी समाजविज्ञाना-तील 'मानवकेंद्रित क्रांतिवाद' आत्मसात करण्याचा दलित साहित्याने प्रयत्न केला आहे. थोडक्यात धम्मचक्र परिवर्तनाशी नाते तोडता येत नाही आणि

समाजपरिवर्तनाच्या सिद्धांताशी संबंध कसा जोडावा हे समजत नाही. म्हणून दलित साहित्याने ह्या दोहांना थोडे थोडे (किंवा समप्रमाणात) सामावून सुवर्णमध्य सांधण्याची तडजोड स्वीकारली आहे. दलित साहित्यातील हे रंग म्हणजे दलित साहित्यिकांवर आजच्या सामाजिक परिस्थितीचे, सामाजिक संघर्षाचे उमटलेले पडसाद आहेत.

दलित साहित्याविषयी बोलतांना असे नेहमी म्हटले जाते की, हिंदू धर्मकांडाला विरोध करणाऱ्या बुद्धाशी आणि मानवकेंद्रित (! ! ) क्रांतिकारी मार्क्सवादाशी त्याचे सारखेच नाते आहे. ह्यातच दलित साहित्यातील विरोधाभास दडलेला आहे. ह्याचाच क्रांतिकारी चळवळीतील, कामगारवर्गीय राजकीय चळवळीत आणि असलेल्या उणिवा आणि कमतरता परावर्तीत होत आहेत.

भारतीय क्रांतीच्या संदर्भात महत्त्वाचा आणि गंभीर असलेला प्रश्न म्हणजेच ग्रामीण श्रमिक जनतेचा प्रश्न होय. (आर्थिक राजकीय भाषेत शेती मालकीसंबंधी प्रश्न) ब्रिटिश साम्राज्यशाहीने बंदिस्त असमानतेला सुरंग लावला गतीशून्य, आत्मसंतुष्ट जीवनाला विस्कळीत केले. जमिनीचे मालकी हक्क भांडवलदारी केले. पिक आल्यावर देण्यात येणाऱ्या 'नजराण्या' ऐवजी पीक येण्याअगोदर 'शेतसारा' भरण्याची पद्धती चालू केली. पारंपारीक जोखडाच्या भरीला पैशाच्या बंधनांनी घट्ट बांधली गेल्याने पूर्वीची 'वेशीबाहेरची' जनता देशोधडीला लागली. सांथीत, दुष्काळात किड्या-मुंग्यासारखी मरू लागली.

भारतात झालेली उत्पादन संबंधाची लागवड पूर्वीच्या सरंजामी पद्धतीच्या उत्पादनसंबंधाना उध्वस्त करून झाली नाही. उलटपक्षी पूर्वीचे उत्पादन संबंध भांडवलदारी उत्पादनपद्धतीत सामावून घेण्यांत आले. श्रमिकांचे शोषण झाल्यामुळे ह्यामुळे दुहेरी झालेच परंतु भांडवलशाहीच्या प्रसारामुळे उपजीविकेची भ्रांत पडू लागली.

भारतीय भांडवलशाही १८ व्या शतकातील युरोपियन भांडवलशाहीसारखी भांडवलाचे प्रसरण मोठ्या प्रमाणात करू शकत नाही. म्हणून पारंपारिक जोखडातून ग्रामीण श्रमिक जनतेची 'मुक्ति' करू शकत नाही. शेती आणि ग्रामीण धंद्यावरील भार वाढत राहिला. उपजीविकेच्या मार्गाचे 'स्वातंत्र्य' भांडवलशाही देऊ शकली नाही. परावलंबित्वाने एका बाजूला अत्याचार तीव्र

केला तर दुसऱ्या बाजूला पैशाच्या भूकंपाने एकत्र कुटुंबपद्धतीला उजाड केले. 'देवदासींना' 'बाजारबसवी' बनवले.

दलित साहित्यातील विरोधाभास हा फक्त त्यातील अविभाज्य विरोधाभास नव्हे. परंतु अत्यंत गुंतागुंतीच्या व परस्परविरोधी परिस्थितीच्या, सामाजिक प्रभावांच्या आणि ऐतिहासिक परंपरेच्या भारतीय समाजातील वेगवेगळ्या वर्गावर आणि थरांवर भांडवलदारी सुधारांमुळे झालेल्या परिणामांचे पडसाद आहेत.

दबलेल्यांच्या हुंकाराला बदलू पहाणाऱ्या दलित साहित्याचे अचूक मूल्यांकन भारतीय समाजरचनेच्या विरोधाभासातील संघर्षात श्रमिक-दलित जनतेच्या शोषणातून मुक्तिच्या संघर्षात राजकीय नेतृत्व घेण्याची क्षमता असणाऱ्या वर्गाच्या दृष्टीकोनातूनच होऊ शकेल. भांडवलदारी लोकशाहीतील असूत्रता, कमतरता, उणीवा आपल्या वर्गीय कार्यक्रमातून पूर्ण करू शकणारा आणि त्याचबरोबर आजवरच्या आर्थिक, सामाजिक, धार्मिक शोषणाला व दांभिकतेला नवमानवाच्या संस्कृतीच्या अवशेषांखेरीज भांडणारा कामगारवर्गच दलित साहित्यांतील आजच्या समाजव्यवस्थेवरील तिरस्कार, घृणा, टिका तमाम दलित जनतेला समजावून सांगेल. हाच वर्ग आपल्या लढ्यातून दलित जनतेच्या आजच्या विचारांचे विशाल वर्गीय भावनेत रूपांतर करील. भांडवलशाही उखडण्यासाठी आणि शोषणाची प्रथा कायमची गाडून टाकण्यासाठी द्यावयाच्या संघर्षात सर्व दलित शोषितांना संघटित करण्यासाठी दलित साहित्यातील अर्थ हाच वर्ग त्यांच्या जीवनाशी आणि लढ्याशी जोडील.

दलित साहित्याने आत्मनिष्ठरित्या (Subjectvely) दलितांची व्याख्या व्यापक केली आहे, परंतु त्याचीच दुसरी बाजू नजरेला आड झाली आहे. ती म्हणजे वस्तुनिष्ठ तर्कसंगती (Subjective Logic) दलित या संज्ञेखाली सर्व शोषित वर्गाची (कामगार, शेतमजूर इत्यादी) आणि थरांची [अनुसूचित जाती, स्त्रिया (?)] एकत्र मोटुकली बांधली आहे. म्हणूनच दलित साहित्य संवेदनशील वाचकाला आकर्षित करीत असले तरी क्रांतिकारी वर्गीय राजकारणाची ते प्रेरणा देऊ शकत नाही. कारण क्रांतिकारी राजकारण फक्त एकच वर्गाचे असते. तोच वर्ग स्वतःच्या क्रांतिकारी राजकारणाने इतर सर्व शोषित दलितांची मुक्तता करू शकतो. आणि आजच्या भांडवलदारी समाजव्यवस्थेतील हा वर्ग म्हणजे कामगार वर्ग होय.

दलित साहित्यापासून लिहिले गेलेले दलितांच्या सामाजिक स्थितीचे नागवे चित्र अंगावरून शहारे आणणारे, निर्भीडपणे सत्य मांडणारे आहे. परंन्तु दलित साहित्याकडे आकर्षित झालेला आणि त्यात स्वाद घेणारा वाचक मध्यमवर्गीय 'डावा उदारमतवादी' आहे. खऱ्या अर्थी दलित जनतेच्या हातात दलित साहित्य नाही. याचाच अर्थ ऱ्हास होत चाललेल्या मध्यमवर्गाच्या त्रस्त भावनांना दलित साहित्यात थारा मिळतो आहे.

पारंपारिक प्रस्थापित धर्मभावनेला दलित साहित्याने दिलेला हादरा विरघळत चाललेल्या शहरी वर्गाच्या मनावर शिडकाव करून गेला. एका बाजूला हिंदुधर्मकर्मकांडाला धडाका देत असतांना दलित साहित्याने ग्रामीण दलित जनतेच्या भावनांना आणि चालीरितीना प्रतिक्रिया म्हणून बौद्ध धर्माचा वारसा धारण केला. दलित साहित्यात कामगार वर्गाने आपले दुश्मन आणि त्यांचे अत्याचार यांचे स्वरुप ओळखावे असे खूपसे असले तरी कामगार-वर्गाने आत्मसात करावी अशी भरीव विचारधारा नाही. तरी सुद्धा भांडवल-शाहीच्या वैचारिक प्रचारामुळे, पगडयामुळे, कामगार चळवळीत अनुपस्थित वर्गीय चेतनेमुळे एकंदर श्रमिक जनतेच्या संघर्षातील उणीवांचे प्रतिबिंब प्रत्यक्ष व अप्रत्यक्षरित्या दलित साहित्यातील विचारपद्धतीत आढळले.

कामगारवर्गीय राजकरणातील आजची अदूरदृष्टी आणि आर्थिकवाद त्याचप्रमाणे ग्रामीण दलित जनतेचा राजकारणापासून अलिप्तपणा, तिच्या गूढ, वांशिक कल्पना, जगाच्या वावटळीसमोर तिचा बुजरेपणा या सर्वांचा परिणाम दलित साहित्याच्या विचारदृष्टीवर आणि निष्कर्षावर झाला आहे.

प्रस्थापित समाजव्यवस्थेविरुद्धच्या क्रोधाने भरडल्या जाणाऱ्या श्रमिक दलित जनतेविषयीच्या अपरंपार कळकळीने भारावलेले दलित साहित्य थेट वाचकांशी बोलते. त्याला बोलके करते. तू कोणत्या समाजात वावरतो आहेस ह्याची जाणीव करून देते. दूर खेडयाबाहेरच्या महारवाडयापासून ते माहिम-च्या खाडीपर्यंत घुमसणारे दलित साहित्य वाचकाला सुन्न करते. द्वंद्वाचे वादळ उठवते. तू कोणत्या बाजूला हा प्रश्न समोर ठेवते. ह्यातच दलित साहित्याचे आगळेपणा आणि ऐतिहासिक वैशिष्टच आहे.

भांडवलशाही समाजपद्धतीच्या ऱ्हासाच्या काळातील तीव्र झालेला सामाजिक विरोधाभास दलित साहित्यात ओतप्रोत भरलेला आहे. संताप आणि

आशा ह्यांचे सळसळणारे मिश्रण येथे आहे. परंतु सामाजिक विरोधाभासाचे उत्तर आणि इलाज साहित्यात सापडणे कठीण असते. आणि साहित्य, कला ह्यासुद्धा ऱ्हास होत चाललेल्या समाजातील द्वंद्वात हरवून बसण्याचा संभव असतो. आणि ह्याचसाठी दलित साहित्य क्रांतिकारी साहित्य म्हणून जर कार्यान्वित करायचे असेल तर त्याची सांगड भारतीय क्रांतिशीच घालावी लागेल. जेव्हां एखादा लेखक किंवा कवी दलितांच्या भावनेला आकार देतो आणि दलितांची व्याख्या व्यापक करतो तेव्हां ते स्वागतार्ह असते परंतु त्याने आजच्या समाजव्यवस्थेतील कामगार वर्गाचे स्थान आणि इतर शोषित दलितां-तील वैशिष्ट्यपूर्ण महत्व वेळीच उमगले नाहीं, त्या वैचारिक सिद्धांतातून दलितांवरील सामाजिक अत्याचाराचा अन्यायाचा प्रश्न कामगार चळवळीशी जोडला नाही तर त्याच्या आत्मनिष्ठ व्यापक भावना वस्तुनिष्ठ राजकीय सत्य बनू शकणार नाहीत.

दलितांवरील अत्याचाराचा, जीवनाचा प्रश्न दलित साहित्याने ज्या प्रभावीरित्या समाजासमोर मांडला आहे त्याला फक्त सैद्धान्तिक समाजवादच उत्तर देऊ शकेल आणि ह्याच ओघाने दलित साहित्यात जे चिरंतन आणि टिकाऊ आहे ते सर्व ज्या प्रकारे नैसर्गिकपणे नदी सागराला मिळते त्याप्रमाणे समाजवादी सिद्धांताकडे झेपावील.

("मुक्तिपर्व", जुलै/ऑगस्ट १९७५)

# संतप्त अश्रूतून उमललेले साहित्य

* पु. ल. देशपांडे

दलित वाङ्मयाने मराठी साहित्यात प्रथम जर काही आणले तर संतापातून चमकणारे अश्रू. अश्रू ही एक अजब गोष्ट आहे. ते आनंदाच्या क्षणी ओघळतात. दुःखाच्या क्षणी ओघळतात. पण अन्यायाविरुद्ध उठताना संतापातून फुटणाऱ्या अश्रूंचे मोल हे सर्वात मोठे आहे. सामान्यांच्या भाषेत हा तळतळाट असतो. ह्याच तळतळाटाचे एक उदात्त स्वरूप म्हणजे दलित साहित्य. हा संताप कविता होऊन फुटला. कथा, कादंबरी, निबंध होऊन प्रकटला. वाल्मीकीच्या सात्त्विक संतापातून निर्माण झालेल्या शोकाचा श्लोक होऊन गेल्याची कथा वर्षानुवर्षे ऐकणाऱ्यांना अशाच संतापजन्य शोकातून फुलणाऱ्या साहित्याचे मोल करायला हवे.

सुशिक्षित समाजातल्या असंख्य वाचकांची अंतःकरणे दलित साहित्यातल्या ह्या संतापाच्या तप्त अश्रूंनी धुतली जात आहेत. साहित्याचे मूळ प्रयोजन, जगणाऱ्यांच्या जाणीवा अधिक संवेदनक्षम कराव्या हे आहे. एखाद्या विनोदी वृत्तीचा लेखक ते कार्य जीवनातल्या अनुभवांची विसंगती दाखवून करील तर विद्रोही लेखक संतापाचा अश्रू फुलवून करील. गेल्या पाच-दहा वर्षात निर्माण झालेले दलित साहित्य हा भारतीय साहित्यात घडलेला अभूतपूर्व चमत्कार आहे. दलित जातीत जन्मलेले संत देवाकडे पतितपावन म्हणून भागणे घेऊन जात होते. आजचा दलित लेखक भारताच्या सांस्कृतिक इतिहासात पहिल्यांदा ज्ञाननिष्ठ विद्रोहाच्या विटेवर उभा राहिला आहे. एका निराळ्या तेजाच्या झळाळीने हे साहित्य मराठी भाषेला समृद्ध करू लागले आहे. त्या साहित्याची प्रकृती आणि आकृती विलक्षण आहे. प्रकृतीला अगतिकता मान्य नाही आणि आकृतीने भाषेच्या तथाकथित सौंदर्याचे आणि कलेचे रेडिमेड नकाशे फेकून दिले आहेत.

ह्या साऱ्या अनुभवांची प्रतच निराळी आहे. "अस्मितादर्श" वाचताना मन थरारून उठते ते दुःखाच्या आणि अमानुषतेच्या एकाहून एक खोल अशा गर्ता पाहून. मराठी साहित्यात दैन्य किंवा कारुण्य या पूर्वी प्रकटले नव्हते असे नाही. परंतु त्यात कळत नकळत दयेला आवाहन असायचे. इथे दयेला थारा नाही. कारण केवळ दयेला पात्र म्हणून जगत राहणे या सारखा माणसाचा अधःपात नाही याची दलित साहित्याला पूर्णपणाने जाण आली आहे. आणि हीजाण सामाजिक असल्यामुळे हा विद्रोह एक निराळे तेज घेऊन प्रकटतो. पारंपरिक साहित्य समीक्षेत हे तेज जोखण्याचे कोणते तराजू आहेत ते मला ठाऊक नाही. असेच तेज केशवसुतांच्या कवितेतून प्रकटायला लागले होते. त्या काळी त्यांच्या काव्याची समीक्षा करणाऱ्यांनी त्यांच्या अपरिहार्यपणाने झालेल्या यथार्थ शब्दांना "ओबडधोबड" म्हणून त्याची वासलात लावली होती हे मात्र आठवते.

ज्ञानेश्वरीतली एक तरी ओवी अनुभवावी असे म्हटले जाते. दया पवार, ढसाळ, सुर्वे यांच्यासारख्यांच्या कवितेतली एक तरी ओळ अनुभवण्याइतक्या संवेदना तीक्ष्ण झाल्या तर आता स्वतःला धन्य मानायला हवे. दलित साहित्यिकांनी काहीशा सुस्त आणि आत्मसंतुष्ट समाजाची सुखनिद्रा उडवण्याचे कार्य केलेले आहे. माझ्या समजुतीप्रमाणे भारतात हा पहिला मान मराठी भाषेला मिळाला आहे. संस्कृतातली अध्यात्मविद्या मराठीतून आणणाऱ्या समतावादी संतांचे ऋण आणि वंशवर्ण जातिभेदातील समता वर्तावी म्हणणाऱ्या दलित साहित्यिकांचे ऋण यात मला एक महत्त्वाचा फरक दिसतो. दलित साहित्याने समाजातल्या विषमतेची जबाबदारी देवावर न टाकता माणसावर टाकली. देवाच्या दारी सर्व समान आहेत की नाहीत हा प्रश्न नाही. माणसाच्या दारी माणसे समान नाहीत हे सत्य आहे.

दलित साहित्य संमेलन हे जीवनाचे विभिन्न संदर्भ घेऊन जगल्या वाढलेल्या माणसांचे संमेलन आहे. तसे ते असणारच, पण त्यांच्या मैत्रीला बांधणारा एक नवा स्नेहबंध आहे. तो म्हणजे जीवनातल्या उन्नतीच्या विविध मार्गांचा मागोवा घेऊन त्यावरचे शोषणाचे काटे नष्ट करण्याच्या समान विचाराचा हा विचार केवळ वैचारिक वाङ्मयाने रूजत नाही. इथे सर्जनशील ललित साहित्य अधिक प्रभावी ठरते. उध्वस्त जीवनाची चित्रे माणसाच्या मनात बिंबावी लागतात. चित्ररूपाने तो सल मनात रुतून बसावा लागतो.

साहित्याचे हे कार्य आहे. तसे भोवतालचे सारे काही माणसाला दिसत असतेच. पण जाणिवेच्या डोळयांनी पहाणे म्हणजे काय हे साहित्य सांगत बसते. केवळ घटना म्हणजे सत्य नव्हे. त्या घटनेतले सत्य सर्जनशील प्रतिभावन्त दाखवीत असतो. दलित समाजात अशा प्रतिभेला विलक्षण बहर आला आहे. भयंकर उन्हाळा भोगत पळसाचे बन फुलावे तसे हे साहित्य फुलले आहे. त्या उन्हात हिंडायचे सामर्थ्य हे देखील त्या अमितपुष्पानीच दिलेले दान आहे. केशव-सुताना अभिप्रेत असलेले नवे "सनदी- शेतकरी" ते हेच असावेत. दलित जीवनातली ही भुई शतकानुशतके नांगरल्याविण पडली होती. आज ती तरारून उठली आहे.

माझ्यासारख्याला प्रामुख्याने पांढरपेशाचे संस्कार घेऊन जगत असलेल्या लेखकाला अस्मितादर्शनातले साहित्य वाचताना स्वतःच्या एका विलक्षणपणाची जाणीव होऊ लागली. एका संकुचित संदर्भात जगताना लिहिलेल्या साहित्यातून लाभलेल्या तथाकथित मोठेपणाचे वैफल्य उमगते. पण त्याचे आता दुःख उरले नाही. कारण एक जुना लेखक म्हणून मी उरलो न उरलो तरी एका नव्या चैतन्यमय साहित्याचा मी वाचक आहे. ही माझी नवी अस्मिता आहे. ह्या नव्या वाचनातून जडलेल्या नव्या नात्याची श्रीमंती फार मोठी आहे. दया पवारांच्या कवितेतून नानाविध नवी दुःखे मला जाणवत आहेत, त्या दुःखानी मी हादरलो आहे. आजवर रचत आणलेली संस्कृती विकृतीची लगोरी नामदेव ढसाळांच्या एका ओळीने उडवली जात आहे. बाबा आढावांचा एक गांव एक पाणवठयात देव, धर्म वगैरे कल्पनातला पोकळपणा पाहतो आहे. नारायण सुर्व्यांचा नवा जाहीरनामा, बाबुराव बागुल यानी घडवलेले मानव निर्मित भीषणतेचे अपरिचित दर्शन, प्रा. बागमाऱ्यांनी इथल्या दलिताप्रमाणेच थेट अमेरिकेतल्या निग्रोशी जुळवलेले माझे नाते. त्या साऱ्या जाणिवा कलात्मक आहेत की आणखी कशा आहेत याची मला चिंता नाही. पण एका फार चांगल्या अर्थाने त्या जाणीवा माझ्यातल्या उरल्यासुरल्या एका जुन्या माणसाला उध्वस्त करीत जात आहेत. आयुष्याच्या उत्तरार्धात माणूसपणाच्या अधिक जवळ नेणारी ही उध्वस्तता मनात ह्या लेखकांविषयी फार मोठया कृतज्ञतेची भावना जागवून जाते आहे. तिचे विश्लेषण करणे माझ्या बुद्धीच्या आवाक्या-बाहेरचे आहे. ह्या कृतज्ञतेचे पोटीच दलित साहित्य संमेलन हे मला माझ्या नव्या आप्तांचे संमेलन आहे असे वाटते. त्यातूनच मनाला आणखी एक ओढ लागले, अस्मितादर्शने चालवलेल्या प्रयत्नासारख्या अनेक प्रयत्नातून शेवटी असे एक सर्वांगीण समाजपरिवर्तन घडावे की त्यावेळी "दलित" हा शब्द केवळ शब्दकोशांतच राहावा. नव्हे, तीच त्या शब्दाची कबर ठरावी.

**दलित साहित्य संमेलन, १७ व १८ जानेवारी, १९७६, नागपूर, स्मरणिकेतून.**

# सामाजिक जाणिवा व सौंदर्यदृष्टी

* रा. ग. जाधव

"दलित साहित्यात सामाजिक जाणिवा व सौंदर्यदृष्टी या दोहोंचाही प्रत्यय येतो," हा परिसंवादाचा विषय अत्यंत समयोचित असून दलित साहित्य संमेलनाच्या आयोजकांनी तो चर्चेसाठी योजून साहित्याच्या विकसनप्रक्रियेची मार्मिक समज व्यक्त केली आहे. गेल्या दहा वर्षात दलित साहित्याची तात्विक मीमांसा परोपरीने व गांभीर्याने होत राहिली आहे, तथापि प्रत्यक्ष दलित साहित्याच्या निर्मितीशिवाय त्या मीमांसेला खरे अधिष्ठान लाभणे शक्य नव्हते परंतु सुदैवाने अशी निर्मितीहि गेल्या काही वर्षात संथपणाने होत राहिली. यापुढे तिला अधिक गती येण्याची सुचिन्हे दिसत आहेत. यामुळे दलित साहित्याचे सर्वच प्रश्नोपप्रश्न एका मूर्त संदर्भात उभे करणे आता शक्य आहे. या दृष्टीने वरील परिसंवादाचा विषय अत्यंत योग्य वेळी पुढे येत आहे, असे मला वाटते.

परिसंवादाचा प्रस्ताव हा एका निश्चितार्थ विधानाने मांडलेला आहे, पण म्हणून तो निश्चितार्थ गृहीत धरून चर्चा व्हावी असा संमेलनाचा आयोजकांचा हेतू नसावा, असे वाटते. दलित साहित्यातील सामाजिक जाणिवा व सौंदर्यदृष्टी यांचे अस्तित्व केवळ गृहीत धरून साहित्यमीमांसा संभवणारे नाही. साहित्याचा आस्वाद तसेच त्याचे आकलनमूल्यमापन अशा गृहीतकाने अर्थपूर्ण ठरणार नाही. वाङ्मयीन अभिरुची सुजाण व संपन्न होणार नाही. अजाण व अपरिपक्व अभिरूचीमुळे साहित्यनिर्मितीलाही डोळस विकासाचे भान येत नाही. हे सर्व केवळ दलित साहित्याच्या बाबतीतच खरे आहे असे नाही. तर सर्वच प्रकारच्या साहित्यनिर्मितीला गृहीतकांच्या मीमांसेची गरज असते म्हणूनच दलित साहित्यातील सामाजिक जाणिवांची सामाजिक जाणिवा म्हणून असणारी गुणवत्ता व त्यांची विस्तारकक्षा यांचा विचार करणे जसे इष्ट आहे, त्याचप्रमाणे त्यातील सौंदर्यगुणांचा किंवा रूपविशेषांचा विचार करणेही आवश्यक

आहे. असा दुहेरी विचार प्रत्यक्ष साहित्यकृतींच्या आधारे करण्याची संधीही उपलब्ध आहे. म्हणूनच केवळ तत्वमीमांसेत आणि युक्तिवादांच्या-नि-दाव्यांच्या वक्तृत्वात आजवर गुंतून पडलेला दलित साहित्य विचार आता नीट वाटेवर मार्गस्थ होत आहे. याचे श्रेय संमेलनाच्या आयोजकांनी मिळविले, याबद्दल विशेष आनंद वाटतो.

प्रस्तावाच्या विषयातून आणखी एक चांगली समज सूचित होते. ती म्हणजे साहित्यकृतीमधील सामाजिक आशय व तिचा कलात्मक घाट यांतील एकात्मतेची. कोणत्याही साहित्य विचारात साहित्यकृतीची साहित्यकृती म्हणून असलेली स्वायत्तता मान्य करावीच लागते. सामाजिक जाणिवांच्या का होईना पण वाङ्मयीय रुपविशेषकाना महत्व असते. जीवनवादी व आशयवादी भूमिका आणि कलावादी भूमिका या तात्विक साहित्यमीमांसेत वेगळ्या वाटानी वाटचाल करताना दिसल्या, तरी प्रत्यक्ष साहित्यकृतीच्या मीमांसेत त्या हातात हात घालूनच चालताना दिसतात-दिसाव्यात. सामाजिक जाणिवा व सौंदर्यात्मकता यांचे पदर प्रत्यक्ष साहित्यकृतीत एकमेकात गुंफलेले असतात. ही दोन पदरांची एकजीव गुंफण असते. जिथे हे पदर अलगपणे लोंबताना आढळतात, तिथे दोहोंचेही स्वरूप फसलेले असते.

दलित साहित्य हे एक साहित्यप्रवाह म्हणून प्राधान्याने सामाजिक जाणिवांचे साहित्य आहे, हे खरेच. हरिभाऊंच्या सामाजिक कादंबऱ्या सामाजिक जाणिवांच्याच कादंबऱ्या होत्या. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या या प्राधान्याने समाजशास्त्रीय तत्वमीमांसेच्या कादंबऱ्या होत्या. पण एवढे म्हणूनच साहित्य-विचार पुढे जात नाही. तो पुढे जाण्यासाठी या साहित्याचा रूपविचार आवश्यक ठरतो. साहित्यिकांच्या मनोभूमिकेचा वेध घ्यावा लागतो. यासाठी साहित्य-कृतींचा अभ्यास करून त्यातून सामाजिक जाणिवांच्या रुपसिद्धीचे स्वरूप लक्षात घेणे क्रमप्राप्त असते. सामाजिक जाणिवांच्या प्राधान्याने समग्र दलित साहित्याला एक प्रवाह म्हणून वेगळेपण येते हे जसे महत्वाचे, तसेच त्या जाणिवांच्या विशिष्ट आविर्भावातून त्याला साहित्यकृतीगणिक एक प्रकारचे अनन्या-साधारणत्व लाभते हेही महत्वाचे आहे. या दुहेरी वस्तुस्थितीतच दलित साहित्याच्या परंपरेचे व दलित साहित्यकृतीच्या विशिष्टतेचे भान राखावे लागते. सामाजिक जाणिवप्रधान परंपरा दलित साहित्यकृतीला एक परस्पर परस्पेक्टिव्ह देत असते. सुदैवाने ही परंपरा समग्र मराठी साहित्याचीच असल्याने

दलित साहित्यकृतीला आपोआपच व्यापक मराठी परंपरेची पार्श्वभूमी प्राप्त होते. या दृष्टीने पाहता, दलित साहित्याच्या वेगळ्या प्रवाहातील सामाजिक जाणिवा व दलित साहित्यकृतीतील अनन्यसाधारणता या दोहोंच्या शोध-बोधासाठी समग्र साहित्य मराठी साहित्य परंपरेतील आजवरच्या फलितांचा आधार घेणे रास्त ठरेल. या दोन्ही बाबतीत मराठी साहित्यविचारात नमूद झालेले निष्कर्ष व निकष विचारात घ्यावे लागतील. या दोन्ही बाबतींत मान्यता लाभलेले मानदंड तुलनार्थ स्वीकारावे लागतील. त्या निकषांना उतरून पुढे जाणे व सामाजिक जाणिवांच्या वाङ्मयीन अवतारांचे नवे निकष व आदर्श निर्माण करणे, हे दलित साहित्यप्रवाहाचे जन्मसिद्ध अवतारकार्य आहे. या कार्याची प्रकट जाणीव दलित साहित्यिकात निर्माण करण्याचे महान कार्य या परीसंवादातील चर्चेच्या रूपाने साधले गेले, तर तो परिसंवाद यशस्वी झाला असे म्हणता येईल.

या परिसंवादासाठी मी माझे विचार थोडेसे मर्यादित करून घेत आहे. एक म्हणजे दलित साहित्यात ज्या सामाजिक जाणिवा आहेत, त्या मी तूर्त बाजूला ठेवतो. सौंदर्यदृष्टीचा जो दुसरा विचार आहे, तो मी माझ्यापुरता लेखकाची कलात्मक तटस्थता एवढ्या अर्थानेंच विचारात घेत आहे. तिसरी या अर्थाची आनुषंगिक भूमिका अशी की जे लेखक कवी खुद्द दलित समाजातील आहेत, त्यांच्याच साहित्याकरिता मी माझा विचार सीमित करीत आहे, अण्णाभाऊ साठे, शंकरराव खरात, बाबुराव बागूल, केशव मेश्राम आदि लेखकांचे कथात्मक साहित्य, नामदेव ढसाळ, नारायण सुर्वे, दया पवार, वामन निंबाळकर, चोखा कांबळे इत्यादी कवींचे काव्य माझ्या डोळ्यांसमोर आहे. दलित नाट्यसाहित्य, दलित विनोदवाङ्मय यांसारख्या अधिक वस्तुनिष्ठ साहित्याची निर्मिती अजून फारशी झालेली नाही. कलात्मक ताटस्थ्याचा विचार अशा वस्तुनिष्ठ साहित्य प्रकारांच्या आधारे अधिक मूर्त स्वरूपात करणे शक्य असते. तथापि ज्या अर्थी असे दलित साहित्य अवतीर्ण झालेले नाही, त्या अर्थी कुठे तरी दलित वस्तुनिष्ठ संवेदनशीलता रूढ झालेली असावी, असे मनात येऊन जाते. याचाही दुसरा एक अर्थ असा की आपल्या सामाजिक जाणिवांचे वस्तुनिष्ठ नाट्य सर्वांगांनी हेरून त्याची नाटकरूपे सिद्ध करण्यास जो एक कलात्मक अलिप्तपणा हवा असतो, तो दलित साहित्यिकात कुठल्यातरी कारणांनी प्रभावी होत नसावा. कदाचित नाटक या प्रकाराच्या अवतारासाठी काही एका मुक्त सामाजिक वातावरणाची आवश्यकता असावी. विनोदी

साहित्याला तर असे मोकळे वातावरण अत्यंत पोषक ठरते. किंबहुना कथा-कवितादी साहित्य प्रकाराइतक्या सहजोमाने हे साहित्यप्रकार अवतीर्ण होत नसावेत. त्यांच्या आविष्कारासाठी काही एक प्रगत वाङ्मयीन वातावरणही आवश्यक असावे, बहुधा अशी दुहेरी अनुकूलता दलित लेखकवर्गाला अजून लाभलेली नाही, असे वाटते.

दलित सौंदर्यदृष्टीचा एक महत्वाचा प्रश्न म्हणूनच सामाजिक जाणिवांच्या आत्यंतिक गोवणुकीतून (इन्व्हॉल्व्हमेंट) सुटका करून घेणे व कलात्मक तटस्थ्य प्राप्त करणे, हा आहे, असं मला वाटते. याचा दुसरा अर्थ असा की, दलित साहित्यिकांना आपले समग्र जीवनविषयक संवेदन कलावंताच्या पातळी-वरून जाणवणे इष्ट आहे. आणि असे म्हणणे फार सोपे असले, तरी ते साधणे किती अवघड आहे, याची कल्पना मला आहे. या ठिकाणी मला, प्रा. केशव मेश्राम यांच्या "हकिकत" व "जटायू" या दोन कादंबरीकांपैकी मला "जटायू" ही अधिक यशस्वी वाटते. याचे कारण काय, याचा मी शोध घेत आहे. एक तर असे जाणवते की, "हकिकत" मधील "मी" ची कथा ही अधिक मानसिक गोवणुकीतून निर्माण झाली आहे. तिचे निवेदनही प्रथमपुरुषीच आहे. या उलट "जटायू" मधील अभिमन मांगेवाराची कथा ही अधिक तटस्थपणे, वस्तुनिष्ठ निवेदनातून साकार झाली आहे तथापि या तरतमभावाला जेवढे महत्त्व आहे, त्यापेक्षाही अधिक महत्त्व या दोन्ही कादंबरिका म्हणजे दलित कथासाहित्यातील कलात्मक ताटस्थ्याच्या वस्तुपाठ कराव्यात, इतक्या श्रेष्ठ दर्जाच्या आहेत.

याची अनेक कारणे संभवतात. तथापि मला जे प्रकर्षाने जाणवते, ते प्रा. मेश्राम यांच्यातील अंतर्मुख, आत्मचिकित्सक असे लेखकाचे व्यक्तिमत्व आधुनिकतेच्या संस्कारांनी छेडलेले आहे ते. दलित समाजाच्या व्यथावेदनांचे भागीदार असूनही, त्यांच्याकडे पाहताना त्यांत गुंतून न पडणारे आहे. व्यक्ति-मत्व सतत स्वतःशी सत्यासत्याचा निवाडा करणारे आहे. ते स्वतःच्या अनु-भवाचा, निरीक्षणांचा स्वतःसाठीच जणू विचार करीत आहे. त्याच्यापुढे श्रोता आहे तोही स्वतःचाच व वक्ता आहे तोही स्वतःचाच. कुणाबाहेरच्या व्यक्तीला वा गटाला उद्देशून ते व्यक्तिमत्व विचारही करीत नाही व बोलतही नाही. त्याचे अवघे वादविवाद खरे तर, स्वतःशीच आहेत. जेथे लेखकाचे व्यक्तिमत्व असे अंतर्मुख बनते, तेथे कलात्मक ताटस्थ्याची सिद्धी सहजपणे होते. याचा दुसरा अर्थ जीवनाचे संवेदन स्वसंवेध राखणे म्हणजे स्वतः

पुरता त्याचा अर्थ व अर्थवत्ता अनुभवणे हे वाङ्मयीन सौंदर्यदृष्टीचे गमक ठरते. "हकीकत" व "जटायू" या कादंबरिकांत दलित समाजाचे जे वास्तव, भाव-समतोल, व चिकित्सक दर्शन घडते, त्याचे एक कारण लेखकाने साधलेले कमालीचें ताटस्थ्य हे होय.

या साहित्यकृतींमागील लेखकाचे संस्कारसंपन्न व्यक्तिमत्व आपोआपच घडले काय? हे तर केवळ अशक्य आहे. अशा व्यक्तिमत्वासाठी सहेतुकपणे प्रयत्न करावे लागतात. विशिष्ट सामाजिक जाणिवांच्या जन्मजात लाभाने व्यक्तिमत्व जन्मतः संपन्न असते, असे नाही. यासाठी सामाजिक जाणिवांचाच चिकित्सक अभ्यास करावा लागतो. त्यांचेविषयी वस्तुनिष्ठ दृष्टिकोण साधावा लागतो. त्यांचा अर्थ व अर्थपूर्णता ही मनन चिंतनपूर्वक जाणून घ्यावी लागतात. सामाजिक जाणिवांवर केवळ दावा सांगून त्यांचे वाङ्मयीन अर्थ व आकार सांगता येणे कठीण असते. या सर्वांचा थोडक्यात अर्थ एवढाच की, सामाजिक जाणिवांच्या "फील" ला चिकित्सक बोधाची जोड देणे महत्वाचे असते. म्हणजे "फील" च्या गोवणुकीतून काहीशी मुक्ततेची संधी लाभते.

बाबुराव बागुलांच्या कथासाहित्यात सौंदर्यदृष्टीचा वेगळाच प्रभाव जाणवतो. बागुलांची कथा ही चिं. त्र्यं. खानोलकरांच्या कथाप्रमाणे काव्य-दृष्टीने रुपास येत असते. परंतु ती अनावर, सैरभैर होते ती भीषण रौद्र वास्तवाच्या दर्शनाने. म्हणजे कथारुप घेणारे जीवनवास्तव त्याच्या बाह्यांगातच इतके लोकविलक्षण घटना प्राचुर्याने उसळत असते की, त्या काव्यदृष्टीला अंतर्मुख होण्याची उसंतच लाभत नाही. खानोलकरांच्या कथांतील मनोविश्लेषण वा मनोविकृती यांच्या अस्तित्वामुळे वा त्या विषयीच्या लेखकाच्या कन्सर्न-मुळे त्यांची काव्यदृष्टी मात्र अंतर्मुख होण्याची संधी मिळवत असते. भाषेची काव्यमयता व काव्यात्म टीपटीप्पणी यांनी खुललेले बागुलांचे कथासाहित्य नाटय-पूर्ण असते हे खरेच. पण बागूल त्या नाटयात्म आशयात अधिक गुंतून पडतात, असे वाटत राहते, कविदृष्टी ही उत्स्फूर्तपणे अवतरते. पण ही अधिक प्रगत, प्रगल्भ होणे वा करणे शक्य असते. "जेव्हा मी जात चोरली होती" या त्यांच्या कथासंग्रहाला शिरीष पै यांनी मार्मिक प्रस्तावना लिहिली आहे. त्यांच्या कथा वाचण्यापूर्वी आनंद व भय या भावनांनी मन अस्वस्थ होते, असे त्या म्हणतात. चांगल्या कथेचा आनंद व तिच्यातील भीषण आशयाचे भय मनाला वेढुन राहते पण त्यांची कथा अंतर्मुख करीत नाही. भीषण वास्तव काव्य दृष्टीने पाहून जे जन्मते ते केवळ "भय व अनुकंपा'

या भावनांचे विरेचन (कॅथार्सिस) करण्यापुरतेच सीमित होऊ नये असे वाटत राहतो यासाठी काव्यदृष्टीला व भीषण वास्तवाला एका व्यापक रुपरंगात प्रक्रियित करणे इष्ट ठरते. मला वाटते, बागुलांच्यातील कवी हा संयमित केला, तर भीषण वास्तवाच्य अंतरंगात त्याला अधिक खोलवर जाता येईल. "मला लोकानीं नव्हे, तर मनुने मारले" या "जेव्हा मी जात चोरली होती" कथेच्या भरतवाक्यात काव्यदृष्टीची संयमित पण सखोल झेप प्रतीत होते. येथे मनुलाही विश्वात्मकता लाभून तो सामाजिक नियतीचा गुढ–अटळ प्रतीक ठरतो. पण सामान्यतः वेगळ्या अपूर्व व भयानक वास्तवात हा कवी फार गोवणूक करून घेतो असे वाटते. ही समस्या जीवनसंवेदन पुरेसे वस्तुनिष्ठ करून कथात्म करण्याची आहे. बागुलांनी कथेहून व्यापक असा कादंबरीसारखा साहित्य प्रकार हाताळावा, अशी अर्थपूर्ण सूचना सौ. शिरीष पै यांनी उपरिनिर्दीष्ट प्रस्तावनेत केली आहे.

काव्यदृष्टीला फार मार्मिक जीवनसत्ये प्रकट करण्याची क्षमता असते. श्रेष्ठ-साहित्य केवळ अभूतपूर्व दर्शनाने अवतरत नाही ते त्या वास्तवाच्या सखोल अर्थाचे अभिव्यंजक असते. काव्यदृष्टीला ही ताकद असते, पण ती कलात्मक ताटस्थ्याने सुविहित करावी लागते. मुळात भावप्रधान असलेली काव्यदृष्टी भावनावेगात सैरभैर होण्याची शक्यता असते. तिला अर्थव्यंजतेच्या शोधमार्गावर उभे करणे महत्त्वाचे असल्याने असा प्रयत्न कविमनाच्या दलित कथालेखकांनी करणे श्रेयस्कर होय. कथासाहित्यात काव्यदृष्टीचा अभाव हा गुणही ठरू शकतो व दोषही ठरू शकतो "अस्मितादर्श" मध्ये नवोदित दलित लेखकांच्या कथा प्रसिद्ध होतात. त्यातील अनेक कथातून भावुक वा भावविवश दृष्टीकोणाचा अभाव दिसून येतो. विद्रोह, बंड, पराभव, अपमान अशा अनुभवांची ही कथारुपे भावविवश कवितांच्या निकट जाताना दिसतात. नवोदितांची ही एक सामाजिक काव्यात्म संवेदना स्वाभाविकही असते. पण चोखा कांबळे यांच्या "पिंपळपाना" तील पतितेची कथा ही काव्यकथा आहे वा कथाकाव्य आहे, तिचे रुप अवव्या गद्य पतितांच्या कथांना येऊ न देणे आवश्यक आहे. कथासाहित्याला कवितेचे नेत्र हवेत, पण त्याचे मन हे मात्र आपले अंतर्मुख नेत्र गमावून बसता कामा नये.

दलित काव्यक्षेत्रात मात्र कलात्मक ताटस्थ्याचा प्रश्न असा नाही. काव्यांचे जग हे उत्कट भावरंगात रंगून वाहून जाण्याचे जग असते. तथापि वस्तुनिष्ठ काव्याची जी कोंडी आज मराठीत जाणवते आहे ती फोडण्याचे कार्य दलित कवींना करता येईल, असे वाटते. नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, दया पवार, वामन निंबाळकर

चोखा कांबळे आदींच्या अनेक कविता कथात्म वळण घेताना दिसतात. दलित काव्य-दृष्टीतही दलित वर्णनाने, कधी दीर्घ कथनरुपाने अवतरतात. सामाजिक अन्यायाच्या, अत्याचाराच्या वर्तमानपत्रातून येणाऱ्या वृत्तांनाही दलित कविमने सामोरी जातात. त्यांच्या व्यथा उत्कट भाववर्णनांनी काव्यातून रुपास येतात. दलित जीवनाचे पुष्कळसे भाग अशा घटनांनी भरलेले असतात. ते जीवन अशा घटनानीच अहोरात्र व्यग्र व्यथित झालेले असते. हे सामाजिक घटनांबद्दल वास्तव कवींना सुविहीत कथाकाव्यांनी साकारता येणार नाही काय ? चोखा कांबळे यांच्या "पिंपळपान" या काव्याच्या प्रस्तावनेत श्रीमती दुर्गा भागवतानी कथाकाव्य हा दलित साहित्य परंपरेचा महत्त्वाचा वारसा आहे, अशा आशयाचे उद्‌गार काढले आहेत ते नव्या वातावरणात सार्थ करण्याचे कार्य दलित कवींना करता येईल.

तथापि "पिंपळपाना"तही कवीमधील कविता दलित व्यक्ती वारंवार प्रकटून काव्यात्म, भावपूर्ण टीपा-टीप्पणी करतांना दिसते. कथात्म वास्तवाला मुक्तपणे बोलू दिले जात नाही. त्याची वस्तुनिष्ठता मुखर होत नाही.

याचे एक महत्त्वाचे कारण दलित काव्यातील सामाजिक जाणिवांचे स्वरुप काहीसे साचेबंद होऊ लागल्याचे जाणवत आहे. तीव्र प्रक्षोभक भावनात्मक प्रतिक्रियापुरते ते काव्य मर्यादित होत आहे. विद्रोह, बंड, अगतिकता यांसारख्या ठराविक वर्गी-करणाने त्या काव्याचा आशय सिमित होणे एका दृष्टीने स्वाभाविकही म्हटले पाहिजे. पण त्यामुळे दलित कवितेला स्थूल सामाजिक मनाच्या ठरीव सुरांचेच संगीत लाभत आहे. दलितेतरांच्या मराठी काव्यातही, थोड्याफार फरकाने, हीच परिस्थिति आहे. एक प्रकारची बोचक "कनकॉर्मिटी" काव्यक्षेत्रात जाणवत आहे. काव्यात्म संवेदन हे उपाधित प्रतिक्षेपांसारखे (कंडिशन्ड रिफ्लेक्सेस) होत आहे.

दलित कवींना यातून कथाकाव्याच्या रूपाने वाट काढता येईल, कारण त्यांच्या सामाजिक वेगळेपणाचे खरे स्वरुप त्यांच्या जीवनकथात आहे, स्थूल जाणिवात ते तेवढे वेगळे नाही. म्हणजे कवितेला, अभिप्रेत असणारी व तिच्या प्रकृतीशी जुळणारी भावसत्ये ठराविकच संभवली, तरी त्या भावसत्यांचे अधिष्ठान असणारे त्यांचे भावानुभव ठराविक नाहीत. अनेक प्रकारच्या दलितपणाच्या कथारूपाने हे भावानुभव लपलेले आहेत. म्हणून अमूर्तापेक्षा मूर्ताकडे म्हणजे अनुभवांच्या वस्तुनिष्ठ रूपांकडे कविता वळेल, तर कथा, वर्णनशैली, वातावरण इत्यादी अंगानी दलित कथाकाव्य प्रगत होईल, यासाठी नव्या भावनिष्ठ समतानता हव्यात. त्या वस्तुनिष्ठ कथात्मक काव्यातून कदाचित् निर्माण होतील.

दलित साहित्यातील सौंदर्यदृष्टीचा कलात्मक तादस्थ्याच्या दृष्टीने घेतलेला हा संक्षिप्त आढावा अत्यंत स्वच्छ मनाने व आपुलकीने घेतलेला आहे, हे नम्रपणे नमूद करणे माझे कर्तव्य आहे. दलित साहित्यिक हे प्रत्यक्ष जीवनसंग्रामात अधिक बुडालेले आहेत, याची मला जाणीव आहे, दलितांचे प्रत्यक्ष जग हे भीषण, भयानक, अपमानास्पद धनांनी भरलेले आहे. या जीवनात देहमनाने ते अडकून पडलेले आहेत. कधी स्वानुभव, कधी सहानुभूती, कधी समानभूती (एम्पॅथी) यांद्वारा ते जीवन मनोमन संवेदून त्याची साहित्यचित्रे काढण्याचे अवघड कार्य दलित लेखक करीत आहे. हे जीवन जगणेच एवढे क्लेशदायक आहे, की ते पुन्हा मनोमन जगून नव्याने उभारणें, "रीक्रीएट" करणे तापदायक आहे. यामुळेच दलित लेखकांची साहित्यातील गोवणूक फार खोल ठरते.

तीमधून सोडवणूक करून घेणे व साहित्यनिर्मिती साधणे हे सोपे काम नाही. तथापि साहित्यनिर्मितिच्या प्रक्रियेत स्वतंत्र असे नियम आहेतच. निर्मितीचा उच्च खेळ त्या खेळाच्या नियमांनीच खेळावा लागतो. . . . "अवर ह्युमॅनिटी इज अवर बर्डन" म्हणजे "मानव्य हेच आमचे सर्वात मोठे ओझे आहे", हे म्हणण्याचा ज्यांना रास्त हक्क आहे, त्यांना साहित्याच्या कलेचे नियम सहजपणें आत्मसात करता येतील, कारण कलेचे ओझे मानव्याच्या ओझ्याइतके कधीच जड असत नाही.

(नागपूरच्या दलित साहित्य संमेलनातील परिसंवादातील न झालेले अध्यक्षीय भाषण)

('निकाय' एप्रिल १९७६ च्या अंकातून).



# दलित साहित्य : काही प्रतिक्रिया

* प्र. श्री. नेरूरकर

एका निखळ व निरोगी अशा सामाजिक ,साहित्यिक व वैश्विक संदर्भात जोवर दलित साहित्याचा मराठीतील प्रस्थापित ललित साहित्यापासून वेगळा विचार होणार नाही. तोवर मराठीत आजवर चालू असणाऱ्या या साहित्यावरच्या क्रिया, प्रतिक्रिया व प्रतिवादांना संकुचित व आत्मनिष्ठ असा व्यक्ति, वर्ग व संप्रदाय यांचे अधिष्ठान असणारा ऊत येतच राहणार, अशी दुःश्चिन्हे स्पष्टपणे आढळून येतच आहेत. सुदैवाने दलित साहित्याची कालपरवापर्यंत जी एकसंध अशी साहित्यिक व संघटनात्मक बैठक होती तिलाही नको तितके व नको तेवढे तडे जाऊ लागले आहेत. असे तडे पुनः पुन्हा जावेत व दलित साहित्याची मराठी भाषेतील चळवळ अनेक अंगाप्रत्यंगांनी दुभंग पावावी, असेही प्रयत्न अप्रत्यक्षरित्या चालू असण्याचा संभवही काही कमी नाही. मग या दलित साहित्याच्या चळवळीचे होणार आहे तरी काय ? ती जन्माला आली नाही तोच ती पुनः आपल्या गर्भात जाऊन जिरणार आहे काय ? की प्रत्यक्ष दलित साहित्यकांकडूनच तिची कुचंबणा व कुतरओढ होत राहणार आहे ? म्हणजे विलक्षण तेजःपुंज व ज्वालाग्राही आत्मसामर्थ्याने निर्माण झालेल्या वा दलितांच्या साहित्यिक विद्रोहाला, प्रक्षोभाला, आक्रोशाला व नकारवादाला काही ऐतिहासिकताच नव्हती असे मानावयाचे की काय ? विशेषतः जानेवारी महिन्यात नागपूर येथे डॉ. म. ना. वानखडे यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या "दलित साहित्य संमेलना"च्या पार्श्वभूमीवर व त्यानंतर प्रतिघडी घडत राहिलेल्या साहित्यिक प्रतिक्रियांचा विचार करता पुनः एकदा दलित साहित्य चळवळीचा समग्र विचार करणे माझ्या सारख्या साहित्यातील दलित व प्रगत चळवळीशी बांधल्या गेलेल्या विचारवंताला काहीसे अपरिहार्य व आवश्यक वाटू लागले आहे.

"दलित साहित्या"वर अनेक प्रकारचे आक्षेप, अनेक अधिकारी व बिनअधिकारी व्यक्तींकडून घेतले जात आहेत. दलित साहित्याचा अधिक्षेपही काहीजणाकडून

साळसूदपणे होत असल्याचे जाणवते. हे घेतले जाणारे आक्षेप कोणत्या स्वरुपाचे आहेत? काही आक्षेप असे :

१. दलित साहित्यात म्हणण्यासारखे वाङ्मय तरी असे कितीसे निर्माण झाले आहे?

२. मराठी ललित साहित्यापासून दलित साहित्य असे वेगळे का व्हावे? ललित साहित्यातच दलित साहित्य अंतर्भूत नाही काय?

३. दलित साहित्य हे एका विशिष्ट जातीचे व पंथाचेच साहित्य मानावयाचे काय? मग त्यामुळे साहित्यप्रांतात एक सवतासुभा व नवा जातीयवाद निर्माण होणार नाही काय?

४. दलित साहित्याची बांधिलकी नेमकी आंबेडकरवादाशी आहे की मार्क्सवादाशी आहे?

वर वर पाहिले तरी असे दिसून येते की हे मराठीतील तथाकथित आक्षेपक 'दलित' या शब्दाच्या सोयीस्करपणे आपल्याला हवा तसा जातीयवाचक अर्थ, त्या शब्दाला दडपून, वेळोवेळी कटाक्षाने व निक्षून लावतात.

दलित साहित्यात वाङ्मय कितीसे निर्माण झाले असा प्रश्न विचारणाऱ्या धूर्त व अहंभावी आक्षेपकास विचारावेसे वाटते की एखादी वाङ्मयीन वा साहित्यिक चळवळ समाजजीवनात जेव्हा एका विशिष्ट ऐतिहासिक टप्प्यावर नेमकेपणाने उफाळून प्रस्थापित ललित साहित्याच्या चालू व अभद्र अवनत गदारोळातून स्वयंभूपणे आपले डोके वर काढते, तेव्हा तिची प्रत तिच्या साहित्यनिर्मितीच्या संख्यात्मकतेवर लावावयाची असते की तिच्या गुणात्मकतेवर? स्वतः यापैकी काही आक्षेपकानी डझनवारी पुस्तके लिहून मराठी ललित साहित्यात संख्येची फार मोठी भर घातलेली आहे. परंतु त्यांच्या या साहित्यनिर्मितीचा कस शोधून काढला तर काय दिसून येते? मानवी व पाशवी लिंगाभोवतीच विकृतपणे हे साहित्य आत्मसंभोग प्रवण होत, आत्म्याने नव्हे तर चामडीने व दमडीने बांधले गेलेले दिसते, ही वस्तुस्थिती आहे. काही वर्षापूर्वी, विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात (अंकल टॉम्स केबीन) या एकाच अमेरिकन कादंबरीने अमेरिकन वाङ्मय क्षेत्रात केवढी खळबळ माजवली होती, ही हे आक्षेपक अज्ञानाने किंवा हेतुःपुरस्सर विसरून जात असतात. उलट हेच आक्षेपक "रणांगण" ही मराठीतील एका लेखकाची एकुलती एक कादंबरी

अद्वितीय, अलौकिक व क्रांतीकारक ललितकृती म्हणून तिच्यावर भाष्यामागून भाष्य लिहीत असतात. युगनिर्माणक म्हणून तिचा गौरव करीत असतात, आणि तोही तिची कालसमक्ष ऐतिहासिकता बाजूला ठेवून, हे आक्षेपक अर्थातच एक वर्गीय व स्वत.तच स्वतःची सुखरुप असलेली (खुशाल) जातीय झापडपट्टी गांधारीप्रमाणे स्वतःच्या डोळयावर बौद्धिकतेच्या फसव्या बुरख्याखाली बांधून घेत असतात. वि. स. खांडेकर यांच्यासारख्या वयोवृद्ध, ज्ञान व जीवननिष्ठ लेखक व विचारवंतसुद्धा दलित साहित्याला दलित साहित्याची अशी पोचपावती देत असतानाच, "दलित-साहित्य हे नवीन नसून तसे ते जुनेच आहे" असे विधान करतो, तेव्हा त्या विधानातील अनैतिहासिकतेचे आश्चर्य वाटते. वि. स. खांडेकर नेमकी एक गोष्ट विसरून जातात व ती म्हणजे प्रचलित दलित साहित्याच्या उठावाला व विद्रोहाला अपरिहार्यपणे प्राप्त झालेली कालसापेक्षता व कालसमक्षता. "दलित साहित्य हे तसे जुनेच आहे" या विधानाचा अर्थ वर्तमानकालिन वाङ्‌मयवास्तवाशी कसा जुळवून घ्यायचा ? म्हणजे दलित साहित्य हेसुद्धा एका पारंपारिकतेलाच अनुसरून निर्माण होत आहे किंवा त्या पारंपारिकतेलाच त्याने शरण जावे असे श्री. खांडेकर यांना सुचवायचे नाही काय? तर दलित साहित्यात किती पुस्तके लिहिली गेली इथपासून तो दलित साहित्य हे नवे की जुने या विचारधारेपर्यंत जरी "दलितेतर" आक्षेपकांचा किंवा भाष्यकरांचा विचार केला तरी आढळून येते ते एवढेच की विसाव्या शतकाच्या वर्तमानकालीन ऐतिहासिकतेकडे ते जेवढी आपली पाठ व डोळे फिरवून बसतात, तेवढी त्यांच्या स्थितिशील डोक्यातील गोंधळ गडबड वाढत असतो.

दुसरा आक्षेप म्हणजे साहित्यापासून दलित साहित्य वेगळे का ? मला वाटते दलित साहित्य हे ललित साहित्यापासून केवळ गुणाने, आकृतीबंधाने, सर्जनक्षमतेने, व सौंदर्य जाणीवेने वेगळे आहे असा दावा स्वतः दलित साहित्यिकही करणार नाहीत. ही वस्तुस्थिती हे आक्षेपकही पूर्णपणे जाणतात व तरीही हा प्रश्न ते वर उल्लेखिलेल्या अनैतिहासिक डोळेझाकीने विचारीत असतात, मात्र प्रस्थापित व चालू मराठी ललित साहित्यात साहित्य निर्मितीच्या अंगाने जे घडत असते, त्यापेक्षा अगदी काहीतरी वेगळे, आशयवेगळे जीवनसापेक्ष व जीवनसमक्ष, दलित साहित्यात घडत असते . . . . . . मराठी ललित साहित्या-सारखे ते हरघडी बिघडत नसते. एवढे मात्र खरे आहे. म्हणजे गेल्या दशका दोन दशकाच्या दरम्यान मराठी ललित साहित्याच्या क्षेत्रात असे कितीसे व कायसे प्रक्षोभक घडले की जेणेकरून सभोवतालच्या मराठी साहित्याचे

वाचन करणारा समाज खळबळून उठला? की खाड्कन त्याची पारंपारिक जीवन व साहित्य मूल्यावर जोपासली गेलेली सामाजिक झोप (अंगाई गीतांनी आळविल्या जाणाऱ्या पाळण्यात गाढ झोपी गेलेल्या लाडावलेल्या बालका-प्रमाणे) उडाली? की तो हडसून खडसून जागा होऊन त्याला समाजांतराचा धक्का देणाऱ्या विस्फोटक घटनेकडे तो डोळे विस्फारून जागरूकतेने पाहू लागला.

असे जे काही घडले ते दलित साहित्यातील विद्रोहाच्या (रीव्हॉल्ट) अंगानेच घडले, ललित साहित्याच्या अंगाने नव्हे असे ठामपणे म्हणता येईल. ललित साहित्यात घडले ते कै. बा. सी. मर्ढेकरांनी पूर्वीच म्हणून ठेवल्या-प्रमाणे पाश्चात्यांच्या मध्यमवर्गीय पातळीवर जेवढे उसने घेता येईल तेवढचाच उसनवारीच्या किंवा अनुकरणाच्या पातळीवरच घडले. बरेचसे "फॅशन" व "पॅशन" म्हणूनही घडले. ते असे,—

(१) अर्स्किन कॉल्डवेल्डच्या धर्तीवर मुंबईतील झोपडपट्टीवर कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. पण त्या कादंबऱ्यामध्ये झोपडपटटीतील सामाजिक वास्तवापेक्षा झोपडपट्टीतील अमानुष, बीभत्स व विकृत लिंगवास्तवावरच अघळपघळ चवळटपणे लेखकांचे लक्ष केंद्रीत झाले होते. या कादंबऱ्याती कलानिर्मितीमूल्येसुद्धा कृत्रिम कारागिरीवर आधारलेली, कलाक्षीण, पंगू व हिणकस होती. मात्र या कादंबऱ्याच्या कुशल बाजारू व धंदेवाईक विद्यापिठीय पातळीवर चांगला दणकट उठाव (लाँचिंग) केला गेला.

(२) गोठलेल्या व गारठलेल्या लिंगाधिष्ठित व नमूल्याधिष्ठित तऱ्हेवाईक व आत्मनिष्ठ तंत्रवादाचा साहित्यिक आविष्कार घडून आला. त्याला विषमलिंगी संभोगाबरोबरच समलिंगी संभोगाचे व संभोगसदृश विकृतीचे वावडे नव्हते किंवा सोयरसुतकही नव्हते. समाजाच्या काही थरातील तरूण तरुणींची भंकसगिरी, व्यसनाधिनता, वैफल्य व "वासू" पणा या सडलेला वास्तवाला हे साहित्य थंडपणे जाऊन भिडते.

(३) मराठी ललित साहित्यात ऐतिहासिक कादंबऱ्यांना व नाटकांना आलेली अमर्याद उसळी. ऐहिक व भौतिक अशा वर्तमानकालीन वास्तवा-पासून वाचकांची मने भूतकाळातील जीर्णशीर्ण मध्ययुगीन जीवनमूल्या-भोवती गुरफटून व गोंधळून ठेवण्याची या लेखकानी केलेली साहित्यिक चालू कामगिरी. शिवाजीसारख्या क्रांतिकारकाचेसुद्धा मध्यमवर्गीय कारकून

प्रमुखाच्या धर्तीवर रंगभूमीवर झालेले पोकळ व हळवे पारंपारिक मूल्यगर्भ फसवे स्वभावचित्रण. चातुर्वर्ण्याधिष्ठित पेशवाईची रचण्यात आलेली मंगलस्तोत्रे, भारुडे, अचाट, अफाट व अगडबंब अशी अद्‌भुतरम्य कल्पिते, पौराणिक कादंबऱ्या, नाटकाबद्दलही तेच म्हणता येईल.

तर मग प्रस्थापित ललित साहित्यापेक्षा दलित साहित्याचे वेगळेपण कशात आहे, असा प्रश्न सहजच उपस्थित होतो. त्याचे निःसंदिग्धपणे संक्षिप्त उत्तर असे,——

(१) हे दलित वाङ्मय पद-दलितांच्या पीडित, विटंबित व शोषित जीवनाची युगवेदना सहसंवेदनेने व अंतरीच्या विद्रोही प्रक्षुब्धतेने जिवंत अशी साकार करते.

(२) या युगवेदनेने पिढ्यानपिढ्या व शतकानुशतके पिडलेल्या व पोळलेल्या व दलितांचे दळभद्री जीवन जगणेच ज्यांच्या वाट्याला आले, त्या वर्गातील पेटून व उफाळून निघालेल्या लेखकांकडून हे दलित साहित्य लिहिले जात आहे.

(३) हे साहित्य आपले जळजळीत जिवंत अनुभव जसे प्रक्षुब्धपणे अभिव्यक्त करते, तसेच ते आपली स्वतःची अशी लोकभाषा, लोकसाहित्याची चिवट व जिवट अशी धाटणी, व लोकजीवनात रुजलेली, लोकमय व जीवनमय झालेली शब्दसंहिता, अर्थसंकेत व जीवनप्रतिमा समृद्ध विविधतेने पोटीपाठी घेऊन मगच कागदावर उतरते.

(४) या दलित साहित्यातील विटंबित, पीडित, वर्ण व संस्कृती भ्रष्ट असा माणूससुद्धा प्रारंभी व अखेरीलासुद्धा खराखुरा, जिवंत व जगण्यावर अपार श्रद्धा व प्रेम असणारा धीरोदात्त व निरोगी माणूस असतो. उलट प्रस्थापित ललित साहित्यातील धीरोदात्त म्हणून चित्रित केलेला (स्त्री, पुरुष) माणूससुद्धा अंतर्यामी रिकामा, पोकळ, मूल्यदरिद्री, विकृत व रोगट म्हणूनच चित्रित होत असतो. अर्थसंपन्न उच्चमध्यम-वर्गीयांच्या सडलेल्या, स्थिरगती व शून्यचैतन्य समाजवास्तवाची झिंग घेऊनच तो वाङ्मयात अवतरत असतो.

(५) दलित साहित्याने दलित, शोषित, श्रमजीवी, व आजवर पंगू व मूक झालेल्या तळवर्गीय स्त्रीपुरुषांना आपल्या कथा कादंबऱ्याचे नायकत्व

दिले आहे. हा नायक किंवा नायिका अत्यंत हीन, दबलेले, सर्वस्वी प्रतिकूल व सर्व संघर्षणात्मक जिणे जगत असूनही त्याच्या "उद्या" बद्दल तो आशावादी आहे. तो मनाने, व चित्शक्तीने पराभूत होण्याचे संपूर्णपणे नाकारतो. अगदी याच्या उलट अशी अवस्था प्रस्थापित ललित साहित्यातील पांढरपेशा, व्युत्पन्न, सुखासीन व संस्कृतीक्षम नायक नायिकांची झालेली असते. या साहित्यातील लिंगविकृतीला आपल्या पॉश प्लॅटमध्ये एकाकी जीवन जगणाऱ्या (अलायनेटेड) म्हातारा म्हातारीच्या लिंगलिलांचे वास्तवसुद्धा वेड लावीत असते.

(६) दलित साहित्य हे समाजोन्मुख, समाजाशी अंतर्बाह्य निगडित झालेले व समाजाची संपूर्ण बांधिलकी स्वीकारणारे मानवनिष्ठ व समाजनिष्ठ साहित्य आहे. त्याची समाजनिष्ठा ही कोणा एका विशिष्ट वर्गापुरती वा व्यवस्थेपुरती संकुचित नसून ती विश्वव्यापक मानवाएवढीच विश्वस्पर्शी व विश्वसंभूत आहे. ती श्रमजीवी, उपेक्षित, वर्णाधिष्ठित व समाजव्यवस्थेला बळी पडलेल्या व पडणाऱ्या विश्वमानवाशी आपले युगा-युगाचे नाते मानणारी द्रष्टी व चिरंजीवी श्रद्धा आहे.

(७) म्हणूनच उंदरीणीच्या विणीसारखे प्रतिक्षणाला विपुल प्रमाणात निर्माण होत राहिलेले प्रस्थापित ललित साहित्य (काही अपवाद अर्थातच सोडून दिल्यावर) निर्मितीचा डोंगरासारखा ढीग नजरेसमोर उभा करीत राहूनही थिटेच व लुळेपपांगळे वाटते तर संख्येने कदाचित अल्प असूनही, पसाभर किंवा पोतडीभर वाटणारे दलित साहित्य झपाट्याने आकाशगामी व विश्वगामी झेप घेणारे व तथाकथित ललित साहित्याच्या पुरस्कर्त्यांची झोप उडवून लावणारे मानवी आशावादाच्या, मानवावरील अमर्याद श्रद्धांच्या व त्यांच्या अंतिम विजयाच्या उत्तुंगतेकडे वाटचाल करणारे जीवनपुष्ट व धारणाउंच साहित्य वाटते.

दलित साहित्यावर घेतला जाणारा तिसरा आक्षेप म्हणजे हे साहित्य विशिष्ट जातींचे किंवा पंथाचेच मानावयाचे काय? आज हे साहित्य एका विशिष्ट जाती वा पंथाकडूनच (दुर्दैवाने चातुर्वर्ण्याधिष्ठित समाजरचना अजूनही चालू असल्यामुळे हा शब्दप्रयोग टाळता येत नाहीय्) लिहिले जाते ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकीच सत्य आहे हे. जितके स्वाभाविक आहे तितकीच ती एक ऐतिहासिक व सामाजिक (साहित्यकही) अपरिहार्यता आहे, हेही उघडच

आहे. किंबहुना या पंथातही "दलित" या शब्दाभोवती नव्या जुन्या सांप्रदायिकतेचे पुराणाधिष्ठित, व्यक्तिनिष्ठ व आपमतलबी संकुचित वादंग माजून राहिलेले आज दिसून येत आहे. विकसित, शिक्षणक्षम व स्थानसंपन्न दलितवर्गातही "डी. बी." किंवा "दलित ब्राम्हण" हा शब्दप्रयोग रूढ होऊ पहात आहे. किंवा अगोदरच तो रूढही झाला आहे. परंतु म्हणूनच हे वाङ्मय केवळ एका दुराग्राही जातीयतेचेच द्योतक किंवा प्रतीक आहे असे म्हणता येणार नाही. असे जे कुणी म्हणतात ते एक ढोंगीपणाचा विश्वामित्री पवित्रा घेतात असे ठामपणे म्हटता येईल. कदाचित जे "दलित" साहित्य असे क्षुद्र जातीयवादी, संप्रदायबद्ध व पोथीनिष्ठ "दलित" या सामाजिक व साहित्यिक संज्ञेला अपात्र ठरल्यावाचून राहणार नाही. दुर्दैवाने दलित साहित्याची गेल्या दशकात जी तीन चार महत्वपूर्ण साहित्यसंमेलने व साहित्य मेळावे भरले, त्याच्या व्यासपिठावरून दलित साहित्यक्षेत्रातील ज्या महनीय व्यक्तींनी ऐतिहासिक स्वरूपाची भाषणे केली, त्यातून वरील आक्षेपाला त्यांनी परखड, वस्तुनिष्ठ व नेमके उत्तर दिले आहे. त्यांच्या या भाषणाची "ठणठणपाळी" खिल्ली उडविण्यापेक्षा, आक्षेपकानी या भाषणाचा नीट अभ्यास केला तर ललित साहित्याचा वर्तुळातच भोवंडत राहिलेला ग्रंथअपुरा विचारदेखील वर्तुळाबाहेर पडू शकेल व दलित साहित्यातच पण त्याच्या स्वयंभू वेगळेपणासह स्वीकारू शकेल, अर्थातच त्यामुळे ललित साहित्याचीही व्याप्ती वाढल्यावाचून राहणार नाही.

शेवटचा एकच आक्षप विचारात घेऊन मी माझी दलित साहित्याच्या विचार प्रक्रियेवरील लेखणी तात्पुरती थांबविणार आहे. मराठीत आज प्रवाहीत व गतिमान झालेल्या ललित साहित्याची प्रेरणा डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याशीच निगडित आहे हे चिरंतन असे ऐसिहासिक सत्य आहे. त्याची वर्तमानकालीनता जितकी खरीखुरी व दलित समाजसापेक्ष आहे तितकीच ती "दलित" निरपेक्ष अशी संकुचित जातीयतेच्या व संप्रदायाच्या पलिकडेही जाणारी आहे. खुद्द डॉ. बाबासाहेब आंबेडकर, महात्मा फुले यांना महाराष्ट्रातील समाजप्रबोधनाचा अग्रदूत मानतात व त्यांना गुरुपद देतात. तत्कालीन विश्वातही जे काही पुसट, अस्पष्ट व धावते असे निग्रोच्या मुक्तीलढ्याचे पडसाद महात्मा ज्योतिरावांच्या कानी पडले त्यांनी प्रभावित होऊनच आपले "गुलामगिरी" हे पुस्तक फुले निग्रो चळवळीला अर्पण करतात. अशा रीतीने दलित साहित्याची प्रेरणा ही मूलतःच वर्ण, वर्ग व रंग व्यवस्थेपलीकडे जाणारी

मानवकेंद्रित व मानवगामी विसाव्या शतकाची विश्वप्रेरणा आहे केवळ ती प्रेरणा सोयीस्करपणे एखादा आंधळा "आंबेडकरवाद" निर्माण करून त्या "वादा" भोवतीच गुरफटून टाकणे हे तितक्याच सोयीस्करपणे "मार्क्सवादाला" आंधळे संकुचितत्व देऊन पोथीबद्ध करणाऱ्या स्वार्थी "मार्क्सवादी" संप्रदाया-प्रमाणेच परिणामी "दलित" साहित्याच्या पुढील क्रांतिग्रामी वाटचालीला घातक व मारक ठरणार आहे. विज्ञाननिष्ठ शास्त्रीय व गतिमान मार्क्सवाद हे एकोणिसाव्या व विसाव्या शतकाचे क्रांतिगर्भ व क्रांतिनिष्ठ असे मानवी, भौतिक व सामर्थ्यशाली तत्त्वज्ञान ठरले आहे. त्याला भूतकालीन व वर्तमान-कालीन इतिहासाची जशी साक्ष आहे तशीच भविष्यकाळाचीही क्रांतिगामी सोबत रहाणार आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी क्रांतिकारी निष्ठेने स्वीकार-लेल्या बुद्धप्रेरणेमागील विज्ञाननिष्ठ भौतिकतेची वास्तवता व अपरिहार्यता मार्क्सवादाच्या भौतिकतेतील विज्ञानवास्तवाला व अपरिहार्यतेलाच येऊन भिडणारी आहे, हे कुणालाही डोळसपणे नाकारता येणार नाही. आंबेडकरी व मार्क्सवादी प्रेरणा या जितक्या क्रांतिगर्भ, क्रांतिगामी व क्रांतिप्रवण आहेत तितक्या व त्या प्रमाणात "दलित साहित्या" च्या प्रेरणा व बांधिलकी या क्रांतिगर्भ व क्रांतिप्रवण अशा आहेत. केवळ आंबेडकरवादातून मार्क्सवाद वजा करून किंवा मार्क्सवादातून आंबेडकरवाद उणे करून "दलित साहित्या" चे मतलबी समीकरण मांडणारे तथाकथित बुद्धिमंत फक्त आत्मवंचनाच करतात असे नाही तर साहित्यद्रोह व समाजद्रोहही कळत नकळत त्यांच्या हातून घडत असतो असे म्हणता येईल. आणि त्यामुळे सम्यक् परिवर्तनाकडे जाऊ पाहणाऱ्या "दलित साहित्या" च्या प्रवाही स्वयंपुष्ट व कालसमक्ष व काळसमर्थ चळवळीतच "बिघाड" घडून येण्याचा धोका निर्माण होतो.

परंतु हा बिघाडही क्षणजीवी ठरणारी चिन्हें "दलित साहित्या" च्या संघटनात्मक व्यापक दृष्टीचा व पुरोगामीत्वाचा विचार करता दिसून येत आहेत असे आशावादीपणाने म्हणावेसे वाटते. प्रस्थापित ललित साहित्य हे कुणी ब्रम्ह नसून "दलित साहित्य" हे काही त्याची माया नव्हे. दलित साहित्य ही एका दारुण युगसाहित्याची युगघोषणा करणारी युगप्रेरणा व युगधारणा आहे. ही धारणा व प्रेरणा घेऊन येणारे दलित साहित्य मराठी ललित साहित्यात आज केवळ स्थिरावलेच नाही तर दाहीदिशानी ते गतिमान होऊ पहात आहे. भगवान बुद्धानें आपल्या शिष्यांना दिशादिशानी जात राहण्याचा व दिशाहीन-तेला टाकून, दिशा धुंडाळण्याचा संदेश दिला होता. अशा दिशादिशा धुंडा-

ळण्याचा दलित साहित्याकडून व साहित्यिकाकडून जितका युग निर्माणक व मानवकेंद्रित प्रतिभाशाली आविष्कार नवे संकेत नव्या प्रतिमा, नवे आदर्श व नव्या निष्ठा निर्माण करीत, होत राहील, तोवर ते युगप्रमाण व युग-सफल होत राहिलच. दलित साहित्य म्हणूनच आज मराठीतील प्रस्थापित ललित साहित्य व स्थापितत्वाकडून क्रांतिकारी गतिमानत्वाकडे नेणारी या साहित्याची अपरिहार्यता व अंतिम नियती ठरल्यावाचून राहणार नाही.

('निकाय' जून-जुलै, १९७६)

# निग्रो वाङ्मय व दलित वाङ्मय

* प्रा. जनार्दन वाघमारे

निग्रो वाङ्मय आणि दलित वाङ्मयाचा तौलनिक अभ्यास केल्यास तो फारच उद्‌बोधक ठरेल यात शंका नाही. आणि आपल्याला तशा प्रकारचा प्रयत्न निग्रोनीं व दलितांना आपापल्या देशात जगावे लागलेल्या जीवनाचा मागोवा घेतघेतच करावा लागेल. निग्रो हा मूळचा अमेरिकन नाही. युरोपच्या वेगवेगळ्या विभागातील लोकांनी अमेरिकेत येऊन आपल्या वसाहती स्थापिल्या. स्वतंत्र व संपन्न जीवनाच्या शोधात त्यांनी अमेरिकेचा किनारा गाठला. निग्रो हा स्वतंत्र व संपत्तीच्या शोधात अमेरिकेला गेला नाही. त्याला जबरदस्तीने तेथे नेण्यात आले. आणि अमेरिकेने त्याला भयंकर गुलामी व प्रचंड दारिद्र्य दिले. आपली भाषा, आपली संस्कृती, आपला इतिहास आणि एकंदर आपला सर्व आफ्रिकन वांशिक वारसा त्याला सोडावा लागला. आफ्रिकन शरीर आणि आफ्रिकन मन ह्या दोनच गोष्टी त्याच्याजवळ शिल्लक राहिल्या. कालांतराने त्याच्या शरीरात श्वेत रक्ताने प्रवेश केला आणि श्वेत संस्कृतीने त्याच्या मनाचा ताबा घेतला. त्याची आफ्रिकन नाळ ही नियतीने नेहमीसाठीच तोडून टाकली. आफ्रिकेचा किनारा त्याला पुनः कधीच गाठता आला नाही. गार्व्हेसारख्या निग्रो नेत्यांनी त्याला आफ्रिकेत आणण्याच्या योजना आणल्या. पण त्या बारगळल्या. श्वेतानीही त्याला आफ्रिकेत पाठविण्याचा विचार केला पण यश आले नाही. आफ्रिकेविषयी त्याला कुतुहल व आकर्षण खूप वाटत आले यात शंका नाही. "व्हाट इज आफ्रिका टु मी" या प्रश्नाचे उत्तर त्याने शोधायचा प्रयत्न केला. आफ्रिकेने त्याच्या जीवनाला खूप आशय दिला यातही काही शंका नाहीं. पण तो सर्वार्थानें आफ्रिकन राहिला नाही. श्वेतांची भाषा, संस्कृती व वेष यांचा त्याला स्वीकार करावा लागला. परंतु त्याला श्वेतांचा धर्म आणि संस्कृतीमध्ये बरोबरीचा वाटा मिळू शकला नाहीं.

विषमतेच्या खाईत तो पडला व भाजला गेला. श्वेत समाजाने त्याच्या-वर बहिष्कार लादला. त्याला नेहमीच घाणेरडी कामे करावी लागली. श्वेताच्या

वस्तीत त्याला राहता आले नाही. एक एका वेगळ्या अर्थानें त्याला श्वेतांच्या गावकुसाबाहेर जगावे लागले. अमेरिकन संस्कृतीने त्याला समाजाच्या तळातील 'प्लेस" दिली ती "प्लेस" त्याला इच्छा असूनही सोडता आली नाही, बदलता आली नाही. निग्रो गुलामीचे वर्णन "अ पिक्युलर इन्स्टिटयूशन" या शब्दात केले जाते.

या उलट भारतीय दलित हा बाहेरच्या देशातून आलेला नाही. वांशिक-दृष्टया तो इतर बहुसंख्य भारतीयापेक्षा वेगळा नाही. इतरांची भाषा, धर्म संस्कृती, इतिहास त्यांच्यावर लादलेला नाही. पण असे असतांना देखील तो या देशाचा "वतनदार" बनला नाही आणि या देशातील संस्कृतीचा "मालक" ठरला नाही. अनेक शतकापासून त्याला आपल्या संस्कृतीच्या, धार्मिक व सामाजिक जीवनाच्या बांधणीत व विकासात बरोबरीचा हिस्सा मिळू शकला नाही. या देशाचा तो वारसदार असूनही त्याला वारसहक्क प्राप्त झाला नाही. निग्रोप्रमाणे आपला देश सोडून जाण्याचा प्रश्न त्याच्यासमोर कधीच नव्हता. तो या देशाचा. पण हा देश त्याचा कधीच होऊ शकला नाही. म्हणून आंबेडकर म्हणाले, "गांधीजी, आय हॅव नो होमलॅन्ड" या देशात आपण उगीच जन्म घेतला असे त्याला वाटले. बाबुराव बागुल म्हणतात,--

"ज्यांनी केली चूक इथे जन्म घेण्यांची, त्यांनीच ती सुधारली पाहिजे, देश सोडून। अथवा युद्धे करून।"

पण त्याला हा देश सोडता येत नव्हता. त्यांच्यापुढे प्रश्न होता. "व्हाट इज इंडिया टु मी?" या प्रश्नाचा आशय तो सध्या आपल्या वाङ्मयात शोधतो आहे. निग्रोप्रमाणे तोही विषण्णतेच्या खोल दरीत पडला व नेहमीसाठी रक्तबंबाळ झाला. त्यालाही आपल्या वरिष्ठांची हलकी व घाणेरडी कामे करावी लागली. सवर्णांच्या वस्तीत त्याला राहण्यासाठी जागा मिळाली नाही. त्याचे ठिकाण गावकुसाबाहेर. त्याचा स्पर्श विटाळणारा आणि सावलीही. भारतीय संस्कृतीने त्याला अगदी समाज जीवनाच्या अगदी तळावरील "पायरी" दिली. शतकानुशतके त्याच "पायरी" वर तो बसला, झोपला व उठून बसला, उभा राहिला. इच्छा असूनही त्याला ती "पायरी" सोडता आली नाही बदलता आली नाही, वर्णव्यवस्थेने निर्माण केलेल्या अस्पृश्यतेचेही वर्णन "अ पिक्यूलिअर इन्स्टिटयूशन" शब्दातच करावे लागेल. अस्पृश्यतेच्या काळोखाचा तो अनेक शतकाचा कैदी म्हणून जगतो आहे. मनूने तयार केलेल्या जाती व्यवस्थच्या लाक्षागृहात पिढयान्‌पिढयापर्यंत तो जळत राहिला आहे.

अमेरिकन निग्रो आणि भारतीय दलित आपापल्या देशातील "बंद" समाजाचे घटक आहेत. दोघांनाही विशिष्ट अशा "वर्णव्यवस्थेचे बळी बनावे लागले आहे." निग्रो हा वांशिक स्वरूपाच्या वर्णव्यवस्थेचा बळी आहे तर अस्पृश्य जाती स्वरूपाच्या. वंश हा निसर्गनिर्मित आहे तर जात मनुष्यनिर्मित. निग्रोंना आपल्या चामडीचा वर्ण बदलता आला नाही आणि अस्पृश्यांना आपल्या जातीचा. चामडीचा रंग व जात यांच्यातून निर्माण झाले झालेल्या "अमंगळ" भेदास माणूसच जबाबदार आहे. कधी कधी अगदी गौरवर्णीय निग्रोने आपण निग्रो आहोत हे लपविण्याचा प्रयत्न केला. त्याप्रमाणे अस्पृश्याने आपली "जात" चोरण्याचा प्रयत्न केला, पण दोघांचेही प्रयत्न सपसेल फसले. निग्रोंची अमेरिकेतील "प्लेस" आणि अस्पृश्यांची भारतातील "पायरी" यात कसलाच फरक नाही. आणि म्हणून दीर्घकालपर्यंत दोघेही आत्महीनतेच्या व आत्मतिरस्काराच्या भोवऱ्यात सापडले. दोघांनाही कर्मवादाच्या कारावासात बंदिस्त ठेवण्यात आले. हा बंदिवास टिकविण्यासाठी श्वेतांनी बायबलमधील काही मिथ्यसत्त्वां व प्रतिकांचा आधार घेतला तर सवर्णांनी वेद आणि मनुस्मृतीचा.

अशा असहाय अवस्थेत काय करावे? देवावर भार लोटून जगावे व दुःखभोग त्यालाच सांगावा. एक निग्रो गुलाम म्हणतो,--

"इन् द लॉर्ड
इन् द लॉर्ड
माय सोल हॅज बीन ॲकोर्ड
इन् द लॉर्ड.

शेवटी हे आपल्याच कर्माचे फळ आहे, असे मानावे. जीवनातली अगतिकता, सहनशक्तीच्या बाहेर गेलीच तर, मृत्युला पाठवून आपली सुटका करील, अशी आशा करावी. असाच एक दुसरा निग्रो गुलाम म्हणतो,---

"माय लॉर्ड, ही कॉल्स मी
ही कॉल्स मी बाय दी थंडर
दी टॉरम्पेट साऊंडस विदीन, माय सोल."

आणि नशिबी आलेल्या जीवनाविरुद्ध "प्रोटेस्ट" नोंदवायचा असेल तर तोही देवाजवळ. कर्म तो असा नोंदवतो,---

आमची केली हीन वानी। तुज का न कळे श्रीपती॥
जन्म गेला उष्टे खाता। लाज न ये तुमचे चित्ता॥

तरी परंतु कर्मावरचा विश्वास कसा सोडावा? म्हणून चोखा महार म्हणतो,—

आमुचे संचित जैसे जैसे आहे। तेथे तो उपाय न चले काही ॥
कर्माचे संचित प्रारब्धाचा भोग । न सुटे भागाभाग निढळीचा ॥

प्रारब्धाचा भोग म्हणून मी महाराच्या पोटीं जन्मलो हे त्यांचे आत्मसमाधान. पण पूर्ण आत्मसमाधान लाभत नाही. एक निग्रो ब्लुजगायक म्हणतो,—

"व्हाट डीड आय डु
टु बी सो ब्लॅक
अॅण्ड ब्ल्यू?"

या प्रश्नाचे उत्तर त्याला सापडत नाही.

निग्रोंच्या शारीरिक छळाला मात्र जगाच्या इतिहासात तोड नाहीं. त्यांचा वंशविच्छेद करण्याचाच श्वेतानी प्रयत्न केला. त्याचा क्रयविक्रयही झाला गुलामीच्या काळात निग्रो स्त्रीवर अधिकार सांगण्याचेही निग्रो पुरुषाला धाडस झाले नाहीं. आणि म्हणून त्याची कुटुंबव्यवस्था उद्ध्वस्त झाली आणि आजही त्याला आपल्या कौटुंबिक जीवनाचे पुर्नवसन नीटपणे करता आले नाही. गुलामीचा काळ संपल्यानंतर कुक्लक्सक्लॅन सारख्या दहशतवादी श्वेत संघटनाने हजारो निग्रोना सार्वजनिक ठिकाणी विटंबना करून मारून टाकले. ते भूमिहीन व असुरक्षित असल्यामुळे दक्षिणेला राम-राम ठोकून उत्तरेला गेले. लाखोंच्या संख्येने उत्तरेतील शहरात त्याच्या नशिबाला "घेट्टो" तील घाणेरडे जीवन आले. तरीपण ते धडपडले त्यांनी शिक्षण घेतले. मुक्तीलढे लढवले. दैववाद सोडला. ते प्रक्षोभक झाले आणि आजचा निग्रो "ब्लॅक इज ब्युटिफुल" असे आत्मविश्वासाने सांगू लागला आहे.

भारतातील अस्पृश्यांचीदेखील अशाच प्रकारची कहाणी आहे. निग्रोइतका त्याचा शारीरिक छळ झाला नाहीं हे खरे आहे. निग्रोप्रमाणे त्याचा भरबाजारात क्रयविक्रय झाला नाही हेही खरे आहे. त्याची कुटुंबसंस्था उद्ध्वस्त झाली नाही. मात्र त्याचा मानसिक छळ खूपच झाला आहे. त्याला शिक्षण घेता आले नाही. आज जो शिकतो आहे, त्यानेही मुक्ती लढयात भाग घेतला तो प्रक्षोभक व विद्रोही बनला आणि गेल्या पंचवीस वर्षात ग्रामीण भागातून तो तोंड देतो आहे. १९६७ ते १९७० या काळात १,१०० अस्पृश्य मारण्यात आले आहेत. पण आजचा दलित तरुण क्रांतिकारी बनला आहे. नव्या जाणिवा घेऊन तो वाटचाल करतो आहे. आपली अस्मिता शोधण्याचा

व साहित्यातून आपला आविष्कार करण्याची धडपड करतो आहे. अमेरिकन निग्रो आणि भारतीय दलित यांच्या जीवनाची वाटचाल ही अशी आहे. त्याचे अनुभव हे अशा प्रकारचे आहेत. निग्रोचे जीवन त्याच्या वाङ्मयामध्ये बऱ्याच मोठ्या प्रमाणात चित्रित झाले आहे. विविध वाङ्मयकार लेखकांनी चांगल्या प्रकारे हाताळले आहेत. त्यांची कविता, कथा, कादंबरी आता बरीच प्रगल्भ व समृद्ध झाली आहे. गद्य लिखाणातही त्यांनी बरीच मजल मारली आहे. नाटयक्षत्रातहि त्यांनी आता डोळ्यात भरण्याजोगी प्रगती केली आहे. निग्रो जीवनाला "समग्र" अनुभव त्यांच्या वाङ्मयात आता चांगल्या प्रकारे आविष्कृत झाला आहे. निग्रो वाङ्मयाने आपल्या पाऊलखुणा निर्माण केल्या आहेत. त्याने खूप मोठा पल्लाहि गाठला आहे. निग्रो कविता अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात जन्मली. दोनशे वर्षाच्या उन्हा-पावसात आणि वाऱ्या-वादळात ती वाढली आहे. निग्रोचे लोकवाङ्मयतर फारच जुने आणि समृद्ध आहे. संगीताच्या बाबतीत तर त्यांची बरोबरी श्वेतांना करता आलेली नाही. निग्रोंच्या कादंबरीनें देखील एक शतकापेक्षा अधिक वाटचाल केलेली आहे. १८५३ साली विल्मय वेल्स प्राऊनची "क्लोटेल ऑर दी प्रेसिडेंटस् डॉक्टर" ही कादंबरी प्रसिद्ध झाली. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटपर्यंत निग्रो वाङ्मयाच्या निर्मितीचा वेग मंद होता. पुढे तो फार मोठ्या प्रमाणात वाढत गेला.

ज्यावेळी निग्रोना आपली वाङ्मयनिर्मिती करण्यासाठी लेखणी चालवता आली नाही, त्या काळी श्वेतानी त्यांचे जीवन आपल्या वाङ्मयात आणण्याचा प्रयत्न केला आणि पुष्कळदा त्यांनी निग्रोजीवन आपल्या वाङ्मयातून विकृत स्वरूपात आणले. काहींनी तिरस्काराच्या भावनेने निग्रो चित्रित केला आणि काहीनी भूतदयावादी दृष्टीने. "अंकल टॉम्स केबिन" या कादंबरीने संबंध अमेरिकेला अश्रु ढाळायला लावले. विसाव्या शतकात तर अनेक समर्थ लेखकांनी निग्रो हाताळला. युजिना ओनिल, विल्यम फॉकवर, मार्कट्वेन, यांची नांवे प्रामुख्याने घ्यावी लागतील.

दलित वाङ्मयाची वाटचाल मात्र अद्यापि फारशी झालेली नाही. अस्पृश्याच्या जीवनातला "समग्र" अनुभव अद्याप त्यांच्या साहित्यात उतरलेला नाही. साहित्य ही समाजाची जीवनकथा असते. दलित समाजाची जीवनकथा अद्याप फार मोठ्या प्रमाणात अकथितच आहे. गेल्या १५–२० वर्षापासून दलित वाङ्मयाच्या वाटचालीला गती येऊ लागली आहे. त्यांच्या कथा, कविता

जेमतेम ५०-६० वर्षांपूर्वी जन्मली. अस्पृश्यांचे लोकवाङ्मय अद्याप आलेले नाही. त्यांच्या लोकसाहित्याची निर्मिती किती प्रमाणात झाली हे अद्याप कळलेले नाही. थोडक्यात दलित जीवनाचा कलात्मक आविष्कार पुरेसा प्रमाणात झालेला नाही.

अमेरिकेतील श्वेत लेखकांनी निग्रो जीवन आपल्या वाङ्मयात चित्रित करण्याचा जसा प्रयत्न केला तसा येथील उच्चवर्णीय हिंदू लेखकांनी मात्र केलेला नाही. अपवादात्मक काही लेखक सापडतीलही. अस्पृश्य हा हिंदू समाजात जसा उपेक्षित व बहिष्कृत राहीला आहे तसाच तो आजच्या साहित्यात देखील राहीला आहे, अस्पृश्य हा हिंदू समाजातील "रिजेक्टड" माणूस आहे. ह्या माणसाला ब्राह्मणी साहित्यात कुठलीच "पायरी" मिळाली नाही. दलित जीवनाचा आविष्कार करण्यासाठी भारतात अद्याप युजिन ओनिल किंवा फॉकनर जन्माला यावयाचा आहे. या गोष्टींची दलित मनाला फार मोठी खंत वाटते आणि म्हणून हिंदू सामंतशाही शब्दप्रभूंना उद्देशून वामन निंबाळकर म्हणतात,--

"ह्या गावकुसाबाहेरचे वाळलेले, चिरडलेले जीवन
विषय झालाय नाही तुमच्या कवितेचा"

आणि ते विचारतात,--

"कळवळली नाहीत कशी तुमची मने?
कसे लिहिले नाही तुम्ही त्यांच्या आसवांचे गाणे?"

अस्पृश्यांच्या जीवनाकडे, डोळ्यावर झापड घालूनहि उच्चवर्णीय साहित्यिकांनी पाहिले नाही. रामराज्याची स्तुती गाणाऱ्या महाकवी वाल्मिकीला संबोधून दया पवार म्हणतात,--

"हे महाकवे।
तुला महाकवी तरी कसे म्हणावे?
हा अन्याय अत्याचार वेशीवर टांगणारा
एक श्लोक जरी तू रचला असतास .....
...... तर तुझे नांव काळजावर कोरून ठेवले असते ..."

मराठी साहित्य परिषदेसारख्या साहित्याच्या भवितव्याची काळजी वाहणाऱ्या संस्थेनेही दलित जीवनाचा साहित्यनिर्मितीच्या दृष्टीने विशेष विचार केलेला नाही. मराठी साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावरून पुष्कळदा अवाङ्मयीन गोष्टींचा देखील खूप काथ्याकूट झालेला आहे. पण मराठी साहित्यात अस्पृश्यांचे

जीवन का येऊ शकले नाही." आणि ते कसे आणता यईल याची चर्चा झाल्याचे कधी ऐकवीत नाही. दलितांच्या मुक्तींचा लढा लढणाऱ्या फुल्यांच्या काळात शाहू महाराजांच्या काळात आणि खुद्द डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या काळात कोणत्याहि साहित्यिकाने किंवा साहित्यपरीषदेने दलित जीवनाची दखल घेतली नाही, मला वाटते १९७० साली भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात प्रथमच दलित साहित्याचा उल्लेख केला गेला. पण या साहित्य संमेलनाला तशी दखल घ्यावीशी वाटली नाही. कारण दलित साहित्याची चर्चा "अस्मितादर्श" ने सर्वप्रथम १९६७ पासूनच सुरू केली होती. दलित कथा कादंबरींचे पहिले शिलेदार अण्णाभाऊ साठे, ना. रा. शेंडे आणि शंकरराव खरात हे आहेत. दलितांच्या व्यथा आणि वेदनेला वाचा फोडण्याचे व साहित्यिक सर्जन करण्याचे काम या लेखकांनी चांगल्याप्रकारे केले आहे. खरात आणि अण्णाभाऊंनी दलित कादंबरी चांगल्या प्रकारे हाताळली आहे. या लेखकांच्या कथा कादंबऱ्याचा दलित हा नायक बनला. दलित जीवनातली अगतिकता, लाचारी, प्रक्षोभ, चीड आणि दाहकता. या सर्व गोष्टी या लेखकांच्या वाङ्मयात उतरल्या अण्णाभाऊंची "फकिरा" व "वारणेचा वाघ" या दोन कादंबऱ्या तर मराठी वाचकांना सर्वपरिचित झाल्या. खरातांना "माणुसकीची हाक" आणि "बलुतेदार" या साहित्यकृतींनी प्रसिद्धी दिली. किसन फागू बनसोड यांनी मुक्या दलित व्यथेला ५०–६० वर्षापूर्वी आपल्या कवितेतून बोलायला व गायला लावले.

अमेरिकन निग्रो साहित्याने खरी प्रगति केली पहिल्या महायुद्धानंतर. त्या आधी पॉल लॉरेन्स डनबार, चार्लस् चेस्टनट आणि जेम्स वेल्डन जॉनसन यांनी कविता व कादंबरीत डोळयात भरण्याजोगी चुणूक दाखवली. १९२० ते १९३० या काळात कलासक्त निग्रोमनाचे खूप कंगोरे दाखवले, निग्रोंच्या समाज जीवनात कला व समाज प्रबोधनाची एक तारच उसळली. याच काळात "नवा निग्रो" पुढे आला. तरुण लेखकाच्या वतीने लॅग्स्टन ह्यूज या कवी व कादंबरीकाराने निग्रो साहित्याचा जाहीरनामा निवेदन केला तो असा,..

"वुई यंगर निग्रो आर्टिस्टस् व्हू क्रिएट नाऊ इन्टेन्ड टु एक्स्प्रेस ऑवर इन्टिव्हयुनल डार्क स्कीन्ड सोल्व्हज् व्हिदाउड पिअर ऑर शेम इफ व्हाइट प्युपल आर प्लीज्ड, वुई आर ग्लॅड. इफ दे आर नॉट इट वुई डझनॉट मॅटर. नाव वुई आर ब्युटिफुल."

आतापर्यंत निग्रो वाङ्मय गौरवर्णीय होत. काळ्या शरीरातील श्वेत मनच त्यातून व्यक्त होत होते. ते मवाळ होत. निग्रो लेखकांनी आता आपल्या विशिष्ट बोलीत आपले जीवन रंगवायला सुरवात केली. निग्रोच्या काळ्या कातडीवर व मनावर "व्हाइट वॉश" देण्याचा त्यांनी विचार सोडला. १९४० मध्ये रीचर्ड राईटची "नेटिव्ह सन" ही कादंबरी प्रकाशित झाली. शिकागोच्या घेट्टो जीवनावरील या कादंबरीने रिचर्ड राईटला अमेरिकेचा डॉस्टोव्हस्की बनवले. या कादंबरीतील विद्रोही निग्रो नायकाने अमेरिकन संस्कृतीला फार मोठा धक्का दिला. निग्रोच्या विद्रोही साहित्याची सुरुवात खऱ्या अर्थाने या कादंबरीपासून होते. १९५२ साली राल्फ एलिसनची "इन्व्हिजिबल मॅन" ही कादंबरी प्रसिद्ध झाली. या कादंबरीने निग्रो जीवनातला साडेतीन शतकांचा अंधार प्रकाशात आणला आहे. कलात्मक दृष्टया ही कादंबरी फारच सामर्थ्यवान आहे. नियतीशी झुंज देणाऱ्या जेम्स बॉल्डविन यानीही याच काळात निग्रो जीवनातला दाहक प्रक्षोभ आपल्या अतिशय सामर्थशाली लेखणीने वाचकांच्या प्रत्ययास आणून दिला. विशेषतः "गो टेल इट ऑन दी माऊंटन" आणि "अनादर कन्ट्री" या दोन कादंबऱ्यानी बॉल्डविनला "लीजेन्ड" बनविले. लॉरेन हॅसबरी नांवाच्या लेखिकेने "अरसिंग इन् द सन" या नाटकाद्वारे नाटयक्षेत्रात अलोट प्रसिद्धी मिळविली. ग्वेंडन बुक्स या कवियित्रीला पुलिट्झर पारितोषिक मिळाले आणि आता विल्यम डेंबी, जॉन विल्यम्स, मेलविन केली, ल रॉय जोन्स हे लेखक आघाडीवर आहेत. १९६० नंतरचा निग्रो लेखक हा विद्रोहवादाच्या आहारी गेला आहे.

दलित साहित्याचा खरा परिचय मराठी वाचकाला झाला तो गेल्या दशकात. "दलित साहित्य" हा शब्दप्रयोगही अगदी अलिकडचा आहे. दलित साहित्य प्रामुख्याने पुढे आले ते समाजक्रांतीच्या नव्या जाणिवा घेऊन. अस्पृश्यांच्या जीवनाकडे वाचकांचे खरे लक्ष वेधले ते बाबुराव बागुलांच्या "जेव्हां मी जात चोरली" या कथासंग्रहाने दलित साहित्याने एक नवा व विद्रोही पवित्रा घेतला तो बाबुरावांच्या लेखनीतून आणि त्या नव्या विद्रोही पावित्र्याने जी दिशा दाखवली त्या दिशेने जोमाने वाटचाल आरंभली आहे व ती अनेकांनी. बाबुराव बागुलांच्या "मरण स्वस्त होत आहे" या कथासंग्रहाने दलित मनात दडलेल्या सर्व ठिणग्या मुठीत घेउन उधळल्या. दलितांचे झोपडपट्टीतील जीवन सर्व त्यांनी आपल्या कथातून समर्थपणे व्यक्त केले आहे. त्याचप्रमाणे दलित व शोषित कामगारांचा प्रमुख प्रवक्ता म्हणजे नारायण सुर्वे. शब्दाचा

शस्त्रांसारखा उपयोग करता येतो हे नारायण सुर्वे यांच्या कवितेने दलित कवींना शिकविले आहे. नारायण सुर्वे यांचा पवित्राही बंडखोरीचा आहे पण त्यामागचे तत्वज्ञान, सामाजिक बांधिलकीचे आहे.

निग्रो लेखकांना अशा प्रकारचा विद्रोही पवित्रा घेण्यासाठी ४०–५० वर्षाचा काळ लागला आहे. प्रदीर्घ वाटचालीनंतर निग्रो लेखक विद्रोही क्षितिजावर आला. दलित वाङ्मयाची सुरुवातच मुळी या विद्रोही क्षितिजापासून होते. याचे रहस्य काय? याचे रहस्य डॉक्टर बाबासाहेबांच्या विचारात, नेतृत्वात आणि अस्पृश्यांसाठी त्यांनी लढवलेल्या मुक्तीलढयात सापडते. त्याचबरोबर दलित वाङ्मयाची चळवळ सुरू झाली त्या युगातही ते रहस्य शोधावे लागेल. आंबेडकरांनी मराठी दलित लेखकाला "नवे मन दिले आणि या क्रांतीकारी युगाने त्याला ''नवा" मूड दिला आणि ह्या नव्या मनातील जाणिवा कथा-काव्यातून व्यक्त होऊ लागल्या, त्या जाणिवा अधिक तीव्र अधिक उत्कट व अधिक प्रवाही केल्या. "अस्मितादर्श" ने. "अस्मितादर्श" चा जन्म हा दलित साहित्याच्या इतिहासातील पहिले वॉटर शेड आहे, असे मी मानतो. "अस्मिता-दर्श" चे संपादक प्रा. गंगाधर पानतावणे लिहितात, "वाङ्मयाची दौलत म्हणजे धन्याचा माल नव्हे. गहाण होणाऱ्या अनुभवाला येथे शरीर नाही. सामाजिक वास्तववादाचा बुरखा पांघरलेल्या शब्दतस्कराला येथे जीवन नाही. ह्या व्यवहारात, निखळ व नितळ जीवन सत्याला मात्र मरण नाही. ह्या शब्दातून दलित साहित्याचा अधिक हेतू स्पष्ट होतो आणि दिशाही अधिक स्पष्ट होते.

दलित साहित्याच्या प्रयोजनाबद्दल अनेक शंकाही घेण्यात आल्या आहेत. साहित्याचा तसा जाहीरनामा नसतो. एका विशिष्ट समाजजीवनाचा बरा-वाईट अनभव घेतलेल्या लेखकांच्या स,हित्यानिर्मितीचे प्रयोजन आणि दिशा कोणत्या हेही समजावून सांगावे लागते. त्या दृष्टीने १९७१ साली महाड येथे भरलेल्या "महाराष्ट्र बौद्ध साहित्य संमेलना" च्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणाला दलित साहित्याचा जाहीरनामा मानायला हरकत नाही.

"दलित साहित्य म्हणजे सूडवाद्यांचे साहित्य नाही. दलित साहित्य विद्वेश पसरविणारे साहित्य नाही. दलित साहित्य हे माणसाच्या महतीचा आणि मुक्तीचा प्रथम पुरस्कार करते आणि तसेच ती एक ऐतिहासिक गरजही आहे. म्हणून स्वतःला वेगळे नांव धारण करते. दलिताने लिहिलेली आणि अमेरिके-

तील कोणा एकाने लिहिलेली कविताच असते. हे जसे खरे आहे तर मग हे नांव का धारण केलेले आहे? त्याला दोन कारणे आहेत. एक कारण तुम्ही आहात आणि दुसरे कारण आतापर्यंतचे भारतीय साहित्य आणि हा देश आहे."

दलित लेखकांचा आता एक काफीलाच तयार झाला आहे. त्या काफील्यात ठळकपणाने दिसतात. केशव मेश्राम, बाबुराव बागुल, गंगाधर पानतावणे, नारायण सुर्वे, दया पवार, हरिभाऊ पगारे, वामन इंगळे, हिं. गो. बनसोडे, नामदेव ढसाळ, वामन निंबाळकर, राजा ढाले, फ. मुं. शिंदे, सुखराम हिवराळे, शांताराम हिवराळे, योगीराज वाघमारे, प्र. ई. सोनकांबळे आदी लेखक.

निग्रो वाङ्मय व दलित वाङ्मय या दोहोतील साधर्म्य खालीलप्रमाणे आहे, --

(१) निग्रो व दलित लेखक हे आपल्या "अस्मितेचा" चा शोध घेत आहेत.

(२) दोन्ही वाङ्मयातला अनुभव हा विषमतेवर आधारलेल्या समाजजीवनातून आलेला आहे.

(३) दोघांचही साहित्य जीवनवादी आहे. निग्रो व दलित लेखक सामाजिक बांधीलकीच्या जाणिवेतून लिहितात.

(४) ह्या दोन्ही वाङ्मयातील भाषा ही सांस्कृतिक बंडाची भाषा आहे.

(५) ह्या दोन्हीही वाङ्मयातून नवा सांस्कृतिक मूल्याचा वेध घेण्यात येत आहे.

**"मायमराठी," दलित साहित्य विशेषांक,**
ऑगस्ट १९७५.

# ३

## भाषणें

अणणा भाऊ साठे

घनःशाम तळवटकर

बाबुराव बागूल

प्रा. म. भि. चिटणीस

प्रा. गं. बा. सरदार

यशवंतराव चव्हाण

डॉ. म. ना. वानखडे

# ही पृथ्वी शेषाच्या मस्तकावर नसून दलितांच्या तळहातावर तरलेली आहे

**अण्णा भाऊ साठे**

नियोजित अध्यक्ष, स्वागताध्यक्ष, कार्यवाह व बंधू भगिनीनो,

या महाराष्ट्र दलित साहित्यसंमेलनाचे उद्‌घाटन माझ्यासारख्या एका दलितानं करावा हा एक अपूर्व असा योग असला तरी हे आचार्य अत्रे यांचे कार्य मी करीत आहे याची जाणीव आहे.

दलित साहित्यिकांचे वेगळे संमेलन भरवून हा सवतासुभा का उभा करता? असा प्रश्न काही मंडळी करीत आहेत. काहींच्यामते अस्पृश्यता निवारण करणारा कायदाच अस्तित्वात असल्यामुळे आज दलित हा शद्बच निरर्थक झाला आहे. सर्व काही ठीक आहे. परंतु हा प्रश्न निर्माण करणारे दलितांना माणूस मानतात. पण त्या दलितांचा एक वर्ग आहे ही गोष्ट ते मान्य करीत नाहीत. आणि त्यामुळेच हा वरील प्रश्न निर्माण होत आहे.

कारण केवळ महाराष्ट्रापुरतेच जरी बोलायचे झाले तरी दलित माणसांचा मोठा वर्ग या महाराष्ट्रात अस्तित्वात आहे. त्यांचे जीवन वेगळे असून इतर वर्गाशी ते संलग्न आहे. हा वर्ग या देशात अग्रेसर असून त्याच्या न्यायी संघर्षाचे परिणाम सर्व समाजावर होत असतात. तो या देशाचा सामाजिक, सांस्कृतिक पाया आहे. परंतु तो पिळला जाणारा निकष्ट करणारा दलित म्हणून निराळा आहे, नि उपेक्षित आहे.

आणि अशा या दलिताला आपले जीवनाचे स्पष्ट प्रतिबिंब आजच्या मराठी साहित्यात दिसत नाही. आजचे साहित्य आरशासारखे स्वच्छ असावे. त्यात आपले प्रतिबिंब स्पष्ट दिसावे एवढीच त्याची मागणी आहे. आपला चेहरा आहे तसा दिसावा असं वाटणं गैर नाही.

कारण तरंगमय तळ्यात पडलेली सावली जशी लांबुळकी नि डगमगती दिसते. तद्वत आजचा दलित आजच्या साहित्यात दिसतो. हा दलित आजच्या समाजाचे हृदय आहे, त्याहृदयाचे प्रदम्य स्पदंन होत असते. त्यांत हर्ष, खेद, कोमल, कठोर अशा भावना जागृत झाल्यात, त्या भावनांचे तंतू जुळून त्या त्याच्या भावनांचा उगम कशात होतो याची कोणी नीट दखल घेत नाही. हा माणूस कष्टासारखे खडतर कर्म का करतो हे जोपर्यंत लेखकाला कळत नाही, तोपर्यंत तो त्याचे दलितांचे साहित्य निर्माण करू शकत नाही. दलितवर्गाचे अथांग जीवन दिसण्यासाठी लेखकाला एक दिव्य दृष्टी असावी लागते. तो त्या वर्गाशी एकनिष्ठ असावा लागतो. तो वस्तुनिष्ठ असावा लागतो. आणि त्याचा दलितवर्गाच्या सर्व न्यायी संघर्षावर नि त्याच्या अंतिम विजयावर विश्वास असला पाहिजे. म्हणजे तो लेखक ध्येयवादी असला पाहिजे, नि त्याची कल्पकता ही अशीच हवी.

माणूस जगतो का? नि जगण्यासाठी एवढा धडपडतो का? याचा विचार आम्हीं करणे जरूर आहे. त्या धडपडणाऱ्या पतिताला आम्हीं भित्रा समजून जो उंच गगनात गेलेल्या विद्युतमय मनोऱ्यावर उभे राहून हा दलित वीजेच्या तारा जोडतो, खाणींत उभ्या कडयावर चढून सुरूंगाना पेट देतो, किंवा पोलादाच्या रस करणाऱ्या भट्टीवर तो निर्भय वावरतो. आणि या सर्व ठिकाणी मृत्यु त्याची वाट पहात असतो. कधी कधी त्याची व मृत्युची गाठ पडून हा दलित कष्ट करींत करींत मरण पत्करतो. ही जगण्याची नि मरण्याची आगळी रीत आहे. ती लेखकाने समजून घ्यावी. सुरुंगाना पेट देता देता किंवा पोलादाच्या रसात बुडून मरणे, नाहीतर विजेच्या धक्याने मरणे, दिवाळे निघाले म्हणून शेअर बाजारात मरणे या मरणातील अंतर लेखकाने मोजून पाहणे नि श्रेष्ठ मरण कोणते ते निश्चित ठरवावे.

दलितातही सर्व भावना इतराप्रमाणे सदैव जागृत असतात. पण तो इतरापेक्षा जरा निराळा असतो. कारण तो हाडामासांचा केवळ गोळा नसतो, तो निर्मितीक्षम असतो. तो वास्तव जगात कष्टाचे सागर उपसून दौलतीचे डोंगर रचतो. अशा ह्या महान मानवावर महाकाव्य रचणारा त्याला हवा असतो.

एका झाडाखाली तीन दगडांची चूल करून दोन मुलं नि बायको यांना मडक्यात अन्न शिजवून जगविणारा हा दलित वरवर कंगाल दिसला तरी त्याची संसार करण्याची इच्छा केव्हाही पवित्र अशीच असते. कुटुंबसंस्थेवरचा त्याचा विश्वास मुळीच ढळलेला नसतो. परंतु त्याची कुटुंबसंस्थाच भांडवलदारी

जगाने त्या झाडाखाली हाकलून दिलेली असते. त्याचे आम्ही निरिक्षण करावे त्याची कारणपरंपरा शोधावी, आणि मग त्या कंगाल दिसणाऱ्याविषयी लिहावे. जपून लिहावे. कारण या समाजाची घडीन् घडी त्या दलिताने व्यापवली आहे. अधिक काव्यमय शब्दात बोलायचे झाले तर असे म्हणता येईल की, "हे जग, ही पृथ्वी शेषाच्या मस्तकावर नसून दलितांच्या तळहातावर तरलेली आहे" अशा या दलितांचे जीवन खडकातून झिरपणाऱ्या पाझराप्रमाणे असते ते जवळ जाऊन पहा. मग लिहा. कारण "जावे ज्याच्या वंशा तेव्हां कळे" हे तुकारामाचे म्हणणे खोटे नाही.

म्हणून दलिताविषयी लिहिणारांनी प्रथम त्याच्याशी एकनिष्ठ असले पाहिजे. तू गुलाम नाहीस. हे जग तुझ्या हातावर आहे. याची जाणीव करून घ्यावी. त्याचे जीवन वरच्या पातळीवर नेण्याची शिकस्त करावी आणि त्यासाठी लेखक हा सदैव आपल्या जनतेबरोबर असावा लागतो. कारण जो कलावंत जनतेबरोबर असतो त्याच्याबरोबर जनता असते. जनतेकडे पाठ फिरविणाऱ्याकडे साहित्यही पाठ फिरवित असते. जगातील सर्व श्रेष्ठ कलावंतांनी वाङ्मय हा जगाचा तिसरा डोळा मानला आहे. आणि तो डोळा सदैव पुढे व जनतेबरोबर असणे जरूर आहे.

परवा मराठी भाषेसाठी मराठी जनतेने अभूतपूर्व असा संग्राम दिला. खऱ्या अर्थाने तो लढा मराठी साहित्यासाठीच होता नि आहे. त्या लढ्यात सोळा सोळा वर्षाच्या तरुण मुलींनी आत्मबलिदान दिले. त्या लढ्यात जे कलावंत जनतेबरोबर होते त्यांनी ह्या महाभारतावर कवनं रचली. कुणाच्या काव्याच्या करवती तापल्या. कुणाची कृपणा वीररस उधळू लागली. कुणी मराठी भाषेची महती गाइली. त्या कलावंताना हा महाराष्ट्र कधीच विसरणार नाही. परंतु जो कलावंत जनतेबरोबर नसतो, जो बंद खोलीत कला निर्माण करतो त्याची कला जनतेची कला होऊ शकत नाही. कारण बंद खोलीतील कला मांडीवरच्या खुणा मोजते नि मांडीवरच्या खुणा मोजणारी आमची दलितांची नसते. आमची कला डमडम गोळीच्या खुणा मोजते. ती आमची कला, ते आमचे साहित्य. त्याचबरोबर दलित स्त्रियांच्या गालावरच्या तिळांवर जी सुंदर कलाकृती असेल ती कलाकृती आमची. जो कलावंत ध्येय जाणत नाही, जनता जाणत नाही, तो कोणत्या मार्गाने जातो याची कैक उदाहरणे देता येतील. आम्हाला जे दिसते ते आम्ही लिहितो, कला ही वर्गातीत असावी,

प्रचारातीत असावी असा त्यांचा दावा असतो आणि अशा या कलावंतांचा आज बोलबालाही कमी नाही. परंतु जो जनतेला जाणत नाही, तो तिला विद्रुप करतो याचे नमुने मराठी साहित्यात मुबलक मिळतात.

एका बारा वर्षाच्या मुलीचे बोक्यावर प्रेम बसणे आणि त्याने कामवासना तृप्त करावी म्हणून तिने चड्डी फेडणे या कथेला काय नांव देता येईल. ही माणसाला हैवान करीत नाही काय? एक कारकून संततिनियमन करावे म्हणून स्वतःवर शस्त्रक्रिया करून घेतो, पण त्याची तिसऱ्यांदा (पत्नी) गरोदर राहते म्हणून जो झुरतो याचा अर्थ ती बाई व्यभिचारी होत नाही काय? कथेपासून आम्ही काय शिकावे?

महिला संघाची अध्यक्ष बाई पुण्याहून मुंबईस येत असता गाडीत भेटलेल्या एका माणसाबरोबर अखेरचा डाव खेळते. ही माणसांची निंदा नाही का? या कमला फडकेच्या कथेत मराठी माणूस नाही आणि दलित तर मुळीच नाही हे फडके पती पत्नीचे वाङ्मय "असेच" नाही याचाच अर्थ जो ध्येय जाणत नाही तो जनतेला विद्रुपच वाटतो. हे सर्व मनोविश्लेषणवादाची रापी घेऊन माणसांची कातडी सोलू लागले आहेत. म्हणून हे दलितांचे वेगळे साहित्य संमेलन भरत आहे. ऐवढेच. हे मनोविश्लेषनवादी आपल्या वाङ्मयाचे समर्थन करतांना म्हणतात, जीवनाच्या दोन बाजू असतात. पैकी एकीचा खोल जाऊन आम्ही अंत घेतो परंतु नासिकात गंगा आणि गटार दोन्ही अस्तित्वात आहे. तुम्ही गंगेऐवजी गटारच का पसंत करता?

आम्हाला गंगेसारखे निर्मळ साहित्य हवे आहे. आम्हाला मांगल्य हवे आहे. आम्हाला मराठी साहित्याच्या थोर परंपरेचा अभिमान आहे.

कारण मराठी साहित्याची नांदी आमच्याच जीवन संघर्षाने झडली आहे. जेव्हां दलितांची सावली असह्य होती महानुभावपंथीय साहित्यिकांनी सर्वांना ज्ञान मिळाले पाहिजे, ज्ञान हे मोक्ष असे समजून त्यांनी बंड केले. ते आमचे साहित्यिक. माणसाला माणूस म्हणून जगता आले पाहिजे असा दावा मांडून ज्यांनी दलितांच्या भाषेत महाराष्ट्राला सुंदर ज्ञानेश्वरी दिली ते आमचे साहित्यिक, आणि चुकलेले महाराजचे मूल कडेवर घेवून जाणारे ते एकनाथ, ते आमचे साहित्यिक, जो दलिताला कडेवर घेतो, त्याला जीभेवर घेतो. आणि त्याला जो विद्रूप करतो, त्याला दलित विद्रूप करतो अशी इतिहासाची साक्ष आहे.

शब्दाना नुसता आकार देणे सोपे असते. त्या आकाराला आत्मा देणे त्याहून अवघड आहे. ते देखिल काही लेखकांना सहज साधून जाते. पण त्या आत्म्यामागची इतिहास परंपरा शोधणे आणि तिचा अर्थ लावणे फार अवघड आहे.

हा आचार्य अत्रे यांचा खुलासा आम्ही दलित लेखकांनी समजून त्याचा अर्थ लावावा आणि इतिहास परंपरा शोधण्याचा प्रयत्न करावा. आम्ही आपल्या वर्गाचे इमान पटवून त्याचा उपमर्द होणार नाही याची काळजी घेऊन त्याचे साहित्य निर्माण करू या. या दलिताचे जीवन सुखी व समृद्ध कसे होईल याची काळजी करू या, या दलिताला नि त्याच्या जीवनाला वरच्या पातळीवर नेण्याचा आपल्या कलेतून प्रयत्न करू या.

काही विद्वान म्हणतात, अस्पृश्यता कायद्याने नष्ट केली आहे. तेव्हां दलित हा प्राणी अस्तित्वात नाही, परंतु हा केवळ भ्रम आहे. एका गावात एका सार्वजनिक आडावर पाणी भरताना उच्चवर्णीय हिंदूंची काळजे धड-धडतात. महारामांगाचा पोवरा जोपर्यंत पाण्यात आहे तोपर्यंत आपला पोवरा पाण्यात सोडत नाहीत. कित्येक हॉटेलात "खास" कप ठेवलेले आढळतात. याचे कारण युगायुगाचे समज एका क्षणात नष्ट होत नसतात. म्हणून आम्ही दलित साहित्यिकांनी दलितांना वास्तव जगाच्या सर्व जुलुमातून मुक्त करणारे नवे साहित्य निर्माण केले पाहिजे. एके ठिकाणी गॉर्की म्हणतो, "शब्द आणि कल्पनाच्या साधनावर उभारलेल्या या कलेचे खरे वैशिष्टच मानवी चुकांचे ज्ञान करून देणे हेच आहे असे म्हणता येत नाही मानवाला त्याच्या बाह्य जीवनाच्या परिस्थितीतून वरच्या पातळीवर नेण्याचा प्रयत्न करणे त्याला कमीपणा आणणाऱ्या वास्तव जगाच्या बंधनातून मुक्त करणे आणि तू गुलाम नाहीस तू वास्तव जगाच्या धनी आहेस. तू जीवनाचा स्वतंत्र निर्माता आहेस.असा साक्षात्कार मानवाला करून देणे हे वाङ्मयाचे खरे वैशिष्टच आहे. या अर्थाने वाङ्मय सदैव क्रांतिकारक असते." म्हणूनही वरील अर्थाने परिपूर्ण असे साहित्य निर्माण करू या आणि आपल्या लेखण्या दलितांच्या चरणी अर्पूया एवढेच.

**(महाराष्ट्र दलित साहित्य संघाच्या वतीने आयोजित केलेल्या पहिल्या साहित्य संमेलनातील शाहिर अण्णा भाऊ साठे यांचे उद्घाटनाचे भाषण दिनांक २ मार्च, १९५८)**

# धार्मिक भेदावर साहित्य उभारणी करण्याची दृष्टी नाही

* घनश्याम तळवटकर

आज, मराठी भाषिक महाराष्ट्राच्या या राजधानींत मुंबई महानगरीत महाराष्ट्रातील दलितवर्ग व बौद्ध समाजांतील साहित्यिक कलावंत व रसिक यांनी निर्माण केलेल्या महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभा या संस्थेच्या विद्यमाने होणाऱ्या साहित्य संमेलनाप्रसंगी सुरुवातीसच या संमेलनाचा स्वागताध्यक्ष व या साहित्य सभेचा अध्यक्ष म्हणून आपणा सर्वांचे मनःपूर्वक स्वागत करण्यास मला अत्यानंद होत आहे. मानवी जीवन सुखकर व समृद्ध करणाऱ्या साहित्य व संस्कृतीच्या या आनंदमेळयांत उपस्थित असलेली या क्षेत्रांतील मातब्बर मानकरी मंडळी पाहून कोणा साहित्यप्रेमी माणसाचे मन हर्षभरित होणार नाही.

श्रद्धेने, निष्ठेने व विश्वासाने बाबासाहेबांच्या सान्निध्यांत राहून प्रा. चिटणीसांनी आपले विचार व जीवन घडविले. बौद्ध धर्मावरील साहित्याचा त्यांचा अभ्यास व व्यासंग सखोल आहे. दलितवर्गीयांच्या आत्मोन्नतीच्या कार्यात समरस झालेले दलितांचे मित्र व सहकारी प्राचार्य चिटणीस आपल्या या संमेलनाला अध्यक्ष म्हणून लाभले ही किती आनंदाची गोष्ट आहे! या संमेलनाचे नियोजित अध्यक्ष म्हणून मी त्यांचे मनःपूर्वक व हर्षभरित होऊन स्वागत करतो.

या संमेलनास प्रमुख पाहुणे म्हणून व्यासपिठावर पद्मश्री अनंत काणेकर, कविवर्य वा. रा. कान्त, कवि नारायण सुर्वे खास निमंत्रणावरून उपस्थित आहेत. प्राध्यापक काणेकर हे आमचे गुरू म्हणून व आमच्या साहित्यविषयक कार्याचे मार्गदर्शक म्हणून आम्हाला नेहमीच प्रेरणा देत आलेले आहेत. महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभेचे दोन वर्षापूर्वी दिनांक १ जानेवारी १९६६ रोजी त्यांच्याच हस्ते उद्घाटन झाले असल्यामुळे संस्थेला सुरुवातीपासून त्यांचा आशिर्वाद लाभलेला आहे. कविवर्य वा. रा. कान्त यांनी या साहित्य सभेच्या

वतीने प्रसिद्ध होणाऱ्या पहिल्या काव्यसंग्रहाचे उद्‌घाटन करण्याचे मान्य केल्यामुळे त्यांचा या कार्यास आशिर्वाद व मार्गदर्शन लाभणार आहे. या दोन थोर साहित्यिकांचे व श्रमजीवी वर्गाच्या नव्या युगाचे नवे कवि श्री नारायण सुर्वे यांचे मी सहर्ष स्वागत करतो.

डॉ. बाबासाहेबांनी प्रस्थापित केलेल्या मिलिंद कला महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. मनोहर वानखडे हे इंग्रजी साहित्याचे एक तज्ञ समीक्षक आहेत. त्यांच्या उपस्थितीमुळे त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ आपणास होणार आहे. त्यांचे मी अंतःकरणपूर्वक स्वागत करतो. संमेलनात सहभागी होण्यासाठी महाराष्ट्रातून जिल्ह्यातून, दूरदूरहून आलेले दलित व बौद्ध समाजांतील लेखक कवी, कलावंत नाटककार, रसिकजन व हितचिंतक या सर्वांचे मी सादर स्वागत करतो. प्रमुख पाहुणे म्हणून या संमेलनात उपस्थित असलेली समाजातील नेतेमंडळी व प्रतिष्ठित सज्जन या साहित्यसेवेच्या कार्याला आशिर्वाद व प्रोत्साहन देण्यासाठी उपस्थित आहेत त्यांचे मी मनःपूर्वक स्वागत करतो आणि या सांस्कृतिक उन्नतीच्या कार्यास सक्रीय सहाय्य व सहकार देण्यासाठी एवढ्या मोठ्या संख्येने उपस्थित असणाऱ्या आपणा सर्वांचे सहर्ष स्वागत करून या संमेलनप्रसंगी महाराष्ट्र बौद्ध साहित्य संस्थेच्या उद्दिष्ट व कार्याबाबत कांही विचार संक्षिप्तपणे आपल्यापुढे विचारार्थ ठेवण्याचा प्रयत्न करतो

दलितवर्गीय तथा नवदिक्षित बौद्ध समाजांतील होतकरू साहित्यिक आणि कलावंत यांना एकत्रित आणून त्यांच्यातील साहित्य व कलागुणांच्या विकासास संघ निर्माण करण्यासाठी दलित नवीन व बौद्ध जनतेत उच्च दर्जाच्या साहित्याची व कलेची अभिरुचि निर्माण करण्याच्या उद्देशाने आणि त्याचप्रमाणे त्यांच्या जीवनाचे अनुभवाचे भाव-भावनांचे सुख-दुःखाचे व आकांक्षांचे यथार्थ व वास्तव चित्रण करणाऱ्या वाङ्मयाची निर्मिती करण्यासाठी महाराष्ट्र साहित्य सभा ही संस्था निर्माण करण्यात आलेली आहे. अलिकडील काळात या वर्गात येत असलेल्या साहित्यविषयक कार्याचा उगम डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी प्रस्थापित केलेल्या पीपल्स एज्युकेशन सोसायटीच्या सिद्धार्थ कॉलेजमधील साहित्याची आवड असणाऱ्या दलितवर्गीय विद्यार्थ्यांच्या प्रयत्नात आहे. १९४८ साली सिद्धार्थ महाविद्यालयांतील दलित वर्गीय विद्यार्थ्यांनी जो सिद्धार्थ साहित्य संघ स्थापन केला त्यातूनच आज दलित व बौद्ध समाजातील साहित्य व कलेविषयी कार्य करणाऱ्या विविध संस्था निर्माण

होऊन त्या क्षेत्रांत अधिकाधिक जोमाने व तळमळीने कार्य करीत असलेल्या दिसून येतात.

सत्ता, संपत्ती आणि शिक्षण यापासून वंचित करून ठेवलेला दलित आपल्या दुःस्थितीची जाणीव करून घेऊन व आपले स्वत्व जागृत करून आत्मोद्धाराची वाटचाल करीत आहे. त्यासाठी मानवीहिताची बुद्धिवादी शिकवण देणाऱ्या बुद्धाच्या धर्माचा स्वीकार केला आहे त्यांच्या या आत्मोद्धाराच्या समाजपरिवर्तनाच्या कार्याला गती व शक्ति प्राप्त होण्यासाठी प्रेरक व पूरक असे स्फूर्तिदायी वाङ्मय निर्माण होणे आवश्यक आहे या वर्गातील उदयोन्मुख साहित्यिक कलावंताच्या हातून अशा प्रकारचे वाङ्मय निर्माण व्हावे यासाठी साहित्याच्या क्षेत्रांत जाणीवपूर्वक कार्य होणे जरूरीचे आहे. समाजहिताच्या ध्येयाने प्रेरित होवून या दृष्टीने उचललेले एक कार्याचे पाऊल म्हणून हे साहित्यिक संमेलन भरत आहे.

महाराष्ट्रांत साहित्यक्षेत्रांत कार्य करणाऱ्या प्रातिनिधिक अशा मोठमोठ्या साहित्य संस्था अस्तित्वांत असतांनाही स्वतंत्र साहित्य संस्था किंवा हे स्वतंत्र बौद्ध साहित्य संमेलन कशाला? साहित्य क्षेत्रात हा सवतासुभा कशाला हवा? असा प्रश्न या ठिकाणी उपस्थित होवू शकतो. या प्रश्नाचे उत्तर आपल्या देशांतील सामाजिक विषमतेवर आधारलेल्या समाजस्थितीमध्ये आहे. आपल्या देशांत वेगवेगळ्या जातीजाती करता कार्य करणाऱ्या अनेक संस्था आहेत. आणि त्याचे कार्य आजवर अनिर्बंधपणे चालू आहे.

राजकारण हे जसे वर्गविशिष्ट तसे साहित्य ज्याच्यांत राजकारणासकट जीवनांतील सर्व अंगाचा समावेश होतो हे सुद्धा वर्गविशिष्ट असते. त्यामुळे पददलित वर्गाचे राजकारण, सामाजिक समस्या आर्थिक स्थिती आणि सांस्कृतिक दर्जा यांचे वेगवेगळेपण जसे जाणवते तसेच साहित्यसुद्धां या सर्व बाबींतून दिसणारे वेगवेळपण व्यक्त करू शकते. आणि या वेगळ्या चित्रणांतून या वर्गाच्या समस्या सोडविण्यासाठी व त्या वर्गाचे जीवन सुसज्य, उन्नत व प्रगत करण्यासाठी मार्गदर्शकहि असू शकते. पण त्यासाठी साहित्यातील जिवंतपणा व दर्जेदारपणा निश्चित असता पाहिजे.

भारतातील प्रमख अशा १४ भाषेत मराठी भाषा ही एक समृद्ध अशी भाषा आहे. वाङ्मयीन विकास समृद्धी या दृष्टीने मराठी भाषेचा क्रम वरचा

आहे तथापि या वाङ्मयीन विकासाच्या आणि समृद्धीच्या कक्षा संबंध महाराष्ट्र समाजाला व्यापून टाकणाऱ्या आहेत का? हा मुख्य प्रश्न आहे. महाराष्ट्र समाज हा अठरापगड जातीजमातींनी भरलेला व व्यापलेला समाज आहे. या सर्व जातीजमातीचा सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, आणि बौद्धिक दर्जा सारखा नाही. तो वेगवेगळा आहे. वेगवेगळ्या समाज घटकातील अंतर काहींच्या बाबतीत जमीन अस्मानासारखे आहे. अशा प्रकारे वेगवेगळ्या अवस्थेत असणाऱ्या सर्व समाज घटकांचे जीवन मराठी साहित्यात अद्याप चित्रित झालेले नाही. तशा प्रकारचा प्रयत्न होत आहे असे दिसत असले तरी तो प्रयत्न अत्यंत अल्प आणि तुटपुंजा आहे.

आधुनिक मराठी साहित्य हे प्रामुख्याने पांढरपेशा हिंदु समाजातील लेखकांनी लिहिलेले साहित्य आहे. अर्थात या साहित्यांत व्यक्त झालेले जीवन अनुभव, भावना, आकांक्षा व प्रश्न हे हिंदु मध्यमवर्गीयांचे प्रामुख्याने आहेत. त्यांत त्या लेखकाचा दोष नाही. कोणताही लेखक ज्या वर्गात किंवा समाजांत जन्माला येतो, त्या वर्गाचा किंवा समाजाचा राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक व बौद्धिक (वैचारिक) वारसा घेऊनच जन्माला येतो. आणि त्या समाजाच्या कक्षेत त्याच्या मनावर झालेले संस्कार व संवेदना त्यांच्या लेखनात उतरतात. जग आणि मानवीजीवन यांजकडे पाहाण्याचा त्याचा दृष्टिकोण तो ज्या समाजाचा घटक असतो त्या समाजाच्या दृष्टीकोनातून तयार झालेला असतो. मानवी मूल्ये तो आपल्या समाजातील किंवा वर्गातील प्रचलित अथवा आदर्शभूत परिमाणानींच मोजीत असतो, तपासत असतो आजूबाजूची परिस्थिती आणि वातावरण त्याच्या विचाराला आणि विकारांना कांही विशिष्ट आकार देत असते. आणि त्याच्या लेखनात प्रकट होणाऱ्या मानवी मनाच्या संवेदनाचे पडसाद त्याच्या अंतःकरणातील समान संवेदनाला स्पर्श झाल्यामुळे उमटलेल्या तरंगानुसारच पडलेले असतात यामुळे मध्यमवर्गीय पांढरपेशांनी लिहिलेल्या वाङ्मय प्रामुख्याने केवळ पांढरपेशांच्या सामाजिक व मानसिक जीवनाचेच पडसाद प्रकर्षाने पडलेले दिसतात.

पांढरपेशांतील साहित्यिकांनी खालच्या श्रमजीवी दलित व पिडीत समाजांच्या जीवनांचे दर्शन घडविणारे साहित्य निर्माण केले नाही असे नाही. त्यांनी आपल्या साहित्यात दलितांचे जे जीवन चित्रित केले आहे ते जीवन त्या लेखकांना जसे दिसले, वाटले त्याप्रमाणे प्रतिबिंबित केले आहे. त्यात त्यांचा प्रयत्न प्रामाणिक-

पणाचा असेल यांत शंका नाही, तथापि या पददलित वर्गाची दुःखे वा अनुभव यांची अनुभूती ह्या लेखकांना नसल्यामुळे दलितवर्गाच्या जीवनाचे चित्र वास्तवतापूर्ण असे प्रतिबिंबित करता आलेले नाही. अशा चित्रणांत जशा उणीवा आहेत तशी विकृतीहि दिसून येते. यासाठींच दलितांचे जीवन, भावना, श्रद्धा, निष्ठा आणि आकांक्षा पूर्णपणे व यथार्थपणे वाङ्मयात प्रतिबिंबित करणारे वाङ्मय निर्माण करण्यांसाठीं त्याच वर्गातून लेखक निर्माण होणे आवश्यक आहे. आणि याच जाणीवेतून महाराष्ट्र साहित्य सभेचा जन्म झाला आहे.

महाराष्ट्रांत साहित्यक्षेत्रांत कार्य करणाऱ्या साहित्य संस्थापैकी ही एक संस्था आहे. हिचे संघटनात्मक अस्तित्व जरी वेगळे असले तरी तिचा उद्देश मराठी साहित्याची निर्मिती आणि नवोदित साहित्यिकांना उत्तेजन हाच आहे. मराठी भाषा ही सर्व महाराष्ट्रांतील जनतेची मातृभाषा आहे. तिच्या स्वरूपांत कांही अंतर्गत भेद असले तरी तिचा पिंड आणि प्राण एकच आहेत. ती जशी ब्राह्मणादि स्वतःला उच्चवर्णीय म्हणविणाऱ्या लोकांची भाषा आहे तशी ती तेली, तांबोळी, कोळी, कुणबी, मराठे आदि शुद्र आणि महार, मांग चांभार आदि अतिशूद्र गणलेल्या जातीजमातीच्या लोकांचीही मायबोली आहे ती जशी प्रकांडपंडितांची जननी आहे, तशीच ती खेड्यापाड्यांत डफ, तुणतुणे निनादणाऱ्या अशिक्षित शाहीरांची माऊली आहे. ती ज्ञानी, तत्वज्ञानी, आदि उच्च पदस्थांची आहे तशी सर्वसामान्य अबालवृद्ध जनतेच्या अंतःकरणाला भक्तीचा ओलावा देणाऱ्या साधुसंतांची वाणी आहे. ती ऐषारामांत लोळणाऱ्या धनिकांची आहे तशीच ती झोपडीत राहाणाऱ्या गोरगरीब व श्रमिकांची आहे, थोडक्यांत मराठी भाषा ही सर्व महाराष्ट्राच्या जनतेची मायमाऊली आहे. आईच्या स्तनांतील दुधावर बालकाचा पिंड पोसतो व वाढतो तसा मराठी भाषेच्या अमृतपानावर सारा मराठी माणूस पोसलेला आहे.

अमृतातें पैजा जिंकणारी ही मराठी भाषा मेणाहुनी मऊ तशी वज्राहुनी कठिण आहे. ती जशी खड्गाच्या धारेवर तळपणारी आहे तशी ती दया, क्षमा, शांतीची उद्गाती आहे. तशीच ती जीवनाची मोहक, मादक, खुमारी रंगविणारी जादुगारीणीही आहे. तिच्या विविध स्वरूपी आविष्काराने सारे. मराठी वाङमय ओतप्रोत भरलेले आहे. सत्व, रज, तम, त्रिगुणात जरूरीप्रमाणे सारख्याच चपलखतेने प्रकटणारी ती सर्वगुणी आहे प्रज्ञा, करुणा, मैत्रीच्या आविष्कारांत ती सारखीच रमणारी आहे.

अशा या मराठी भाषेच्या क्षेत्रांत जातिनिहाय वा धर्मनिहाय भेद असणे किंवा तसे ते निर्माण करणे हे कोणाहि विचारी व सूज्ञ माणसास पटणारे नाही आणि साहित्यांत हिंदु साहित्य, बौद्ध साहित्य, शीख साहित्य, मुसलमान साहित्य, पार्शी साहित्य अथवा ख्रिस्ती साहित्य असा भेद केला जात नाही. एका भाषेच्या साहित्यांत अनेक विचार, अनेक तत्वज्ञाने वेगवेगळ्या स्वरूपांत सांगणारे लिखाण असेल अनेक धर्माच्या स्वरूपाचे भेदांचे, तत्वज्ञानाने, संस्काराचे, इतिहासाचे व श्रद्धेचे विवरण करणारे लेखन असेल पण साहित्याची धार्मिक भेदावर विभागणी किंवा वेगळेपणा दाखविण्याची प्रथा नाही.

या महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभेचाहि साहित्याची धार्मिक भेदावर उभारणी करण्याची दृष्टी नाही. जी दृष्टी आहे ती एका विशिष्ट अवस्थेत आज अनेक शतकांपर्यंत खितपत पडलेल्या समाजाच्या अंतरिक दुःखाना व त्यांच्या सामाजिक, राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक प्रश्नांना व प्रमेयांना वाचा फोडण्याचे जाणिवपूर्वक कार्य साहित्याच्या क्षेत्रांत व्हावे आणि त्याच बरोबर अनेक संकटांना दुःखाला जोरजुलूमाला तोंड देत पुढे येत असलेल्या पददलित व मागासलेल्या समाजांत त्यांच्या कार्याच्या यशस्वीतेसाठी कांही आत्मविश्वास निर्माण करणे, निष्ठा व श्रद्धा सतत राहावी या दृष्टीने वाङ्मय निर्मिती करावी म्हणून हा खास वेगळा प्रयत्न आहे. येथे बौद्ध साहित्य याचा केवळ धार्मिक भेदाचा अर्थ न घेता बुद्धिवादी दृष्टि देणारे साहित्य असा अर्थ घेतला जावा अशी अपेक्षा आहे. आजच्या वैज्ञानिक युगांत मानवी जीवन प्रगत करणारे पुरोगामी वाङ्मय असा बौद्ध साहित्य याचा अर्थ घेतल्यास ते योग्य ठरेल.

मराठी साहित्यसृष्टींत वेगवेगळ्या गटांना सामाजिक व राजकीय परिवर्तनाच्या दृष्टीने एकत्रित करण्याचे कार्य अजून व्हावयाचे आहे. सर्व पुरोगामी मराठी साहित्यिकांनी लवकर हे कार्य घेतले पाहिजे सर्व साहित्यिकांना एक-संघ केले पाहिजे. अशी एकात्म मराठी साहित्य संघटना निर्माण झाल्यावर बौद्ध साहित्य सभेसारखी वेगळी संस्था अर्थातच् अस्तित्वांत उरणार नाही.

आजच्या कालखंडांत बौद्ध साहित्य सभासारख्या संस्थांचे आणखीहि एक सबळ व अटळ कारण आहे. शेकडो वर्षे अज्ञान, दारिद्र, अपमान. अवहेलना अशा अत्यंत अगतिक परिस्थितीत खितपत पडलेला अस्पृश्यतेच्या

निर्घृण गुलामगिरीत पिचून निघालेला अस्पृश्य मानला गेलेला कोटयावधि समाज डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अद्वितीय व तेजस्वीतेखाली जागृत होऊन स्वातंत्र्याचे, स्वाभिमानाचे आणि स्वावलंबनाचे व समतेचे जीवन जगण्यासाठी इर्ष्येने वाटचाल करीत आहे आणि या जीवनपरिवर्तनाच्या मार्गातील एक अत्यंत महत्त्वाचा व क्रांतिकारक टप्पा म्हणजे जगाला मानव धर्माची शिकवण देणाऱ्या भगवान बुद्धाचा मार्ग त्याने अवलंबिला आहे. अस्पृश्य मानलेल्या जनतेच्या जीवनातील हे स्थित्यंतर क्रांतिकारक तर आहेच पण अखिल भारतीय समाज जीवनांत ते क्रांती घडवून आणणारे आहे. या घटनेच्या रूपाने भारताच्या भूमीत जन्मलेला पण विविध कारणापरंपरामुळे लुप्त झालेला बौद्ध धर्म भारतात पुनरुज्जीवित होत आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या मार्गदर्शनानुसार अस्पृश्य वर्गाने भगवान बुद्धाचा मार्ग आपला जीवनमार्ग स्वीकारला आहे. या जीवनमार्गाने वाटचाल करून त्याचा भाग्योदय साधण्याच्या कामी त्याच्या प्रयत्नांत त्याला अगत्याने बौद्धधर्माचे तत्वज्ञान, बौद्ध संस्कृती यांचे ज्ञान करून घेणे त्याला क्रमप्राप्त आहे. यासाठी त्याला बौद्धधर्मातील अनेक ग्रंथाचे परिशीलन करावे लागणार आहे. हे बौद्ध वाङमय विपुल आहे. ते प्रामुख्याने पाली भाषेत आहे. बौद्ध धर्माचे पालीभाषेतील हे विचारधन मराठी वाचकापर्यंत पोचविण्याची आज आत्यंतिक गरज आहे. हे कार्य करण्यास साहित्यक्षेत्रातील संस्था व व्यक्ति या पुढे आल्या पाहिजेत. ह्या हेतूची परिपूर्ति ही सुद्धां बौद्ध साहित्य सभेचे एक मुख्य उद्दिष्ट आहे. संस्कृतातील किंवा पाश्चात्य इंग्रजी भाषांतील वाङमय मराठीत रूपांतरीत होऊन आल्याने जशी मराठी भाषा समृद्ध झाली आहे. तशी पाली भाषेतील बौद्ध वाङमय भाषांतरीत होऊन आल्यानेहि याहिपेक्षा समृद्ध होईल यांत शंका नाही.

आज उपलब्ध असलेले प्राचीन मराठी वाङमय साधुसंतांनी व शाहिरांनी घडविलेले आहे. या संतशाहीरांची फार मोठी व अभिमानास्पद परंपरा अस्पृश्य मानलेल्या दलितांत निर्माण होऊन गेलेली आहे. यांच्या अभंगवाणीचे व शाहीरीचे संशोधन करून त्यांच्या चरित्रात्मक माहितीसकट ती प्रकाशात आणणे हेही एक महत्वपूर्ण कार्य आहे. त्याचप्रमाणे आजच्या शैक्षणिक सुधारणेच्या काळातील प्रगतीमुळे जुन्या पिढीतील लोकांच्या केवळ मुखावर खेळणारे बोलीभाषेतील ग्रामीण लोकगीतें इत्यादि लोकवाङमय लुप्त होण्याच्या मार्गावर

आहे. त्यांचे जतन करण्यासाठी ते ग्रंथनिविष्ट करण्याचा त्वरित प्रयत्न झाला पाहिजे नाहीतर थोडक्या काळातच त्या पारंपरिक लोकवाङमयाला आपण कायमचे अंतरु याकामी सरकार, साहित्य संस्था आणि साहित्यप्रेमी कार्यकर्ते यांनी त्वरित पाऊले उचलण्याची जरूरी आहे.

शेवटी स्वातंत्र्य, समता, विश्वबंधुत्व व न्याय या तत्वावर आधारलेली नवी समाजरचना आज निर्माण करण्याचा जातीभेद, उच्चनीचता मानवांत भेद करणाऱ्या अनिष्ट प्रथा व रूढचा नष्ट करण्याचा प्रयत्न जारी आहे. संबंध जगात समाजवादी समाजरचेसाठी प्रचंड उलथापालथ होत आहे. मानवी जीवन समृद्ध करणारी संपत्ती, श्रम सामर्थ्य यावर उत्पादन करणाऱ्या श्रमिकांनी समाज-शासनाची सूत्रे आपल्या हाती घेण्याचा क्रांतीकारी व निकराचा प्रयत्न चालविला आहे. या नवीन शक्तिचा जनक शेतकरी कामगार-शेतमजूर व समतेसाठी धडपडणारा दलित वर्ग यांच्या आशा आकांक्षाचा उद्घोष करणारे अंगीकृत कार्यात त्यांना प्रभावित करणारे वाङमय आज निर्माण झाले पाहिजे. तसे ते व्हावे ही आम्हा सर्वांची प्रबळ इच्छा. म्हणूनच हा खटाटोप आहे.

दलितांच्या दु:खांना व आकांक्षांना वाङमयात प्रतिबिंबित करण्याचा प्रयत्न करणारे आज दलितांतील लेखकात कवी कलावंत पुढे येत आहेत हीं नव्या युगाची चाहूल आहे. अण्णा भाऊ साठे, बाबुराव बागूल, शंकरराव खरात, कवी ग्रेस, केशव मेश्राम, बन्धुमाधव, जनार्दन वाघमारे, सुखराम हिवराळे, यादवराव गांगुर्डे, चोखा कांबळे, दया पवार, राजा ढाले इत्यादि अनेक कथाकादंबरीकार, लेखक कवी दलितांच्या साहित्यसृष्टीची निर्मिती करण्यात पुढे आले आहेत. येत आहेत. त्यांच्या उमेदीचे व कृतीचे स्वागत होणे म्हणजे साहित्यांतील नव्या युगाचे स्वागत होणारे आहे.

उद्घाटक, संमेलनाध्यक्ष, प्रमुख पाहुणे, इतर सन्माननीय पाहुणे, साहित्यिक, कलावंत, पत्रकार, स्वागतसदस्य, प्रतिनिधी, रसिकजन या सर्वांचे मी पुन्हा एकदा स्वागत करतो व संमेलनाचे उद्घाटनाचे करावे अशी उद्घाटकांना प्रार्थना करतो.

**('महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभा' या संस्थेच्या वतीने मुंबई येथे १६ व १७ डिसेंबर १९६७ आयोजित केलेल्या संमेलनातील स्वागताध्यक्षीय भाषण).**

# दलित साहित्य म्हणजे सूडवाद्यांचे साहित्य नाही

* बाबूराव बागुल

बंधु भगिनींनो,

आपणं माझा फार मोठा सत्कार करीत आहात असे मला वाटते आहे. येवढ्या मोठ्या सत्काराजोगे लेखन कार्य मी केलेले नाही. माझ्यापेक्षा वयाने मोठे असे लेखक आहेत. त्यांचे लेखनही मोठे आहे. खरे म्हणजे तेच या सन्मानाचे अधिकारी आहेत. मी फार अल्पलेखन केले आहे. मी लिहितो ते प्रक्षोभक असले तरी ते संख्येने खूप कमी आहे. मला अजून खूप लिहायचे आहे. मी पाहिलेली माणसे अजून मला शद्वांत आणायची आहेत. अनेक अनुभव मांडायचे आहेत. लिहायचे किती आहे. तरी आपण मला एवढा-मोठा सन्मान देवू केला आहे. आणि तोही एका महान् गावी जिथे दलितांच्या मुक्तीची-भारतीय इतिहासातील पहिली लढाई झाली तिथे.....भगवान बुद्धा-एवढेच परममंगल युद्ध बाबासाहेबांच्या नेतृत्वाखाली झाले तिथे. महाड दलितांचे तीर्थक्षेत्र आहे. अशा तीर्थक्षेत्रांत आपण माझा गौरव करीत आहात ही माझ्या आयुष्यांतील परम आनंदाची गोष्ट आहे असे मी मानतो आणि अत्यंत नम्रतेने आपल्या प्रेमाचा स्वीकार-इथे उपस्थित असलेल्या माझ्या बांधवांच्या सम्मतीने करतो.

आपण माझ्यावर खूप प्रेम करतां हे मी अनेक ठिकाणी अनुभवले आहे. पण मी देखील अगदी तुकारामाप्रमाणे तुमच्यावर प्रेम करतो आहे. माझ्या लेखनाचे नायकत्व मी तुम्हांला दिलेले आहे. तुमचे चरित्रगायन करण्याचे मी ठरविले आहे. कारण तुमचे गीतगायन कोणीच केले नव्हते. तुम्ही चरित्र-नायक नव्हते म्हणून नव्हे तर ज्यांनी गावे त्यांचे गळे स्वतंत्र नव्हते. माझा गळा, माझा आवाज मात्र स्वतंत्र आहे. म्हणून मी तुम्हांला गायचे ठरविले आहे. कारण या दुर्दैवी देशांत तुमचा आणि माझा जन्म एकाच तुरुंगात झालेला

आहे. बाबासाहेब येण्यापूर्वी आपण एकाच काळोखाचे कैदी होतो. एकाच दुःखात खितपत होतो. आपणाला आज प्रकाश मिळाला आहे, परंतु अस्पृश्यता गेलेली नाही, दुःख मात्र संपलेले नाही, आणि म्हणून दलित साहित्यही संपणार नाही. अस्पृश्यतेशी आणि दास्याशी, विषमतेशी आणि दुःखाशी दलित साहित्याचे वैर आहे. जोपर्यंत अस्पृश्यता दास्य हे या देशांत असेल, या जगांत असेल तोपर्यंत दलित साहित्य आहे हे निश्चित आहे. माणसाच्या मुक्तीचा पुरस्कार करणारे माणसाला महान मानणारे, वंश, वर्ण आणि जातीश्रेष्ठत्वाला कठोर विरोध करणारे जे साहित्य असते ते दलित साहित्य असते. मागें एकदा आमच्या मित्राने आम्ही वंशवादी आहोत अशी आम्हालां शिवीगाळ केली होती. पण आम्ही निक्षून सांगतो आहोत की, आम्ही वंशवादी असू कसे? वंश आणि वर्णश्रेष्ठत्वाच्या खांडववनांत आम्ही भाजून निघालो आहोत. या देशांतील वर्ण किंवा वंशवाद किती भयंकर असतो याचा आम्हांला अनुभव आहे. आणि म्हणून त्याचा आम्ही विरोध करतो. हा विरोध आजचा नव्हे डॉ. बाबासाहेबांनी चळवळ सुरू केली तेव्हांपासून आम्ही वर्ण आणि वंशवादाच्या विरोधी आहोत. त्याचे शेकडो पुरावे आहेत.

आम्ही तुच्छतावादी नाही. आमच्या अल्पस्वल्प लेखनात कुठल्याहि जातीविरुद्ध प्रचार केलेला आढळत नाही. एकंदर सामाजिक, मानसिक व वैचारिक व्यवस्थेविरुद्ध आम्ही आहोत. उलट अत्यंत अवघड कार्य आम्हाला करावे लागत आहे. अनेक सुधारकांना, विचारवंताना त्यांचे शत्रू दिवत होते. त्यांनी ज्यांना शत्रू लेखले होते ते त्या त्या कालखंडात बरोबरही होते. मार्क्सवाद्यांना आणि समाजवाद्यांना त्यांचे शत्रू दिसतात. अनेक राजकीय पक्षांना त्यांचे विरोधक शत्रू दिसतात, पण आमचा शत्रू तर अदृश्य आहे. तो ग्रंथात आहे, भाषेंत आहे, शद्वांत आहे, विचारांत आहे तो मनात आहे. असल्या प्रचंड आणि सर्वव्यापी असूनहि अदृश्य असलेल्या शत्रूबरोबर आमचे युद्ध सुरु झालेले आहे.

हे युद्ध तसे फार पूर्वीपासून ब्रिटीशसत्ता इथे प्रस्थापित झाल्यापासून सुरू झाले आहे. अनेक हिंदु समाज सुधारकांनी ह्या माणसाच्या अदृश्य शत्रुविरुद्ध हल्ले केले आहेत. पण हे हल्ले हवे तेवढे जोरदार नव्हते. कारण हे लढणाऱ्या लोकांचे लक्ष फार मर्यादित होते. हिंदु कुटुंबाची-त्यांतल्या मध्यमवर्गीय हिंदु कुटुंबाची सुधारणा त्यांना करायची होती. कौटुंबिक सुखात वाढ होईल अशी व्यवस्था त्यांना आणायची होती. ती आणण्यासाठीही त्यांना

छळ सहन करावा लागला. पण तो त्यांनी सहन केला आणि त्यांतूनच सुधारणेचा रथ पुढे गेला. सामाजिक पुनर्रचनेचा विचार थोडे बळ घेवून उठला.

पण मोठ्या खेदाने कबूल करावे लागते की, आमच्या सुधारकांनी संपूर्ण भारतीय समाजाचा विचार कधीच केला नाही. त्या विचारासाठीं एकही सुधारक युरोपांतील सुधारक जसे फांशी गेले, आगीत जाळले गेले, देशोधडीला लागले, पण तसे इथे झाले नाही. इथे सुधारणेला प्रतिकूल नसणारी सत्ता होती. हिंदु-मुसलमानांची सत्ता असती तर कदाचित त्यांना देहदंड सोसावे लागले असते. परंतु सत्ता अनुकूल असूनही कोणीहि समाजसुधारकांना संपूर्ण समाजपुनर्रचनेचा अस्पृश्यता नष्ट करण्याचा विचार मांडलेला नाही. कां मांडला नाहीं? कारण त्यांची जातीनिष्ठा हेच त्याचे कारण आह. आणि जातीबहिष्काराचे भय आहे. त्यांना आहे ही व्यवस्था हवी आहे. कारण त्या समाजरचनेने त्यांना हवे तेवढे सर्व दिलेले होते. ज्यांना सर्व मिळालेले असते असते ते सर्वंकष बंडाचे विचार कसे मांडू शकतील. . . . . . . . . आजही डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचेप्रमाणे प्रखर विचार कोणीही मांडलेले नाहीत.

भारतीय असंतोषाचे जनक असलेले लोकमान्य टिळक आणि त्यांच्या बरोबरीचे अनेक नेते बहिष्काराला वचकून वागले आहेत. बहिष्काराला शरण गेलेले आहेत. हा आपल्या भारतीय नेतृत्वाचा विशेष आहे. कारण आपले नेतृत्व अजूनही इतरांना संधी आणि शिक्षण न मिळाल्यामुळे मर्यादित आहे. आणि हिंदुसंस्कृति आणि धर्म तर सर्वांना संधी आणि शिक्षण देण्याच्या कट्टर विरोधी आहे. राष्ट्रीय चळवळीचा इतिहास पाहिला तर जसजशी संधी आणि शिक्षण मिळाले तसतसे त्या त्या जातीजमातीचे नेतृत्व उदयाला आले आणि ते एकमेकांविरूद्ध लढले. ते लढूं नयेत असे एकाहि प्रारंभीच्या नेत्याने केले नाही. सर्वांचा विकास होईल, उद्धार होईल असे कधी मांडले नाही. सर्वसंग्राहक गांधीवादही याला अपवाद नाही. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखालीं जसजसा अस्पृश्य एकवटू लागला तसतसा राष्ट्रीय सभेत अस्पृश्यतेचा प्रश्न अधिक प्रमाणांत उठू लागला. इतिहासांतही असेंच घडले आहे. अनेक वेगवेगळ्या धर्माचे, जमातीची इथें आक्रमणें झाली पण त्या आक्रमकांना या समाजात येवढाहि बदल करण्याची इच्छा झाली नाही. कारण या हिंदुसमाजाची रचनाच अशी आहे की तिथे सामान्याला किंमतच नाही. त्याला माणूसच मानले नाही. आणि बाकिच्यांना जगण्याचे अधिकार आहेत. सुव्य-

वस्थित बांधलेल्या किल्ल्यांत शिरावे आणि सुरक्षित राहावे तसेंच आक्रमकांचे झाले आहे. ते आले, गादीवर बसले आणि त्यांना आधीच घडवून ठेवलेले सेवक मिळाले. त्यांच्या गादीकडे धनाचे ओघ लागले. हिंदु समाजाची रचना ही राज्यसत्तेला एवढाही त्रास पडू नये अशीच आहे. धर्म ही राजाला विष्णूचा अंश म्हणून मान्यता देवून गेलेली आहे. हिंदुची अनेक तत्त्वें ही सरंजामशाहीला पोषक अशीच आहेत. म्हणून अस्पृश्यतेची ओळख अनुभव नसणाऱ्या सत्तेनेही तिला आहे तशीच राहू दिली. कारण शोषकाची सर्वोत्तम व्यवस्था अस्पृश्यतेच्या उत्पादकांनी करून ठेवली होती. ती सत्तेला तर हवीच असते.

म्हणून आम्ही म्हणत असतो की, हिंदुधर्म हा सामंतशाही व्यवस्थेतून जन्मलेला सामंतशाही व्यवस्था बळकट करणारा आणि सामंतशाही मनोवृत्तीचे पोषण करणारा आहे. सामंतीव्यवस्थेत स्त्रिला आणि गुलामाला कांहीही स्थान नव्हते. हिंदुर्धर्मातही त्यांना कांहीही स्थान नव्हते.

त्यांना स्थान प्राप्त करून देण्यासाठी कोणीदेखील यत्न केला नाही. हिंदुसंताच्या कामगिरीचा आज खूप गौरव केला जातो. पण हिंदुसंतानी स्त्रि-शुद्रासाठी येवढीही चळवळ केली नाही. उलट स्त्रिबद्दल अत्यंत ओंगळवाणा प्रचार केला. मोक्षाच्या मार्गातील तिला धोंड मानली. तिच्याबद्दल तुच्छता, किळस निर्माण होईल असेच ते बोलत राहिले. अस्पृश्यांना त्यांनी अपवित्रच मानले आणि एकानेही अस्पृश्यतेला टिकवून धरणाऱ्या तत्वांची चिकित्सा केली नाही उलट त्याचा पुरस्कारच केला. आपल्या सुंदर आणि सामर्थ्यशाली शद्बांतून हे विष घरोघरी मनोमनी पोहोचते केले आणि माणसे मोडून टाकली. एकाहि संताने कर्मवादाला पुनर्जन्माला आव्हान दिले नाही. आत्मा, स्वर्ग, नरक ही काय भानगड आहे असे विचारले नाही. भोवतालचे दुःख हे परमेश्वराने दिले आहे की सामंतशाहीच्या रचनेमुळे आले आहे हे पाहिले नाही तसे हे संतलोक राज्यसत्तेशी बांधलेले नव्हते. आता जसे काही संत धनसत्तेशी राज्यसत्तेची चाकरी करतात तसे ते चाकर नव्हते. परंतु आपल्या कुशल आणि क्रूर समाजरचनाकारांनी अशी काही रचना केली होती की, ती संतांनी बिनतक्रार मान्य केली आणि खूप कठोरपणाने स्त्रिशुद्रांची निंदा केली. स्त्रिला तर त्यांनी कमालीचे हिडीस, ओंगळवाणे चितारून ठेवले आहे.

जेव्हा पुनर्जन्म, कर्मवाद आणि मनुस्मृतीचे कायदे ते मान्य करतात तेव्हा ते सामंतशाही व्यवस्थेचा आणि अस्पृश्यतेचा पुरस्कार करीत असतात.

आणि म्हणून अनेक संत आले, त्यांच्याबरोबर त्यांनी निवडलेले देव आले पण समाज जसाचा तसाच राहिला. अस्पृश्यतेला एवढाही धक्का लागला नाही. जसे वरिष्ठ वर्गातील संतानी, विचारवंतानी अस्पृश्यतेचा प्रश्न कधी हाताळला नाही. तसाच अस्पृश्यांनीहि अस्पृश्यतेविरुद्ध एकदाहि उठाव केला नाही. बाबासाहेब येईपर्यंत अस्पृश्य समाज त्यांच्यावरील गुलामगिरी बिनतक्रार मानीत होता. त्याच्यावरील गुलामगिरी ही जमातीवर आणि धार्मिक, सांस्कृतिक आणि दंडसत्ता ज्यांच्या हाती आहे त्यांनी निर्माण केलेली आहे असे त्यांना कधी कळलेच नव्हते. तर ती स्वर्गातील फौजदारांनी त्यांना बहाल केलेली आहे असेच ते मानीत होते. गतजन्मी पाप केले आहे म्हणून हा जन्म आहे असेच त्यांचे अज्ञान त्यांना पटवून देत होते, आणि पुढला जन्म चांगला मिळावा म्हणून सारे बिनतक्रार सहन करीत होते.

त्यांने एवढेही बंड करू नये म्हणून समाजरचनाकारांनी त्याला सत्ता, संस्कृती, शिक्षण आणि शस्त्रपासून दूर ठेवले होते, आणि जर माणसाला असे नैसर्गिकपणे जगायला भाग पाडले तर तो माणूस असूनही माणूस राहात नाही माणूस हा निसर्गाचा छोटासा आकार आहे. निसर्ग सतत गतीशील आहे, सृजनशील आहे. माणूसही सतत गतीशील आणि सृजनशील असला पाहिजे. माणसाचे शरीर आणि आंतील शक्ती सृजनासाठीं धडपडत असतात. आणि त्यांना जर तसे सृजन करायला मिळाले नाही. तर त्या गंजून जातात. माणूस जनावर बनतो. आळसाच्या प्रचंड भाराखालीं चिरडला जातो. मीं अनेक वर्षे गावांगावांतून फिरतो आहे. मानवी शरीर धारण केलेली पण मुर्दाड बनलेली माणसे मी पाहिली आहेत. मानवी शक्तिचा, उत्साहाचा, श्रमाचा, बुद्धिचा, नालस्तीच्या निष्ठूरपणाने झालेला आणि होणारा संहार पाहून मी भडकून जातो. पण भडकून उपयोग काय? ज्यांनी ही करणी केली त्यांना थोडेबहुत औदार्य मिळाले असेल, शांतपणाने लुटीवर जगता आले असेल कारण त्यांच्या सुखसमृद्धीला विरोध करणारे त्यांनी असे विष देवून गारद केले होते. पण त्यांच्या गारद होण्याने प्रतिकारच गारद झाला होता. परकी आक्रमकांचा बिजय झाला होता.

आणि केव्हां केव्हां तो निर्मिती करायला मिळावी, अंगातील शक्ति प्रगट करता यावी, माणूस म्हणून जगण्यातील, हातात हत्यारे घेवून लढण्यातील मौज चाखता यावी म्हणून परकीय सत्तेला सामील झाला होता मुसलमानांची

ताकद वाढविणारे, ब्रिटीश कंपनीचे सैनिक होवून लढणारे-लोक अस्पृश्यच होते. पण ते फार थोडे होते. येथल्या निष्ठुर व्यवस्थेने मात्र तो संहार अजूनही थांबविलेला नाही. आदिवासी आणि भटके लोकांची प्रचंड ताकद अजून कुजते आहे. कामक्रोधांत ती व्यक्त होते आहे. माणसाची आपल्या देशाएवढी निर्दय नासाडी जगाच्या पाठीवर कोणी केली नसेल.

भारतीय आणि जगांत असलेल्या दासप्रथा यांत केवढा तरी फरक आहे कारण भारत सोडून जगांतील गुलामांनी बंडे केलेली आहेत. मार्क्स म्हणतो त्याप्रमाणे भारत सोडून बाकीच्या जगाचा इतिहास हा वर्गकलहाचा इतिहास आहे. पण भारतीय पुढाऱ्यांनी मात्र हे बंडच मोडून टाकले होते. दुःखाला कारण स्वर्गातील देव आणि दैव अथवा गतजन्माचे पाप केल्यामुळे इथे ज्यांनी बंड करुन उठावे ते बंड करुन उठले नाहीत. आणि त्यामुळे भारतीय जीवन माणसे सडून गेली.

ब्रिटीश इथें येईपर्यंत संपूर्ण भारतीय जीवन असेच होते. ब्रिटीशांबरोबर यंत्रयुग आले. नवे विचार आले आणि थोडीशी खळबळ होवू लागली पण तळगाव शांतच होता. अजूनहि परंपरेने चिरडून टाकलेला केवढातरी जन-विभाग शांत आहे. बाबासाहेब आले आणि खालचे खवळून उठले. या खळबळीतून आणि बाबासाहेबांच्या विचारांतून दलित-साहित्य जन्माला आले.

दलित साहित्य म्हणजे सूडवाद्यांचे साहित्य नाही. दलित साहित्य विद्वेष पसरविणारे साहित्य नाही. दलित साहित्य माणसाच्या महत्तीचा आणि मुक्तीचा प्रथम पुरस्कार करते आणि तसेच ती एक ऐतिहासिक गरजही आहे. म्हणून स्वतःला वेगळे नांव धारण करते. दलिताने लिहिलेली आणि अमेरिकेतील कोणाएकाने लिहिलेली कविता कविताच असू शकते. ती चांगली वाईट नंतर ठरू शकते. पण ती कविताच असते. हे जसे खरे आहे तर मग हे नांव का धारण केलेले आहे त्याला दोन कारणे आहेत. एक कारण तुम्ही आहांत आणि दुसरे कारण आजपर्यंतचे भारतीय साहित्य आहे आणि हा देश आहे.

तुम्ही कसे आहांत याचा आपण आधी विचार केला पाहिजे. तुम्ही आंबेडकरी आंदोलनांतील आग प्राशून अग्नीमय झालेले आहांत. या गांवी जो चवदार तळ्याचा सत्याग्रह झाला त्यावेळी बाबासाहेबांनी तुमच्या त्या सभेची फ्रेंच राज्यक्रांतिच्या राष्ट्रीय सभेशी तुलना केली होती. आणि समता, स्वातंत्र्य

आणि बंधुभाव व्यक्त करणारे ठराव तुम्ही मंजूर केले होते. तसेच १७ ठराव क्रान्तिकारक फ्रेंच राष्ट्रीय सभेने १७८९ साली केले होते.

महाडच्या या सभेत बोलताना बाबासाहेब म्हणाले होते की, या क्रान्तिला युरोपच्या इतिहासकारांनी नांव ठेवले होते. पण मी त्या क्रान्तिला नांवे ठेवू शकत नाही. कारण त्या क्रान्तितून आलेल्या विचाराने युरोपच्या भाग्योदयाचे दरवाजे उघडले. युरोपचे कल्याण झाले. तसेच या सभेने या देशाचे कल्याण होईल असे बाबासाहेब म्हणाले होते. आणि तुम्हांला क्रान्तिकारक मानले होते.

तुम्ही क्रान्तिकारक आहांच-बाबासाहेबांच्या चळवळीतून तुम्ही खूप नाकारण्याचे शिकला आहांत. तुम्ही खूप नाकारून गेला आहांत. तुम्ही अनेक रुढीरिवाज, संकेत, देव आणि धर्म नाकारला आहे. ही नाकारण्याची शक्ती कमी नाही. ती मोठ-मोठया विचारवंतांना देखील पेलवीता आलेली नाही.

मोठमोठे समाजसुधारक बहिष्काराला धाबरून गेले होते. खद्द लोकमान्य टिळकांनी लोकमतापुढे नमून स्वतःला शुद्ध करुन घेतले होते. पण तुम्ही माणसाला मोडून काढणारे किती संकेत जाळून भस्म केले. अगदी चळवळीच्या सुरवातीलाच तुम्ही अपूर्व धाडस दाखविले होते. ज्या मनुस्मृतीपुढें सर्व शासकानी आणि मरणाला आपल्या डोळयांनी बघणाऱ्या संतांनी मस्तक झुकविले होते. ती मनुस्मृती तुम्हीं याच गांवी अग्निच्या मुखीं दिली होती. आणि संबंध भारतात खळबळ उडवून दिली होती.

अनेक अर्थाने तुम्ही मोठे आहांत मार्क्स ज्या क्रांतिकारकाचे वर्णन करतो त्या वर्णनाप्रमाणे तुम्ही आहांत. आणि भगवान बुद्धाच्या व्याख्येतही तुम्ही सहज समाविष्ट झालेले आहांत.

तुम्हांत युग निर्माण करण्याची शक्ती आहे हे आम्हांला पटले आहे म्हणून आम्ही तुमचे नांव आमच्या साहित्याला धारण केले आहे. कारण तुम्ही पुढे जाणारे आहांत आज या घडीला सर्व जनसमूहाने-राष्ट्रानें भविष्याच्या मुठीतले भव्य घ्यायला पुढे जायला हवे, परंतु आज आपणाला असे दिसते आहे की अनेक संस्था, अनेक राजकियपक्ष आणि व्यक्ती इतिहासाकडे पळत आहेत. इतिहासांतील नायकाकडून प्राण आणि प्रेरणा घेत आहेत. इतिसाहांतील युद्धे आणि वैरे पुन्हा उकरून काढीत आहेत. हे भविष्याकडे पाठ फिरवून मागे

जगणे जिवंतपणाचे लक्षण ठरू शकत नाही. कारण भविष्यकाळावर त्यांचा विश्वास नाही. भविष्यकाळावर जर त्यांनी विश्वास टाकला तर त्यांचा वर्गीय अहंकार नष्ट करावा लागेल. त्यांना त्यांचा तो वर्गीय अहंकार टाकायचा नाही, म्हणून ते इतिहासाकडे पळत आहेत. आणि तुम्ही मात्र पुढे जात आहात प्रकाश शोधीत आंहांत.

तुमच्या पायाखाली वर्तमान आहे. आणि डोळ्यापुढे भविष्यकाळ आहे. आणि तुमचा इतिहास हा माणसाला मुक्ती देणारा इतिहास आहे. आणि तुमचा आदर्श डॉक्टर बाबासाहेबांप्रमाणें ज्ञानपूजक आहे. आणि करुणेचा सागर भगवान बुद्ध आहे.

दलित साहित्याला प्रेरणा आणि प्रेरक आणि प्रकाशित आहे. या देशांत माणसाचा भयंकर अवमान झालेला आहे. माणसांचा एक व्यवस्थेने कोंडी-करून मुडदा पाडलेला आहे. आणि म्हणून दलित साहित्य माणसाला केंद्र करते. माणसाच्या स्वातंत्र्याचा प्राणपणाने उच्चार करते. माणसाला महान मानते आणि देवधर्माला माणसाहून लहान मानते. माणूस म्हणजे महाकाव्य . . . . . माणसाच्या भावना म्हणजे महान ऋतु. माणसानंच हे जग नटविले आहे. आणि माणसाचेच हात प्रगतीचे रथ होत असतात. माणसाच्याच कष्टाळू करकमळांतून क्रान्त्या जन्म घेत असतात. असा आमचा विश्वास आहे. म्हणून हे युग आम्हांला आमचे युग वाटते. कारण या युगाने माणसाला मुक्ती दिली आहे.

माणस आमच्या विचाराचा केंद्र असल्यामुळे माणसाला खुनी, व्यभिचारी पापी मानणारा आणि मुंगी लेखणारा प्रकार आम्हांला तुच्छतावादी वाटतो. तुच्छतेचा आम्हालां प्रचंड अनुभव आहे. ही तुच्छता माणसाचा अवमान करते आणि वर्ण, जातीव्यवस्थेचा पुरस्कार करते. ही विचारधारा मांडणारे लेखक एकेकाळी ज्यांनी तुच्छता निर्माण केली त्याच वर्गातून आलेले आहेत.

या महाड गांवी १९२७ साली माणसाचा केवढा दिव्यभव्य संताप प्रगट झाला होता. त्या दिव्यभव्य संतापाचे एकाहि मराठी लेखक कवीने चित्रण केलेले नाही. त्या संतापातून प्रकाश जन्म घेत होताच मुक्ती अवतारत होती पण एकाहि वर्तमानपत्राने त्याची दखल घेतली नाही. 'महारमाटे' म्हणून ज्यांचा आम्ही गौरव करतो त्या महारमाटयांनी देखील त्या संतापाची अवहेलनाच

केलेली आहे. भगवान बुद्धा येवढेच महान असलेल्या त्या महाडच्या युद्धावर एकही कादंबरी नाही असे कां व्हावे? या प्रश्नाचे उत्तर शोधीत असतांना असे आढळून येते की, मराठीचा लेखक वर्ग हा फार हिन्दु आहे आणि तो फार हिन्दु असल्याकारणाने गांवाजवळच्या महार, मांगवाडयात तो कधी डोकावला नाही. तो फक्त डॉ. केतकराने म्हटल्याप्रमाणे सदाशिवपेठी वाङमय लिहित राहिला.

हिन्दुत्ववाद्यांच्या चळवळी वाढल्या तेव्हा मुसलमानाच्या विरुद्ध लिहू लागला. आणि गांधीवादी चळवळीने जोर पकडला. हिंदु-मुसलमान ऐक्याची अस्पृश्यतेच्या उच्चाटनाची चळवळ जेव्हां लोकमान्यता पावली तेव्हां मात्र कांही कादंबऱ्यांतून उपनायक, नायिका ह्या अस्पृश्यांतून येवूं लागल्या. पण त्या पुष्कळ अंशाने खोटया होत्या. आणि मध्यमवर्गीय होत्या. काळाराम मंदिर सत्याग्रह आणि असेच अनेक लढे अस्पृश्यांनी दिले पण ते साहित्यात अवतरले नाहीत.

ते न अवतरण्याचे कारण लेखक अनुभव घ्यायला भितात आणि वाचकालाहि दचकून असतात. ज्या बहिष्काराला अनेक सुधारक पुढारी घाबरले होते, त्याच बहिष्काराला लेखक घाबरत असतात काय? की, त्यांच्यावर अगदी लहानपणापासून झालेले तुच्छतेचे संस्कार त्यांना महारवाडयात जाऊं देत नाहीत?

हे संस्कारच त्यांना रोखीत होते हेच आम्हांला खरे वाटते. कारण मराठी कादंबरीतील आणि नाटकांतील स्त्री ही पारंपरिक आहे. जुन्या शास्त्रपुराणांतील स्त्रियाप्रमाणेच ती लेखकांनी उभी केलेली आहे, कारण तसे दाखविल्याशिवाय लेखकाला समाधान मिळणार नसते. दलित साहित्याने मात्र हे संस्कार झुगारले आहेत. म्हणून माणसाचे त्याच्या सुखदुःखाचे, वासना भावनाचे ठसठसीत चित्रण होवूं शकेल. दुःखाला आणि ज्याला अद्याप मराठीने प्रेमकरुणेने आलिंगन दिले नाही, त्या अनेक बहिष्कृतांना ते मराठीत आणतील. मराठी केवळ सदाशिव पेठेतील माणसांशी न राहतां अनेक माणसाने गजबजून जाईल. अनेक शद्ब आणि प्रतिभा मराठीत येतील आणि मराठी साहित्य खुपखुप माणसाचे होईल.

**(अध्यक्षीय भाषण, महाराष्ट्र बौद्ध साहित्य सभा, सम्मेलन दुसरे, महाड, दिनांक १३ व १४ फेब्रुवारी, १९७१)**

# दलित लेखकांच्या विद्रोहाला दिशा हवी

प्रा. म. भि. चिटणीस

''अस्मितादर्श ह्या प्रागतिक विचार संसदेच्या त्रैमासिकाच्या लेखकांच्या या पहिल्या मेळाव्याचे आणि त्यांजबरोबर भरविलेल्या या दलित लेखकांच्या साहित्यकृतींच्या प्रदर्शनाचे उद्‌घाटन करण्याचा मान अस्मितादर्शचे संपादक, मुद्रक आणि प्रकाशक प्रा. गंगाधर पानतावणे यांनी मला दिला याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. या समारंभाच्या आमंत्रण पत्रिकेत त्यांनी माझ्या नावाला जी 'सुप्रसिद्ध' आणि 'विचारवंत' ही जी दोन बिरुदे जोडली आहेत त्याला माझ्या पात्रतेपेक्षा त्यांचा मजसंबंधीचा स्नेहभावच अधिक कारणीभूत आहे हे मी प्रारंभीच आपणास सांगू इच्छितो. प्रसिद्धि अथवा विचारप्रवर्तन ह्या दोन्ही मोठेपणाच्या लक्षणावर मी आपला हक्क सांगू शकत नाही. माझी जी कमाई ती एवढीच की डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दलित वर्गाच्या जागृती आणि विमोचनासाठी जी वैचारिक व सामाजिक आंदोलने केली आणि शैक्षणिक उपक्रम केले ते जवळ जवळ चाळीस वर्षे जवळून पाहण्याचे किंवा त्यात अंशता सहभागी होण्याचे भाग्य मला लाभले.

गेल्या पन्नास वर्षांच्या अवधित दलित मुक्तिसंग्रामाने भिन्न रूपे धारण केली. त्यातले गेल्या दशकातले आशाजनक रुप म्हणजे दलितांचा शब्दांकित आत्माविष्कार. दलितवर्ग हा भारताचा एक पुराण मूक आणि अदृश्य पुरुष होता. भारताच्या इतिहासात संस्कृतीत आणि साहित्यात त्याचे व्यक्तिमत्व अगोदरच होते. एकाद्या चोखा–बंकाने काढलेले उद्‌गार त्या अदृश्य पुरुषाला व्यक्त करण्याऐवजी वर्णनिष्ठ साधुसंताच्या टाळ गजरातच विरून जात. अदृश्य असला तरी त्याला अस्तित्व आहे, ही जाणीव त्याच्या राजकीय क्षेत्रातील पदक्षेपाने आणि त्याला जखडविणारी धर्माची गुंगी त्याने झिडकारण्याने भारताला प्रथम दिली. परंतु तरीही आजही तो राष्ट्रजीवनात अदृश्यवतच आहे. एकाद्या खेड्यात त्याच्या झोपड्या पेटवल्या गेल्या, त्याला संशयावरून

जिवंत जाळले किंवा त्याच्या बायकोची विटंबना झाली, तरच कुठे वृत्तपत्रात त्याची किंकाळी उमटते. गेल्या पाच दहा वर्षांतच मात्र त्याच्या अपमानाची चीड दाहक शब्दरूप घेऊ शकते, जुलमी प्रस्थापिताला वीरोचित निर्भयतेने आव्हान देऊ शकते. त्याच्या दुःखातिरेकाचा हुंदका जगाला समभावनेने व्यथित करू शकतो. तो खानेसुमारीतील केवळ संख्या नसून, त्या त्या संख्येइतका तो विविध मानवव्यक्ती असून, त्या प्रत्येक व्यक्तीचे जीवनातील संघर्ष अनुभूती आणि भावविश्व भिन्न आहेत, लक्षणीय आहेत. आणि अभिनव साहित्याची बीजे त्यात साठवलेली आहेत. याची ओळख जगाला पटू लागली आहे. त्या अदृश्य भारताला पूर्णतया दगोचर करण्याचे कार्य, मित्रहो, तुमच्या साहित्याने घडत आहे, असं मला प्रामाणिकपणे वाटते.

दलितवर्गाला आपल्या भावना, इच्छा, आकांक्षा ऐकून भावानुभवांचा वाङ्मयीन आविष्कार त्याच्यावर धर्माने लादलेल्या निरक्षरतेमुळे आणि निर्बंधामुळे निषिद्ध असल्याकारणाने, त्याचप्रमाणे सामान्य मानवी प्रतिष्ठाही त्याला नाकारली असल्यामुळे आज होऊ लागलेला त्याचा आत्माविष्कार, विशेषत काव्यातील, हा समाजविद्रोही भूमिका घेत आहे. हे स्वाभाविक आणि अपरिहार्य आहे. कारण जिथे आत्माविष्कारातील आत्मत्वच-व्यक्तिमत्वच-निषेधिले जाते, तिथे आत्माविष्काराचा प्रयत्न आत्मत्वाला निषेधिणाऱ्या समाजाशी विद्रोही अथवा संघर्षात्मकच भूमिका घेऊन अवतरणार. धर्माने दिलेला दर्जा हा स्वसंपादित दर्जाप्रमाणे सहज विसरता येत नाही. विशेषतः पावलोपावली त्या धर्मप्राप्त दर्जाचे परिपालन करायला लावणारा समाजाचा अस्पृश्यतेच्या रूढीसारखा दंडक मागे असल्यावर तो धर्मप्राप्त दर्जा विसरणे अशक्यच आहे. पूर्वाश्रमीच्या अस्पृश्यवर्गीय प्राध्यापकाला कविता लिहिताना अर्थात् तो जर खरोखर कवी असेल तर आपण प्राध्यापक आहोत, ह्याची जाणीव असणार नाही. परंतु धर्मप्राप्त दर्जाचे तसे नाही. तुकारामाला आपले शूद्रत्व आणि चोखामेळ्याला आपले अंत्यजत्व डाचतेच की नाही. आणि हे तर समाजनिरपेक्ष आत्मानुभूतिनिष्ठ कवी. मग ज्या लेखकाचे अनुभवविश्व समाजात उगम पावते आणि ज्याचे श्रेय आणि प्रेम समाजाशीच अविच्छिन्नपणे निगडित आहे, त्या पूर्वाश्रमीच्या अस्पृश्य लेखकाला आपल्या धर्मप्राप्त दर्जाची जाणिव आत्मविष्कारातही राहावी, यात आश्चर्य ते काय? विशेष हा की, ही जाणिव त्याच्या लेखनाला एक वेगळीच परिमाण आणि धार देते. त्याचा आत्माविष्कार व्यक्तिनिष्ठता न हरपता समष्टिनिष्ठ होतो. कवीची चीड, संताप, आव्हान, असहाय्यता, अगतिकता,

आशा, विजिगिषा एकूण प्रस्थापित समाजव्यवस्थेसंबंधीचा त्याचा क्षोभ, एका व्यक्तिचाच न रहाता आजपर्यंत वंचित परंतु आज जाग येऊन न्याय मागणाऱ्या एका मोठ्या गटाचा क्षोभ असे प्रातिनिधिक रूप घेतो. अभावितपणे पण सामाजिक आशय व्यक्त होतो. म्हणजेच दलित काव्याच्या आस्वादात कलाबाह्य मूल्यांचा संदर्भ घ्यावा लागतो. म्हणून हे दलित काव्यच नव्हे, असा शुद्ध रुपवादी, कलावादी समीक्षक आक्षेप घेतात. जीवनाभिमुख कवींनी या आक्षेपांनी बुजून जाण्याचे कारण नाही. साहित्य हा समाजजीवनाचाच एक व्यापार आहे. ते जर जीवनवेधी राहिले नाही, एका विशिष्ट काळच्या समीक्षेने घालून दिलेल्या आवर्तनातच घुटमळत राहिले, तर त्याची वाढ खुरटत जाईल. मला वाटते, दलित साहित्याने समीक्षाभिमुख राहण्यापेक्षा जीवनाभिमुख राहणे त्याच्या निकोप वाढीस आवश्यक आहे. साहित्यच समीक्षेला परिवर्तनाचे आव्हान देते.

वरील विवेचनातील दलित साहित्य म्हणजे धर्माने आणि सामाजिक रुढीने ज्यांना आजवर बहिष्कृत मानले त्या दलित लेखकांचे साहित्य असे गृहित धरलेले आहे. त्यांचे स्वतंत्र असे एक अनुभवविश्व आहे. अस्पृश्यतेच्या रूढीमुळे त्याना आलेले आणि आजही येणारे, त्यांची माणुसकीच प्रश्नांकित करणारे कटु अनुभव, त्यांचा भावनिकप्रतिक्रियेची तीव्रता ही आर्थिकदृष्टचा दलित असणाऱ्याच्या वाट्यास कधीच येत नाही. म्हणून त्यांच्या आत्माविष्कारी विद्रोही काव्याचा एक स्वतंत्र गटच मानला पाहिजे. परंतु कथाप्रधान साहित्यात मात्र ही स्वायत्तता मानता येणार नाही असे मला वाटते. आमच्या जीवनाचे ज्ञान केवळ आम्हालाच होऊ शकते, आमच्या जातीय आंतरवर्तुळातीलच लेखकांना होऊ शकते. बाह्यवर्तुळामधल्याना नाही हा एक तार्किक, आपत्ती ओढविणारा (ईपिस्टॉमॉलौजीकल) सिद्धांत आहे. तुमच्या जीवनाचे ज्ञान तुम्हालाच होते मग तुमच्यामधील स्त्रियांच्या ज्ञानाची मक्तेदारी स्त्रियांकडे, वृद्धांची वृद्धांकडे आणि स्पृश्य समाजाची केवळ स्पृश्यांकडे जाणार अशा रीतीने ज्ञानाच्या मक्तेदारी भिन्न भिन्न आणि प्रत्येक खेपेला लहान लहान होत जाणाऱ्या गटाकडे सोपवावी लागेल. हा ज्ञानविषयक सिद्धांत मार्क्सिझमच्या (कॉन्शसनेस) च्या सिद्धांतासारखा वाटतो. त्या सिद्धांताप्रमाणे भांडवलशाही समाज आपल्या विकासाच्या अंतिम अवस्थेला पोचल्यावर प्रगत अशा श्रमजीवी (प्रोलेटरीयट) वर्गालाच एकंदर समाजाच्या ऐतिहासिक आणि सामाजिकत्वाची आणि त्या समाजाच्या भावी ऐतिहासिक कार्याची जाणिव

होते. भांडवलदारी आणि मध्यमवर्गाच्या विचारवंतांना नव्हे. पण ही वस्तुस्थिती असते काय ? साम्यवादाचे प्रणेते मार्क्स, एंगल्स, लेनिन इत्यादी मध्यमवर्गातीलच नव्हे काय ? शेवटी मार्क्स वेबर या समाजशास्त्रज्ञाप्रमाणे असेच म्हणावेसे वाटते, (वन नीड नॉट बी सीजर इन ऑर्डर टु अंडरस्टॅण्ड सीजर) शिवाय प्रत्येक समाजात बांधिलकी नसलेला बुद्धिजीवी वर्ग असतोच. त्याचे स्थानही वर्गविरहित (क्लासलेस पोजिशन) असून तो कोणत्याही वर्गाच्या आंतर आणि बाह्य वर्तुळात वावरू शकतो. साम्यवादाच्या जाहीरनाम्यातही म्हटले आहे की, श्रमजीवी वर्ग जनतेच्या सर्व वर्गातून आलेला असतो. (दी प्रोलेटरियेट इज रीक्रीयेटेड फ्रॉम ऑल क्लासेस ऑफ दी पॉपुलेशन) आपआपल्या गटासंबंधीच्या ज्ञानाची मक्तेदारी त्या त्या गटाकडेच आहे, असे मानू लागल्यास जातीजातीमुळे अनेकविध स्तरीकरण झालेल्या हिंदी समाजातल्या साहित्यात सध्या भाषाभिन्नत्वामुळे निर्माण झालेली क्षेत्रे जातिनिहाय संकुचित होऊन त्यात सार्वजनिकताही उरणार नाही.

बहुतांश दलित साहित्य हे विद्रोही आहे. हा विद्रोह का व कोणाशी हे कळते. परंतु पुष्कळ वेळा या विद्रोहय विषय झालेल्या प्रस्थापितांचा नाश केल्यानंतर पुढे काय साधायचे आहे, त्या ध्येयाची जाणीव आढळत नाही. ही जाणिव सुस्पष्ट करणे, हे ललितसाहित्याचे कार्य नव्हे, हे जरी मान्य केले तरी, अस्पष्ट का होईना पण त्याची जाणिव लेखकाला असणे हे त्याच्या सर्जनशक्तीच्या निकोपपणाचे लक्षण आहे. दलित साहित्यिकाचा विद्रोह हा व्यक्तिनिष्ठच नाही, तो ज्या समाजाचा घटक आहे, त्याचाही तो विद्रोह आहे. तेथे मी अखिल समाज, संस्कृती, जीवनमूल्ये यासंबंधीच ज्याला दुरावा उत्पन्न झाला आहे, ज्याची मुळे भूतवर्तमानभावी अशा कोणत्याही काळात रुजत नाही, ज्याला जग आणि आपले जीवन असंबद्ध वाटते, अशा साहित्यिकासंबंधी बोलत नाही, तर ज्याला धर्माच्या आणि रुढीच्या नावाखाली आपली आणि ज्या गटाचे आपण एक घटक आहोत, त्या समाजाची पायमल्ली होते आहे, त्या दलित साहित्यिकासंबंधी बोलत आहे. त्या साहित्यिकाला प्रस्थापित समाजव्यवस्था बदलावयाची आहे. म्हणजे त्याला पर्यायी व्यवस्था अपेक्षित आहे ती कोणती, याची अस्पष्ट तरी कल्पना त्याच्या साहित्याद्वारे यायला हवी. त्याला फक्त (नॅशनल) अस्पृश्यता नष्ट करायची आहे, की माणसाच्या तृष्णेमुळे उत्पन्न होणारे दुःख म्हणजे (एक्सप्लॉएटेशन) बुद्धानीं सांगितलेल्या आत्मसंस्काराने नष्ट करून समता साधायची आहे की, अस्पृश्यता ही ज्या ग्रामीण

अर्थव्यवस्थेने तोलून धरली आहे, ती नष्ट करण्यासाठी सर्व दलित जनतेचे संघटन करून वर्गविग्रहाच्या लढ्यातून आर्थिक समता साधायची आहे. दलित साहित्य हे स्वभावतःच जीवनाभिमुख साहित्य असल्यामुळे त्याला सहेतुकता ही अपरिहार्य आहे. दलित लेखकांनी आरशातील प्रतिबिंबासारखी आपली अस्मिता व्यक्त करणे म्हणजेच आजपर्यंत पंचम भारताला दृष्टिगोचर करणे. याच्या-इतकेच त्या अस्मितेचे ज्या आदर्शात पर्यवसान व्हावे, असे त्यांना वाटते, त्याचीही दृष्टिगोचरता वाढविणे, हे त्यांचे कर्तव्य आहे, आणि त्यांनी ते पार पाडावे. असे माझ्यासारख्या जुन्या पिढीतील समाजसेवकाचे त्यांच्याकडे नम्र मागणे आहे.

**('अस्मितादर्श'च्या २६ जानेवारी १९७४ च्या लेखक मेळाव्यातील उद्घाटनाचे भाषण)**

# समाजपरिवर्तनाच्या चळवळीला नवे वळण लागण्याची शक्यता

* गं. बा. सरदार

१९२० नंतर मराठी वाङ्मयात एक वेगळा प्रवाह येऊन दाखल झाला. साहित्य हे केवळ एक साधन नव्हे, तर ते साध्यही असू शकते ही जाणीव लेखकांना उत्कटतेने होऊ लागली. वाङ्मयनिर्मितीत प्रयोगशीलता आली. रचनातंत्राला वेगळेच महत्व प्राप्त झाले. पूर्वी साहित्यसमीक्षेत ग्रंथांच्या वाङ्मयीन गुणदोषांपेक्षा त्यांत प्रतिपादिलेल्या प्रश्नांचीच बहुधा अधिक चर्चा होत असे. आता कथा, कादंबरी, नाटक लघुकथा, लघुनिबंध यांच्या तंत्रांचा बारकाईने अभ्यास सुरु झाला. व त्या दृष्टीने साहित्याचे मूल्यमापन होऊ लागले. कला आणि नीती, साहित्य आणि समाजजीवन या संबंधीच्या वादामुळे बरेच गुंता-गुंतीचे प्रश्न पुढे आले. साहित्यतत्त्वाची समज येण्यास याची मदत झाली. निरनिराळ्या अंगानी मराठी साहित्य समृद्ध झाले.

या काळात दुसराही एक फार मोठा बदल घडून आला. जीवनात सातत्य व परिवर्तन ही दोन्ही असतात. जुन्या प्रवृत्ती एकदम नष्ट होत नाहीत, पण त्यांना ओहोटी लागते. मर्यादित अर्थाने काहोईना आधीच्या वाङ्मयात जी समाजभिमुखता होती, ती आता पुष्कळच कमी झाली. बरेचसे साहित्यिक स्वयंकेंद्रित बनले. महात्मा गांधी व बाबासाहेब आंबेडकर यांच्या चळवळी खेड्यापाड्यांपर्यंत गेल्या होत्या. जुन्या मध्ययुगीन जीवनाच्या तटबंदीत कोंडल्या गेलेल्या शक्ती बंधमुक्त होत होत्या. औद्योगिक शहरांतून कामगारांच्या चळ-वळी मूळ धरत होत्या. ह्या नवोदित शक्तींवर योग्य संस्कार करण्याची खरोखर निकड होती. परंतु आपल्या साहित्याने त्यांची दखल घेतली नाही. १९३० नंतर मराठी साहित्यात गांधीवादाचे व समाजवादी प्रवृत्तींचे पडसाद उमटूं लागले. परंतु त्यांना सखोल व सर्वंकष जीवन-दृष्टीची बैठक नसल्या-मुळे ते क्षीणबलच राहिले या संदर्भात गांधीवादी व समाजवादी नेत्यांचे अपयश

येथे नमूद करणे भाग आहे. सच्चे गांधीवादी पुढारी विधायक कार्यात गढून गेले होते. धर्म व तत्वज्ञान हेच मुख्यतः त्यांच्या व्यासंगाचे विषय होते. त्यांची विज्ञानपराङ्मुखता त्याना नडली, आणि महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनावर त्यांची छाप पडली, समाजवादी नेते फक्त राजकीय व आर्थिक चळवळीवर भर देत होते. समाजक्रांतीचे उद्दिष्ट गाठण्यासाठी या चळवळींना सांस्कृतिक आंदोलनाची जोड दिली पाहिजे हे त्यांच्या ध्यानात आले नाही. त्यामुळे सांस्कृतिक परंपरेचा वारसा जुन्या पुनरुज्जीवनवादी आणि नव्या ऐहिकनिष्ठ व्यक्तिवादी लोकांच्या हाती राहिला.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर देशातील परिस्थितीत खूप फरक पडला. आजच्या वाङमयाचे स्वरुप लक्षात येण्यासाठी प्रथम ही पार्श्वभूमी विचारात घेतली पाहिजे.

स्वातंत्र्यलढ्याच्या काळात राष्ट्रीय आघाडीतील ऐक्यभाव आणि वर्गसमन्वयाचे धोरण यांना वेगळा अर्थ होता. भारत स्वतंत्र झाल्यावर तो जमाना संपला, आणि सत्तास्पर्धेचे, सत्तासंघर्षाचे युग सुरु झाले. निरनिराळ्या थरात व गटांत सत्ता, संपत्ती यांतील जास्तीतजास्त वाटा हस्तगत करण्यासाठी स्पर्धा सुरु झाली. निश्चित तत्वप्रणालीवर आधारलेल्या संघटनांचा अभाव असल्याने या भिन्न भिन्न घटकांतील स्पर्धेला अखेर व्यक्तिव्यक्तीतील स्पर्धेचे रुप आले. ध्येयदृष्टी, सामाजिक कर्तव्यबुद्धी, नैतिक मूल्ये यापेक्षाही या निर्घृन जीवनकलहात येथे "मी" ला सर्वोच्च स्थान प्राप्त झाले. तत्वज्ञान, विद्या, कला इत्यादी सांस्कृतिक क्षेत्रांवर त्याचा परिणाम झाला. आणि साहित्यातही अ-सामाजिकतेची प्रवृत्ती वाढीस लागली. मात्र त्याबरोबरच कलेच्या मूळस्वरुपाची तात्विक चर्चा होऊ लागली. पूर्वीचा कलावाद हा एका दृष्टीने तंत्रवादच होता. विज्ञान आणि तंत्रविद्या यात जसा फरक आहे, तसा कलास्वरुपशास्त्र व तंत्रचिकित्सा यांतही फरक आहे. कलास्वरुप-शास्त्राकडे दृष्टी वळताच तंत्राचा बडेजाव कमी झाला. काही उत्कट साहित्यकृती निर्माण झाल्या, पूर्वीच्या मानाने जीवनाविषयीची या नव्या लेखकांची समज अधिक खोल आहे, अभिव्यक्तीत अधिक व रेखीवपणा आलेला आहे. तसे पाहिले तर एकंदर मराठी साहित्याच्या पसाऱ्यात अ-सामाजिक साहित्याचे प्रमाण बरेच कमी आहे. पण त्याचा गाजावजा फार होतो. कांही अंशी ते गुणवत्तेनेही श्रेष्ठ दर्जाचे आहे. मात्र आपले अलीकडील सर्व साहित्य अजूनही काही विशिष्ट थरांतील वाचकांपलीकडे जाऊन पोचले नाही. उच्च साहित्याचे वाचक थोडेच असणार अशी समजूत करुन

घेणे इष्ट नाही. गेल्या काही वर्षात निराळ्या प्रवृत्ती दिसू लागल्या आहेत. लघुनियतकलिकांची चळवळ, प्रगतिशील साहित्याची चळवळ यांचे बळ खूपच कमी आहे. दलित वाङमयाच्या रुपाने मात्र एक जोरदार प्रतिक्रिया आपल्या-समोर उभी ठाकली आहे.

दलित वाङमयासंबंधी गेली दहाएक वर्षे बरेच बोलले जात आहे, उलट-सुलट चर्चा चालू आहे. दलित वाङमयाची निर्मिती ही सामाजिकदृष्टीने अत्यंत महत्वपूर्ण घटना आहे असे मी मानतो. या वाङमयाचा आशय मराठी साहित्याच्या अभ्यासकांनी तत्परतेने जाणून घेतला पाहिजे असे मला वाटते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे कार्य, शिकवण आणि त्यांचे स्वत:चे उदाहरण यामुळे अस्पृश्य समाजाला शिक्षणाची गोडी लागली. आपल्यासारख्या अकिंचन व अल्पसंख्य समाजाला ज्ञानाशिवाय दुसरा तरणोपाय नाही याची त्याला प्रकर्षाने जाणीव झाली. स्वातंत्र्योत्तर काळात मिळालेल्या शैक्षणिक सवलतींमुळे अस्पृश्यांमध्ये सुशिक्षितांची नवी पिढी आज निर्माण झाली आहे. त्यांच्या तीव्रतरदाहक अनुभवांतून व जणिवांतून दलित वाङमयाची निर्मिती होत आहे. त्यात या नवजागृत समाजाची आत्माविष्काराची व आत्मविकासाची जिद्द पदोपदी दिसून येते. भारतीय संविधानाने अस्पृश्यता नष्ट झाल्याचे घोषित केले आहे. सामाजिक व्यवहारात कोणत्याही प्रकारे अस्पृश्यता पाळणे हा कायद्याने गुन्हा ठरवण्यात आला आहे. शिक्षणसंस्था, राजकीय पक्ष, कामगार संघटना यांत वेगवेगळ्या जातीचे लोक एकत्र येतात. पण या साऱ्या गोष्टीमुळे प्रत्यक्ष व्यवहारातून अस्पृश्यतेचे उच्चाटन झाले आहे असे दिसत नाही. उलट गेल्या काही वर्षांत दलित समाजावर होणारा जुलूम व अत्याचार यांचे प्रमाण वाढले आहे.

अस्पृश्यता ही आजवर जी टिकून राहिली आहे त्याचे कारण केवळ दलितांचे शैक्षणिक मागासलेपणा व आर्थिक दैन्यवस्था हे नाही. हे दोन्ही घटक तर महत्वाचे आहेत. पण त्याशिवाय आणखी एका मूलभूत घटकामुळे तिला बळकटी आली आहे. आपल्या धर्मविचारातील पापयोतित्वाच्या, स्पर्श-जन्य विटाळाच्या, कल्पनेत अस्पृश्यतेचे मूळ आहे. तिच्यामुळेच दलितांच्या स्पर्शामुळे अन्नपाणी अपवित्र बनून निषिद्ध ठरते. त्याहूनही भयंकर गोष्ट म्हणजे त्याची नुसती सावली पडली तरी सवर्णांची, शुद्धता बिघडते. माणसाने माणसाच्या अंगी नसता अमंगळपणा चिकटवण्याची ही अभद्र व हीन मनोवृत्ती

धर्माच्या नावाखाली आपल्या सामाजिक व्यवहारात शतकानु-शतके ठाण मांडून बसली आहे. मानवतेच्या प्रतिष्ठेचा व सामाजिक न्यायाचा हा प्रश्न राजकीय व आर्थिक प्रगतीमुळे आपोआप सुटेल याबाबत दलित तरूणांचा आता भ्रम-निरास झाला आहे. या प्रश्नासाठी स्वतंत्र आंदोलन उभे करण्याची त्यांना गरज भासू लागली आहे.

दलित सामाजावर लादण्यात आलेली बाह्य बंधने कमी जाचक नव्हती. परंतु याहून भयानक अशी गोष्ट होती, ती त्यांच्या रोमरोमात भिनवून टाकलेल्या मानसिक गुलामगिरीची, यातिहीनत्व व निकृष्ट प्रतीचे जीवन यांमुळे माणूस-पणाची किळस यावी" इतकी लाचारी समाजाच्या अंगवळणी पडली होती. चोखामेळयासारख्या संताला सामाजिक विषमतेचे शल्य बोचत होते. परंतु त्यांचे पूर्वसंस्कार एवढे प्रबळ होते की, अखेर "बहु भुकेला झालों। तुमच्या उष्टयासाठी आलो" असे दीनवाणीपणाचे उद्‌गार त्यांच्या तोंडून निघाले. त्यानंतर सहा शतके लोटली, तरी केशवसुतांच्या कवितेतील "जरी यावरी सावली माझी गेली, तरी काय बाधा असे ठेवलेली ?" हा अंत्यजाच्या मुलाचा पहिला प्रश्न अनुत्तरित राहिला होता. त्याची आई त्याला हेच समजावून सांगते की "आम्ही नीच बा, आणि ते लोक थोर, तया पाहतां होइजे नित्य दूर."

लोकहितवादी, रानडे, आगरकर यांनी अस्पृश्यतेच्या रुढीला विरोध करुन दलित समाजाबद्दल सहानुभूती दाखवली. ही सहानुभूती कोरडी व दिखाऊ होती असेही नाही. पण जातीभेदामुळे अनेकशः विभागलेल्या आपल्या समाजा-तील एका जातीच्या माणसाला दुसऱ्या जातीच्या कुचंबणेची व क्लेशांची पूर्ण कल्पनाच येऊ शकत नाही. त्यामुळे या प्रश्नाची निकड या सुधारकाना जितक्या-तीव्रतेने भारली नाही हे सत्य आहे. त्याच्या आधी महात्मा फुले यांनी आणि नंतर शाहू महाराज व महर्षी शिंदे यांनी अस्पृश्यता निवारणासाठी नेटाने प्रयत्न केले. पण त्यांचे प्रयत्नही प्राथमिक स्वरुपाचे होते. पुढील काळात महात्माजींच्या प्रेरणेने काही कार्यकर्त्यांनी या प्रश्नात मनापासून लक्ष घातले. परंतु त्यांची भूमिका सेवाभावाची व दलितोद्धाराची होती. उद्धाराच्या कल्पने-मुळे दलितामधील न्यूनगंडाची व पराधीनतेची भावना नष्ट होऊ शकली नाही. या काळात अस्पृश्यांबद्दल सहानुभूती दाखवणारे व त्यांच्या दुःस्थितीचे चित्रण करणारे वाङ्मय मराठीत लिहिले गेले नाही असे नाही. पण ते अस्पृश्य

समाजाची अस्मिता जागृत करू शकले नाही. उलट आजचा दलित युवक जेव्हां हे वाङ्मय वाचतो, तेव्हा, "येथला महाकवी आखूडच असतो" असाच त्याला प्रत्यय येतो.

दलित समाजात नवचैतन्य व स्वत्व-भावनेचा पीळ निर्माण झाला, तो डॉ. आंबेडकरांच्या आंदोलनामुळे. दया याचनेची वृत्ती नष्ट होऊन आपल्या नैसर्गिक हक्कांसाठी झगडण्याची प्रेरणा त्यांना या आंदोलनातून मिळाली. दास्यवृत्तीचे जोखड झुगारून देऊन समाजाचा स्वतंत्र घटक म्हणून जगण्याची उमेद हा समाज बाळगू लागला आहे. "आज आम्हांला, या खोपटाखोपटांतून पूर्ण सूर्य दिसतोय।" त्याच्याकडे पाठ फिरवून यापुढे अंधारयात्रिक होण्याचे आम्ही नाकारणार असा निर्धार त्यांच्यातील नवकवींच्या शब्दाशब्दांतून प्रकट होतो आहे. काळोख व सूर्यप्रकाश ही प्रतिमाने त्यांच्या काव्यात वारंवार येतात. काळोखाने ग्रासलेल्या मृतकल्प जीवनाला नकार आणि ज्वलंत प्रकाश-मय जीवनाकडे वाटचाल अशा उभारीने त्यांचे लेखन चालू आहे.

जळलेले आयुष्य पुन्हा
निखाऱ्यासारखे फुलवायचे
म्हणून प्रकाशाची पायवाट
मी जवळ केली आहे.

भारतीय समाजाच्या पुनर्घटनेच्या दृष्टीने हे मानसिक परिवर्तन ऐतिहासिक महत्त्वाचे आहे.

या दलित वाङ्मयात कदाचित साहित्यगुण कमी असतील, पण नव्याने जाग आलेल्या माणसाची तीव्र संवेदनशीलता व मुक्त भावनोद्रेक त्यात काठो-काठ भरून राहिला आहे. त्यात दुबळेपणाला थारा नाही. त्याची भाषा उघड उघड विद्रोहाची, आव्हानांची आहे. आपल्या पूर्वपरंपरेचा त्यांचा अनुभव इतका कडवट व क्लेशदायक आहे, की तिच्यावर प्रहार करताना त्यांना मागेपुढे पाहण्याचे काही कारण नाही. आपल्या सामाजिक सुधारणेच्या चळ-वळीत सर्वंकष क्रांतीची ऊर्मी क्वचितच आढळते. पावलोपावली सर्वांना सांभाळून घेण्याची, जुन्यानव्याचा समन्वय साधण्याची केविलवाणी धडपडच दिसून येते. या समन्वयशीलतेमुळे आपण गेल्या कित्येक शतकांत कोणताच मूलभूत प्रश्न निकालात काढू शकलो नाही. दलित वाङ्मयातील बंडखोर-पणाच्या वातावरणामुळे आपल्या समाजपरिवर्तनाच्या चळवळीला नवे वळण लागण्याची शक्यता आहे.

दलित वाङ्मयाच्या संदर्भात आणखी दोनतीन मुद्दे मला आवर्जून मांडावेसे वाटतात. दलित साहित्यिकांनी आपल्या सामाजिक आंदोलनाच्या यशस्वितेसाठी त्याला मजबूत वैचारिक अधिष्ठान प्राप्त करून देण्याची आवश्यकता आहे. विद्याव्यासंग आणि विचारसाधना या दोन्ही बाबतींत डॉ. आंबेडकरांचा आदर्श त्यांना नेहमीच स्फूर्तिदायक होईल. उच्चवर्णीयांचा परंपरागत दृष्टीकोन व लेखनसंकेत यांच्या आहारी न जाता आपल्या साहित्यातील क्रांतिकारकता त्यांना टिकवून धरायची असेल, तर त्यांनी आपला व्यासंग अद्ययावत राखण्याची खबरदारी घेतली पाहिजे. तसेच अभिव्यक्तीच्या बाबतीत वेगवेगळे प्रयोग करून पाहण्याचा साक्षेपही त्यांनी बाळगला पाहिजे. त्याशिवाय त्यांचे साहित्य आपले ऐतिहासिक कार्य सिद्धिस नेऊ शकणार नाही. काळाचा प्रवाह त्यांना अनुकूल आहे. आता खरी कसोटी आहे ती त्यांच्या ध्येयनिष्ठेची व प्रयत्नशीलतेची. दलितांचा लढा हा समाजातील एका मोठ्या लढ्याचा भाग आहे. हा लढा सामाजिक जीवनातील गुलामगिरी, शोषण व मनुष्यत्वाची विटंबना नाहीशी करण्याचा लढा आहे. तो लढा यशस्वी झाल्याखेरीज कोणताच महत्वाचा सामाजिक प्रश्न पूर्णपणे सुटणार नाही याचा दलित साहित्यकांना विसर पडता कामा नये. या दृष्टीने दलितेतर समाजातील पुरोगामी शक्तीच्या सहानूभूती व सहकार्य त्यांनी मिळवावयास हवे. माणूस जेव्हां दुसऱ्या माणसाचा अमानुष छळ करतो, तेव्हां ज्याचा छळ होतो त्याची तर हानी होतेच, पण छळ करणाऱ्या माणसाचाही अधःपात होत असतो. म्हणून मनुष्यत्वाची विटंबना, मग ती कुठेही व कुणाच्याही बाबतींत होवो, माणुसकीची चाड असणाऱ्या प्रत्येकाला तिची चीड आली पाहिजे. समाजातील जास्तीत जास्त लोकांत ही व्यापक सहानुभूती, ही अन्यायाची चीड निर्माण करणे हे दलित वाङ्मयाचे वास्तविक कार्य अहे त्यासाठी या वाङ्मयातील विषय जरी दलितांसंबंधीचे असले, तरी त्यांच्या चित्रणामागील प्रेरणा अधिक व्यापक व मूलग्राही असल्या पाहिजेत. तरच हे वाङ्मय सर्व थरांतील लोकांच्या अंतःकरणाला जाऊन भिडेल. अन्याय व अनीती यांनी ग्रासलेला समाज त्यातील सर्वांच्याच नाशाला कारणीभूत होतो याची जाणीव त्यांना होईल. त्यातूनच पुढे दलित वाङ्मयाचे उद्दिष्ट सफल होण्याजोगी परिस्थिती निर्माण होईल.

दलित वाङ्मयाचा सवता सुभा कशासाठी? असा प्रश्न पुष्कळदा विचारला जातो. त्याचे उत्तर अगदी उघड आहे. दलित व दलितेतर हे

जरी एकाच समाजाचे घटक असले, तरी वस्तुतः त्यांची जगे अगदी भिन्न आहेत. त्यांत फार मोठे अंतर आहे. स्पृश्य समाजातही वेगवेगळ्या जाती असून त्यांच्यात अधिकार भेद आहेत. पण गावकुसाबाहेर जे, पिढ्यान् पिढ्या दलित म्हणून जन्मले आणि दलित म्हणूनच मृत्युमुखी पडले त्यांच्या दुःखाची जात वेगळी आहे. प्राचीन काळापासून त्यांचे मनुष्यत्वच हिरावून घेतले गेले होते. त्याचे तोंड कायमचे बंद करण्यात आले होते. म्हणून सवर्ण समाजातील लेखक कितीही श्रेष्ठ व प्रतिभावान असला, तरी त्याची कल्पना आणि सहानुभूती ही दलितांच्या प्रत्यक्ष अनुभूतीची जागा घेऊ शकणार नाही. तेव्हा दलित साहित्यिकांच्या वाङमयातून आपण त्यांचे मनोगत समजून घेतले पाहिजे. या दृष्टीने सध्या तरी दलित वाङमयाचे वेगळेपण इष्ट व उपकारक आहे असे मला वाटते. परंतु पुढे कधी खऱ्या अर्थाने भारतीय समाज एकात्म बनला तर मग दलित वाङमयाच्या स्वतंत्र अस्तित्वाचे प्रयोजन उरणार नाही. मराठी साहित्याच्या मोठ्या प्रवाहात ते सहजपणे विलीन होऊन जाईल. दलित वाङमयाचे व चळवळीचे अंतिम उद्दिष्टच मुळी दलितपण समूळ नष्ट करणे हे आहे. त्यासाठी दलित व श्रमिक साहित्यातील लेखकांना आपल्या वाङमयीन तपश्येच्या बळावर एकंदर मराठी साहित्याचा कायापालट घडवून आणावा लागेल. हे कार्य त्यांना पार पाडता आले, तर ते खचितच नव्या युगाचे अग्रदूत ठरतील.

**(मुंबई मराठी साहित्य संघ यांच्या विद्यमाने मुंबई व उपनगर मराठी साहित्य संमेलन अधिवेशन २१ वे च्या अध्यक्षीय भाषणातील कांही भाग. दिनांक : २५ ऑक्टोबर १९७५).**

# ललित साहित्याची सामाजिकता अत्यंत महत्वाची आहे

* यशवंतराव चव्हाण

मी साहित्य समीक्षक नाहीं. एक रसिक मराठी भाषिक साहित्यप्रेमी आहे. आजच्या विद्वान अध्यक्ष ललित व समीक्षात्मक साहित्याच्या श्रेष्ठ अधिकारी आहेत. तेव्हा साहित्यविषयक प्रश्नांचा उहापोह त्या करतीलच. पण साहित्यप्रेमी हाही आजच्या लोकशाही युगात एक नम्र समीक्षक असतोच आणि त्या दृष्टीने काहीं विषयांना मी स्पर्श करणार आहे. प्रथमतः एक समीक्षा करण्यासारखी आहे. तर ती म्हणजे वैचारिक प्रवर्तन व प्रबोधनाच्या दृष्टीने मराठी साहित्यात काय झाले. एका अर्थाने भारतीय प्रबोधनाची सुरुवात बंगालबरोबर महाराष्ट्रात झाली. काय घडले व काय घडायला हवे हेहीं पाहणे सयुक्तीक ठरेल. न्या. रानडे यांनी मराठी ग्रंथकारांचे पहिले संमेलन १८७८ मध्ये पुण्यात भरविले. स्वातंत्र्यपूर्व काळात भारतीय प्रबोधनास मराठी साहित्यिकांनी व पत्रकारांनी हातभार लावला. १९४७ मध्ये भारतीय समाजाचे स्वातंत्र्यपर्व सुरू झाले. आता रचनापर्व सुरू झाले आहे. भारतीय समाजाच्या जागृतीचा नवा काळ आला आहे. जे हक्क राज्य घटनेने आपल्या समाजातील उपेक्षितांना दिले आहेत. त्यांची जाण नव्या पिढीत आली आहे. तेव्हा ही स्वातंत्र्यजात नवी पिढी आता जुन्या समाजरचनेविरुद्ध बंड करून उठते आहे. एकेकाळच्या उपेक्षितांच्या अंतरंगात असलेले भावनांचे कढ साहित्यात दिसू लागले आहेत. साहित्य हे थर्मामिटरमधील पाऱ्यासारखे संवेदनशील असते. निदान असावे. समाजाच्या मानसामध्ये जे असते तेच साहित्यात अवतरते. मराठी साहित्याचा इतिहास हेच सांगतो. आधुनिक काळात जो राष्ट्रवाद आला जी राष्ट्रीय अस्मिता जागृत झाली. स्वातंत्र्याचे नवे विचार आले त्यांचे परिणाम साहित्यावर झाले. भारतीय समाजाच्या या रचनापर्वात नव्या विचारांची व सर्वांगीण ज्ञानाची बीजे टाकत राहणे हेहीं साहित्यिकाचे महत्वाचे कार्य आहे. कारण त्या विचारांनी प्रेरीत झालेले व

भारलेले राजकीय (राज्यकर्ते) कार्यकर्ते समाजाला पुढे नेत असतात. यासाठी वैचारिक व चिंतनशील वाङमयाची महती नजरेआड करण्यासारखी नाही. मला वाटते ही सामाजिकता, ही सामाजिक जाणीव आपल्या सामाजिक परिवर्तनाची प्रेरणा असते. म्हणून आता नव्या सामाजिक प्रबोधनाचे चिंतन करणारे साहित्य हेच उद्याच्या मराठी साहित्याचे स्वरुप असणार अशी माझी धारणा आहे. गेल्या ५० वर्षांत भारतात जे व्यक्तिस्वातंत्र्यवादी मार्क्सवादी व गांधीवादी विचार आले त्या सर्वांनी आपले व्यक्तित्व घडविले आहे. नाकारण्यात अर्थ नाही. निदान माझ्या पिढीपुरते मी हे निश्चित म्हणतो. साहित्य कोणत्याही रंगाचे असले तरी चालेल, पण आजूबाजूच्या परिस्थितीचा डोळसपणे अभ्यास करून समाजात, सर्वथरात निर्माण झालेल्या अस्वस्थतेची जाणिव असणारे समाजचिंतन त्यात असले पाहिजे.

आचार्य विनोबा भावे यांनी एकदा म्हटले होते की, लोकशाही हे प्रज्ञेचे राज्य असते. ही प्रज्ञा समाजाभिमुख असली पाहिजे तरच ती समाजाचे परिवर्तन घडवून आणील. त्याला मार्गदर्शन करीत राहिल. बुद्धीची कुवत वाढविणे, मने व्यापक करणे, जगातील नव्या प्रवाहाची समीक्षा करणे, स्वतःच्या संस्कृतीच्या व परंपरेचा बुद्धिनिष्ठ अभ्यास करून नव्या परिस्थितीला सुसंगत अशा मूलभूत परिवर्तनासाठी जनमानसात तयार करणे ही पुढच्या पिढीतील चिंतनशील साहित्याची उद्दीष्टे असू शकतात. गेल्या शतकात मार्क्सने इतिहासाकडे पाहण्याची नवी दृष्टी सांगून एक प्रचंड विचारप्रवाह सुरू केला. या शतकातील टॉयनबीसारख्या इतिहास पंडिताने मानवी संस्कृतीचा अभ्यास करून सृजनशील चिंतनाचा आणखी एक नमुना आपल्यापुढे ठेवला. आज समाजशास्त्र, अर्थशास्त्र, मानवशास्त्र अशा अनेक विविध ज्ञानशाखांचा उपयोग करून आपल्या इतिहासाचे आपल्या समाजाचे पुनरध्ययन करणे शक्य आहे. मराठीमध्ये अशा अभ्यासाची गरज आहे.

सामाजिक प्रबोधनाच्या दृष्टीने ललित साहित्याची सामाजिकता अत्यंत महत्वाची आहे. कलाबाह्य निकष लावून हेतुवादी साहित्य श्रेष्ठ ठरवावे अशा मताचा मी नाही. पण समाजाच्या प्रबोधनासाठी त्याचा भावपिंड घडविण्यासाठी ललित साहित्याचा निश्चित उपयोग होतो. समाजक्रांतीविषयी अनुकूल मनोभूमी तयार करायची असेल तर प्रस्थापित समाजातील विसंगती अंतर्विरोध आणि त्यामुळे होणारी कोंडी यांच्या कलात्मक आविष्कारातून समाजा-

वर संस्कार करता येतात. उपहास किंवा विनोद ही शस्त्रे साहित्यिक शस्त्र-क्रियेत समाजपरिवर्तनासाठी वापरली गेली आहेत, हे जगातील सर्व साहित्यिक इतिहासाने सिद्ध केले आहे. मला वाटते आता जे आपले सामाजिक प्रश्न आहेत, ते सर्व पुनर्रचनेचे प्रश्न आहेत, त्यांचे संशोधन करून प्रकट चर्चा व चिंतन करणारे समाजचिंतक आणि त्यातील तत्वांचा व समाजक्रांतीचा ध्यास घेतलेले समर्थ ललित लेखक या दोघांचेही कार्य एकमेकास पूरक आहे, या प्रयत्नांची गरज आहे. मला वाटते ही अपेक्षा मराठी साहित्यिकांकडून करणे गैर होणार नाही.

या वैचारिक प्रबोधनाचे स्वरूप काय असावे, हा प्रश्न स्वाभाविक उपस्थित होतो. याबाबत मतैक्य अशक्य आहे. पण प्रकट चिंतन करणे शक्य आहे. नव्हे आवश्यक आहे. एकोणीसाव्या व विसाव्या शतकांतील वैचारिक जागृतीचे श्रेय बरेचसे पाश्चात्य विचारांना आहे. इंग्रजी हा त्याचा आधार होता. यापुढे प्रादेशिक लोकभाषा याच ज्ञानभाषा झाल्या (आहेत) पाहिजेत. त्यांच्यातच चिंतनशील साहित्य निर्माण झाले पाहिजे. ही आज महत्वाची गरज आहे. दुसरे कारण आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे आहे. आतापर्यंत आपल्या बौद्धिक जीवनावर पश्चिमेचा ठसा उमटला आहे. एक तर आशिया, आफ्रिका यांतील साम्राज्यशाही बव्हंशी गेलेली आहे. आणि त्यांच्या सामाजिक प्रश्नांचा सांस्कृतिक वैशिष्टयांचा स्वतंत्र विचार करण्याची गरज आहे. आता हे कार्य भारतीय साहित्यिकांना करता येईल.

या सर्वांना एका धाग्याने बांधण्याची एक नवी जाणिव विज्ञानयुगाने निर्माण केली आहे. आजकाल याचा प्रत्यय अनेक स्वरूपात येतो. हजारो मैल दूर चाललेल्या घटना तुमच्या माझ्या दैनिक जीवनावर मूलग्राही स्वरूपाचे परिणाम करू शकतात, याची जाणीव आता वाढू लागली आहे. या अनुभूतीचे कलापूर्ण चित्रण श्री. सत्यजित रे यांच्या "अशनी संकेत" (डिस्टंट थंडर) चित्रपटात परिणामकारक रीतीने चित्रित केले आहे. दुसऱ्या महायुद्धाच्या काळी युरोपमध्ये व दूर पॅसिफिकमध्ये चाललेल्या युद्धाच्या कथा ऐकताना रम्य वाटल्या. परंतु हळु हळु त्याचा परिणाम ब्रम्हदेशापर्यंत पोहोचल्यानंतर, सकाळ संध्याकाळ जेवताना मिळणारा तांदूळ कमी पडू लागल्यानंतर, लक्षावधींना मृत्युच्या भयानक दुष्काळाच्या खाईत जाण्याचा प्रसंग जेव्हां बंगालमध्ये १९४३ साली आला, त्यातुन मानवतेची नियती एकाच धाग्यात गोवलेली आहे याची

जाणिव झाली. या जाणिवेचा एक स्पष्ट अर्थ असा की, सामाजिक, राजकिय व साहित्यिक मूल्यांची एकमेकापासून फारकत करता येत नाही. आजही भारतांसर्गत समस्यांचा विचार करीत असतांना हा संदर्भ तुम्हा आम्हाला विसरता येणार नाही. राष्ट्रीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर नवे प्रश्न निर्माण झाले आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर व्यक्तींना स्वातंत्र्यावर आधारलेले अनेक अधिकार जसे प्राप्त झाले तशाच काही जबाबदाऱ्याही आहेत. हे स्वातंत्र्य आणि जबाबदाऱ्या एकमेकापासून अलग करून चालणार नाही. या दोघांचा पिळदार गोफ गुंफण्याचा निर्धारपूर्वक प्रयत्न आपल्या देशात झालेला नाही. हे घडले नाही तर राष्ट्रीय स्वातंत्र्य धोक्यात येण्याचा संभव आहे. हा एक विचार आपल्या चिंतनासाठी या निमित्ताने आपल्यापुढे मांडू इच्छितो. मुक्त विचारांचा सिद्धांत हा एक आकर्षक विचार आहे आणि मूलतः समर्थनीयही आहे. पण आजच्या सामाजिक आर्थिक क्षेत्रात उभे असलेले इतर राष्ट्रीय प्रश्न यांचा संदर्भ विसरून हा सिद्धांत यशस्वी होऊ शकेल काय, याचेही चिंतन होण्याची गरज आहे.

नव्या समाजरचनेच्या दृष्टीने मूलभूत महत्वाचे आणि ललित साहित्याशी अत्यंत निगडित असलेले आणखी दोन विषय आहेत. ते म्हणजे दलित वर्ग व स्त्री. दोन्ही प्रश्नांना नव्या सामाजिक प्रबोधनात फार महत्वाचे स्थान आहे. राजकीयदृष्टया त्यांना जे स्थान मिळायचे ते आपण दिले असे कदाचित म्हणता येईल. आपल्याकडे राजकिय हक्क आधी मिळाले आहेत. अजून त्या हक्कांना सामाजिक बल (संरक्षण) मिळवून देण्याचे काम झालेले नाही. पाश्चात्य देशांत ही प्रक्रिया वेगळी होती. येथे मात्र आपल्या राजकीय स्वातंत्र्य लढयात आपण स्विकारलेल्या उदारमतवादाची परिणती आपल्या राज्यघटनेत झाली. पण आपले सामाजिक मन मात्र संकुचित राहिले आहे. ती विसंगती जितक्या लवकर नाहीशी होईल तितके समाजातील तणाव कमी होईल. आज जे तणाव आहेत त्यांचे स्वरूप समाजापुढे आणले पाहिजे. आणि या विसंवादाचा वेध घेऊन ते मोडून काढले पाहिजेत.

एक स्त्रीच आपल्या या संमेलनाची अध्यक्ष आहे. एक स्त्री भारताच्या पंतप्रधान आहेत. अनेक क्षेत्रांत स्त्रियांना मानाचे स्थान मिळाले आहे, पण स्त्रियांना समाजात काही स्थान आहे का, यापेक्षा स्त्रीचा समान समाजघटक म्हणून समाजात किंवा आपल्या कौटुंबिक जीवनात स्वीकार झाला आहे का, हा प्रश्न महत्त्वाचा आहे. कायद्यातील समानता व न्यायालयातील समानता

यांना महत्त्व आहेच, पण ती समानता समाजाच्या दैनंदीन व्यवहारात प्रतिबिंबित झाली नाही तर ती विसंगती दुःसह्य होते. प्रत्येक वेळा न्याय मिळविण्यासाठी न्यायालयात जाता येत नाही. म्हणून सामाजिक हक्क हे समाजमनाच्या उदारतेवर, त्याच्या समंजसपणावर अवलंबून असतात. मला वाटते हा तात्विक सामाजिक उदारमतवाद व आपल्या मनात मूळ धरून बसलेली जुनी मूल्ये यांच्यातील संघर्षाचे पडसाद प्रत्येकाच्या जीवनात उमटतात. तुमच्या आमच्या प्रत्येकाच्या जीवनातही हे घडते. आणखी असे की स्त्रियांचे किंवा दलितांचे समाजातील न्याय्य स्थान केवळ मानवतेच्या किंवा कारुण्याच्या भूमिकेत आपण स्वीकारले तर ते एक ढोंग ठरेल. समाजघटक म्हणून या दोघांना आपण स्वीकारले पाहिजे. त्यांच्या कर्तृत्वाला स्थान दिले पाहिजे. आणि या त्यांच्या नव्या सामाजिक स्थानाशी अनुकूल अशी समाजाची व्यक्तीची मानसिक घडण-जडण झाली पाहिजे.

या दृष्टीने दलित समाजातून आलेल्या नव्या मराठी साहित्यिकांनी जे साहित्य निर्माण केले आहे ती मराठीतील एक मोलाची भर आहे, असे मी मानतो. उच्च साहित्याचे किंवा त्यांच्या संकल्पनांचे मानदंड लावून त्याला जोखणे चुकीचे आहे. उच्चभ्रू साहित्यात पाश्चात्य वळणाची अश्लिलता आपल्याला चालते. दलित समाजातून येणाऱ्या साहित्याच्या भाषेस मात्र आपण नाके मुरडतो. हा नैतिक भेदभाव आहे. दुहेरी मानदंडाची भावना त्यामागे आहे, असे मला वाटते. म्हणून ज्या सामाजिक थरातून लेखक आलेला असेल त्याची भाषा त्याच्या साहित्यात आली तर ती स्वागतार्ह मानली पाहिजे. शेवटी भाषेचे माध्यम अभिव्यक्तीसाठी वापरायचे असेल तर तिचा सामाजिक अभिव्यक्ती हाही एक अविभाज्य भाग आहे. हजारो वर्षे दडपल्या गेलेल्या समाजाचा पहिला उद्‌गार हा रूढ कल्पनेप्रमाणे असावा असे मानणे चुकीचे आहे. तो "उद्‌गार" निघाला हेच सामाजिकदृष्ट्या महत्वाचे आहे. तो असेल तसा आला पाहिजे. आपण त्याचे स्वागत केले पाहिजे. मला वाटते आपले हजारो वर्षांचे संस्कार अशा अभिव्यक्तीतून बाहेर पडले तर ते सामाजिकदृष्ट्या आरोग्यदायक ठरेल. आदिवासी व उपेक्षित जाती यांची भाषा आता नव्या मराठी भाषेत येणार आहे. हे सामुदायिक वाचन किंवा देवाण-घेवाण भाषेच्या दृष्टीने उपयुक्त आहे. त्याने मराठी भाषा समृद्ध होईल, म्हणून दलित साहित्याची भाषा कदाचित वेगळी वाटली तरी तिचा कस तिच्यातील रग जर नव्या मराठीत उतरली तर ती हवीच आहे. पण यासाठी जाणकारांनी व सामान्य वाचकांनी स्वागतशील वृत्ती ठेवली पाहिजे.

दुसरा एक मुद्दा दलित साहित्यासंबंधी सांगण्यासारखा आहे. ती एक उपेक्षित सामाजिक स्तरांच्या भावनांची जी कोंडी इतकी वर्षे झाली होती ती आज फुटली आहे. त्याचा सामाजिक सुधारणेसाठी व सामाजिक प्रक्रिये-साठी उपयोग होईल. जी समाजसंस्था जुनी झाली आहे तिच्याविषयी संबंधित सामाजिक गटाना काय वाटत होते, तिचा जाच त्या गटाना कसा होत होता, त्यांचा सामाजिक अनुभव काय होता, याचे जे दर्शन या साहित्या-तुन घडते ते सामाजिकदृष्टया महत्वाचे आहे. सामाजिक वास्तवता कितीही कठोर व कटू असली तरी ती समाजसुधारकाला पहावी लागते. एकाद्याच्या रोगाचे निदान करण्यासाठी डॉक्टराला जशी माहिती हवी असते तसेच हे आहे. म्हणून हे साहित्य हा आरसा आहे. त्याचा सामाजिक उपयोग होण्या-सारखा आहे. केवळ साहित्यबाह्य निकष लावून जरी या साहित्याचा विचार केला तरी ते मोलाचे आहे.

**(अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन कराड, स्वागताध्यक्ष श्री. यशवंतराव चव्हाण यांच्या भाषणातून दि. ६–१२–७५)**

# मित्रहो, बेजबाबदार लेखकांची सद्दी संपलेली आहे.

* डॉ. म. ना. वानखडे

बंधुभगिननो, आपण मला आपल्याला भेटण्याची संधी दिली म्हणून प्रथमतः आपले आभार मानतो· आपण आणि इथल्या दलित साहित्यिकांनी या संमेलनाचे अध्यक्षपद देवून माझा सन्मान केला म्हणून मी पुनः आभार मानतो. आणि एक स्पष्ट करू इच्छितो ते हे, की मी आपल्यापुढे एक साहित्यप्रेमी, एक रसिक, एक अभ्यासक म्हणून उभा आहे. मी करीत असलेल्या नोकरीची उपाधी आपण लक्षात घेवू नये. एक साहित्यप्रेमी म्हणूनच माझे दोन शब्द ऐकून घ्यावेत अशी विनंती करून मी भाषणाला सुरवात करतो

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी या महत्वपूर्ण शहरी आपल्या सर्वा-समवेत धम्मचक्र फिरविले, त्या क्रांतीकारक घटनेतून जे सकर्ष बंड आणि वैचारिक आंदोलन दलित समाजाच्या ठायी उत्पन्न झाले त्याचा एक आविष्कार म्हणजेच दलित साहित्य होय. या वैचारिक आणि मानसिक जागृतीतूनच श्री शंकरराव खरात, बाबूराव बागूल इत्यादी लेखकांनी प्रेरणा घेतल्या. आणि या अभूतपूर्व घटनेने शाहीर अण्णाभाऊ साठे यांच्या लेखनालाहि नवा आशय प्राप्त झाला.

परंतु येवढे सांगून पुरे होणार नाही. औरंगाबाद येथे बाबासाहेबांनी महाराष्ट्राच्या हृदयातच मिलिंद महाविद्यालय प्रस्थापित केले. तिथे सर्व महाराष्ट्रातून दलित विद्यार्थी शिकण्यासाठी येवू लागले. त्यामुळे औरंगाबाद आणि नागसेनवनातील मिलिंद महाविद्यालय हे दलितांच्या चळवळीतील एक केंद्र झाले.

या केंद्रातून एक साहित्यिक चळवळ आकार घेवू लागली. तिचा तपशील सांगणे आजच्या घडीला अगत्याचे झाल्यामुळे मी थोडासा इतिसास कथन

करीत आहे. तो सांगणे या आधी मला आवडले नसते, परंतु स्थिती निर्माण झाल्यामुळे मी तो आज सांगत आहे.

मिलिंद महाविद्यालय निर्माण होवून जवळजवळ दीड तप झाले होते सुशिक्षित व संस्कारक्षम दलित तरुणाठायी आपले अनुभव, आपले जीवन, आपल्या वेदना व्यक्त करण्याची, शब्दाचे माध्यम वापरण्याची, आपल्या अनु-भवांना काव्याचे, कथेचे स्वरूप देण्याची धडपड चाललेली होती. कथा, कविता लिहिल्या जात होत्या. पण त्या प्रकाशित होत नव्हत्या. कारण ते कलावंत आणि त्यांचे विषय, आशय वेशीबाहेरचे होते. लेखकाचे लेखन प्रकाशित न होणे म्हणजे मोठी वेदना, मोठे दुःख. लेखन ही शक्तीच आहे ती कोंडून ठेवता येत नाही, प्रवाह जसा खडक फोडून मैदानात येण्यासाठी धडपडतो तसाच कलावंतही धडपडत असतो. ही दलित कलावंतांची धडपड पाहून आणि वास्तवाचे आव्हान स्विकारून मी आणि माझ्या सहकार्यांनी दलितांच्या सांस्कृतिक आणि शैक्षणिक केंद्रामध्ये एक वाङ्मयीन चळवळ आणि व्यासपीठ उभे करण्याचे ठरविले, ह्याचे दुसरे कारण असे, जीवनाचे कधीही साहित्यात न आलेले परंतु समृद्ध विश्व केवळ साहित्यातील मक्तेदारीमुळे आणि फॉर्म-संबंधीच्या चुकीच्या दृष्टिकोनामुळे प्रकाशित होऊ शकत नाही. हा अन्याय आहे. आणि हा अन्याय केवळ व्यक्त होवू पाहणाऱ्या लेखकावरच नव्हे तर साहित्य व समाजावरहि आहे, असे वाटून आम्ही १९६७ मध्ये 'मिलिंद साहित्य सभा' स्थापन केली, व त्याचबरोबर 'अस्मिता' हे व्यासपीठ उभे करण्याचे ठरविले. श्री. रा. ग. जाधव, कार्यकारि संपादक, सहाय्यक, प्रा. रायमाने, प्रा. पानतावणे, श्री. वामन निंबाळकर व सुखराम हिवराळे, व मी प्रमुख संपादक होतो. 'अस्मिता' डिसेंबर १९६७ अंकात दलित साहित्याच्या दिशा दाखविणारा एक परिसंवाद आयोजित केला होता. त्या परिसंवादाचा उपयोग अनेक लेखकांना आणि कवींना झाला हे इथे उपस्थित असलेल्या अनेकांना माहित आहे.

पुढे 'अस्मिता' ह्या नावात सरकारी आक्षेपामुळे बदल करावा लागला· 'अस्मिता' चे 'अस्मितादर्श' असे नामाकरण करण्यात आले. मला मुंबईला जावे लागले. आणि सर्वांच्या संमतीने प्रा. पानतावणे यांचेकडे संपादनाची जबाबदारी देण्यात आली.

'अस्मिता' व 'अस्मितादर्श', 'मिलिंद साहित्यसभा', आणि दलित साहित्याची चळवळ ह्या सर्व गोष्टी कुणा एका व्यक्तीच्यामुळे नव्हे, तर सर्वांच्या चळवळी-

तून, आंबेडकरी ध्येयवादातून आणि सर्वांना पटलेल्या सामाजिक गरजेतून आलेल्या आहेत हे स्पष्ट करणे जरूरीचे आहे. कारण आपल्या समाजात 'अहं' चा घातक विचार फार लवकर व फार मोठे गर्वाचे घर निर्माण करतो. ह्या अपप्रवृत्तींची वाढ ही बौद्ध विचाराच्या विरोधी आहे येवढा उल्लेख पुरे. दलित साहित्याचा वेगळा विचार करण्याचे दुसरेही कारण आहे. ते असे, स्वातंत्र्य मिळाल्यावर जीवनपद्धती, आणि सत्ता चालविण्यासाठी म्हणून आपण लोकशाही स्विकारली ज्या ज्या देशात लोकशाही रूजली आहे, तिथला समाज एकजिनसी आहे. भारतीय समाजावर मात्र वर्णवादाचा व जातीभेदाचा प्रचंड प्रभाव आहे. जिथे वर्णवाद असेल तिथे लोकशाही शुद्ध स्वरूपांत टिकू शकत नाही. लोकशाहीची बैठक विज्ञानावर व बुद्धिप्रामाण्यावर आधारलेली असावी लागते. भारतीय समाज शब्दप्रामाण्यवादी असल्यामुळे अनेक खुळया समजुतीने ग्रस्त झालेला, म्हणून इथे लोकशाहीचा पराभव होण्याचा धोका मोठा, हा धोका दलित जनतेला पुन्हा भूतकाळातील जिणे जगायला लावणारा, म्हणून लोकशाहीचे समाजिकरण झाले पाहिजे, ते कार्य अंगावर घेणे महत्वाचे आहे दलित साहित्याची चळवळ नेटाने चालविण्याचे ते एक कारण आहे.

लोकशाहीचे समाजिकरण करण्याचे कार्य लेखकच प्रभावीपणाने करू शकतो. समाजातील अंतःप्रवाहाचे ज्ञान प्रथम लेखकालाच होते. तोच समाजातील घडामोडीचे आकलन आणि मूल्यमापन प्रथम करीत असतो. कारण तो समाजाचा 'अंटिना' असतो. ऑगस्ट कॉम्ट (August Comte) आणि तेन (Taine) या विचारवंतांच्या म्हणण्याप्रमाणे, लेखकाला जसा समाज प्रभावित करीत असतो तसा तोही समाजाला प्रभावित करीत असतो. म्हणून त्याने विश्वामित्राची भूमिका घेवून डोळयावर कातडे ओढले तर त्याचे हे कृत्य समाजद्रोहाचे ठरणार नाही काय? सामाजिक जाणिवेने लिहिणे ही केवळ सामाजिक जबाबदारीच नाही. तर लेखकाचे कर्तव्य आहे. लेखकाचे हे कर्तव्य आणि सामाजिक जबाबदारी विशद करतांना सुप्रसिद्ध लेखक जो पॉल सार्त्र याने म्हटल्याप्रमाणे, "लेखन हे केवळ लेखन नव्हे तर कृतीही (act) आहे व माणसाचा जो दुष्ट प्रवृत्ती विरुद्ध सतत संघर्ष चालू असतो त्या संघर्षात लेखन हे हेतूपूर्वक वापरावयाचे हत्यार आहे. हे लेखकाने समजून घेणे जरूरीचे असते". (What is Literature, 1950, p. 233).

असे जर आहे तर दलित लेखकानेच सामाजिक दायित्व कों स्विकारावे हा प्रश्न उपस्थित होतो, त्याचा खुलासा करण्यासाठी मराठी साहित्यावर

ओझरता दृष्टिक्षेप टाकावा लागेल, तिथे आपणाला स्पष्टपणे जाणवते की सामाजिक दायित्व उच्चवर्णीय मराठी लेखकांनी टाळलेले आहे. ते हेतु-पुरःस्सर झाले की अज्ञानमूलक आहे हा स्वतंत्र अभ्यासाचा विषय होऊ शकेल.

आजवरच्या इतिहासात समाजजीवनात अनेक राजकीय, आर्थिक, सामाजिक सांस्कृतिक अशी आंदोलने झाली. ही आंदोलने हादरून टाकणारी होती. पण मराठी साहित्यात माया आंदोलनाची पुसट प्रतिबिंबेही काही सन्माननीय अपवाद सोडले तर उमटलेले आढळत नाही, उलट स्वप्नरंजनात्मक लेखनच भरपूर झाले. हे स्वप्नरंजनात्मक लेखन लेखकाची व समाजाचीही दिशाभूल करणारे होते असे दिसते. याचे कारण असे की मराठी लेखक ज्या वर्गात वा वर्णात जन्मला तो जन्म, होणारे संस्कार व त्यामुळे येणाऱ्या मर्यादा, त्या मर्यादामुळे जीवनांचा अर्थ लावण्यात येणारी बंधने या सर्वामुळे तो आपल्या लहानश्या डबक्याबाहेर कधी येवू शकला नाही. बाहेर केवढे विराट जीवन आहे: दुःखी, व्याकुल, तडफणारे, आकांत करणारे आणि आतून संतापाने वणव्या प्रमाणे पेटलेले विश्व आहे, हे कधी त्याला दिसलेच नाही. त्यामुळे आजवरचे मराठी वाङ्मय हे कृत्रिम आणि कागदी फुलाप्रमाणे खोटे आहे. उदाहरणा दाखल ज्याची फार चर्चा झाली आहे ते नव वाङ्मय घ्या.

या नव वाङ्मयात फ्राईडच्या दृष्टीकोनातून दिशाहीन झालेल्या मध्यम-वर्गीयांचे चित्रण झालेले दिसते. ज्याला आपण ग्रामीण लेखक म्हणतो त्याने खेड्याचे वास्तव चित्रण करण्याऐवजी खेड्याचे अद्भुतीकरण (romanticization) केले, तर काहींनी सौंदर्यवादी भूमिका घेऊन फॉर्म आणि तंत्राला महत्व दिले आणि व्यक्तीचा क्षुद्रपणा व जीवनाची निरर्थकता दाखविण्याचा प्रयत्न केला. याचे कारण मुख्यतः आपला लेखक कमी भारतीय आणि फार परपुष्ट आहे प्राश्चात्य जीवनात औद्योगिकरणामुळे व यांत्रिकी कारणामुळे आलेल्या शून्यवादाचे आणि निराशावादाचे अंधानुकरण या लेखकांनी केले. खरे म्हणजे आपल्या जीवनाच्या समस्या ह्या औद्योगिकरणामुळे वा यांत्रिकीकरणामुळे निर्माण झालेल्या नाहीत, ते या लेखकांना कळलेच नाही.

इथे दलित लेखकांनी घेतलेली सामाजिक जाणिवेची भूमिका आणि त्यांचे जीवनासंबंधीचे आकलन किती सार्थ आहे हे स्पष्ट होते. इथे दलित लेखक व इतर लेखक यांचेमध्ये फरक पडतो. पण फरक केवळ विचारांचाच नाही

तर अनुभव, आशय, विषय, शैली आणि भाषा वापरातही आहे. यांचे कारण शोधले तर तो ज्या जीवनाविषयी आणि पात्राविषयी लिहित असतो त्यातच मुळी मोठा लक्षणीय असा फरक आहे. म्हणुनच पांढरपेशा लेखकांनी आणि समीक्षकांनी ठरविलेली मूल्ये, सिद्धांत, कार्य आणि सौंदर्याच्या साक्षेची मूल्ये त्याने झुगारून दिली आहेत.

दलित साहित्याच्या चर्चेतून एक प्रश्न उद्भवत आहे. तो प्रश्न म्हणजे दलित हा कोण आहे.

दलित या शब्दाची व्याख्या केवळ बौद्ध अथवा मागासवर्गीयच नव्हे तर जे जे पिळले गेलेले असे श्रमजीवी आहेत ते सर्व दलित या व्याख्येत समाविष्ट होतात. बाबुराव बागुलांनी महाड येथील बौद्ध साहित्य संमेलनांत जी व्याख्या केली आहे ती या व्याख्येला धरूनच आहे. ते म्हणतात, "दलित साहित्य हे माणसाला केंद्रबिंदु मानते. माणसाच्या सुखदुःखाशी समरस होते व माणसाला सम्यक् क्रांतीकडे घेऊन जाते. माणसाच्या समूहाला म्हणजेच समाजाला समतेची शिकवण देते. माणसाला महान मानते, दलित साहित्य हे माणसा-माणसांत वैरभाव न पसरविता ते माणसा माणसात प्रेम पसरविते."

माणूस हा केंद्रबिंदु मानल्यावर समता, न्याय, बंधुत्व ज्या समाजात नसले त्या समाजावर बौद्धिक हल्ले करणे हे दलित लेखकांचे कर्तव्य ठरते. तसे तो करीत आहे. लोकशाहीची, समतेची आणि समानतेची मुक्तीगीते गाणाऱ्या वाल्ट व्हिटमनने Leaves of Grass ह्या त्याच्या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेत कवी संबंधाने जे म्हटले आहे ते दलित लेखक आचरत आहे :

"He can make every word he speaks draw blood. Whatever stagnates in the flat of custom or obedience of legislation, he never stagnates.....If he breathes in to anything that was before thought small it dilates with the grandeur and life of the universe."

(त्याचा प्रत्येक शब्द गोळीप्रमाणे जिव्हारी बसला पाहिजे. रितीरिवाज, अंधश्रद्धा व कायद्याच्या गाळात तो रुतून बसत नाही. छोटचा वा त्याज्य समजल्या जाणाऱ्या विषयांना जर त्याने आपल्या श्वासाने जिवंत केले तर ते सुद्धा विश्वाच्या सौंदर्याने व महानतेने नटून येते.)

अण्णा भाऊ साठे, शंकरराव खरात, बाबूराव बागूल, दया पवार, केशव मेश्राम, नामदेव ढसाळ, वामन निंबाळकर, ज. वि. पवार, अर्जुन डांगळे, सुखराम हिवराळे, शांताराम हिवराळे, परसावळे, चेंदवणकर, यशवंत मनोहर, ताराचंद खांडेकर, डॉ. भाऊ लोखंडे, अविनाश डोळस, योगीराज वाघमारे, जनार्दन वाघमारे, योगेंद्र मेश्राम, प्र. ई. सोनकांबळे, गंगाधर पानतावणे इ. दलित लेखकांच्या लेखनामधून वाल्ट व्हिटमनने वर्णन केलेली जाणिवच व्यक्त होत आहे. आणि म्हणूनच मुंबई उपनगर साहित्य परिषदेच्या अध्यक्षीय भाषणात गं. बा. सरदारानी आणि यशवंतराव चव्हाणांनी कराड येथील साहित्य संमेलनाच्या भाषणात दलित साहित्याचा गौरव केला आहे. दलित साहित्याचे हे कार्य नाकारणारे नाकारोत. म्हातारीने कोंबडे झाकले म्हणून सूर्य झाकला जात नाही.

अलीकडे वैचारिक स्वातंत्र्याचे वारे जोरात वाहू लागले आहेत. याचाहि विचार होणे आवश्यक आहे.

लेखक हा त्याच्यावर झालेल्या पूर्वसंस्कारातून व वर्गीय, वर्णीय बंधनातून पूर्ण मुक्त होवून खरेच विचाराने स्वतंत्र होवू शकतो काय? लेखक ही सामाजिक व्यक्तीही असते, व त्याची जडणघडण ही त्याच्यावर बालपणापासून होत गेलेल्या संस्कारातून व भोवतालच्या सामाजिक व भौतिक परिस्थितून आकार पावत असते, शहरातील पांढरपेशा वर्गातील लेखक व दलित वर्गातील लेखक ह्यांच्या वैचारिक स्वातंत्र्याच्या कल्पना सारख्याच असू शकतील काय? वैचारिक स्वातंत्र्य म्हणजे शंकरराचार्यांना जातिनिष्ठ समाजव्यवस्था हाच धर्मचा गाभा आहे असे सांगण्याचे स्वातंत्र्य की काय? धर्मनिष्ठ आणि कुजलेल्या नितिमत्तेला उचलून धरणाऱ्या फॅसिष्ट प्रवृत्ती असणाऱ्यांनाहि स्वातंत्र्य देणे काय? स्वातंत्र्य मग ते कसल्याही प्रकारचे असो, अनिर्बंध राहू शकत नाही.

अदिम अवस्थेत माणूस कदाचित संपूर्णतया स्वतंत्र असूही शकेल, पण जेव्हां तो समूहाने राहू लागला व समाज निर्माण झाला तेव्हा समूह व समाजाच्या कल्याणासाठी माणसावर निर्बंध घालणे अपरिहार्य झाले. या संदर्भात ए. जी. गार्डीनर यांच्या एका निबंधाची आठवण होते. एका देशाला स्वातंत्र्य मिळाल्यावर एक बाई हे स्वातंत्र्य भोगण्यांसाठी रस्त्याच्या मधोमधून चालली होती. हे पाहून पथ पोलिसाने तिला हटकले, तशी ती म्हणाली, देश स्वतंत्र झाला आहे, व म्हणून मला कोठूनही आणि कसेही चालण्याचे स्वातंत्र्य आहे.

परंतु असे स्वैर स्वातंत्र्य कोणालाही देता येणार नाही. व्यक्तिगत स्वातंत्र्याला मर्यादा पडणे जसे अपरिहार्य आहे तसेच वैचारिक स्वातंत्र्याला मर्यादा येणे अपरिहार्य आहे. आतापर्यंतच्या अनुभवावरून तरी स्वातंत्र्य हे शोषकांनी व समाज-शत्रूंनी आपल्या स्वार्थार्थ अधिकार म्हणून वापरले, कर्तव्य म्हणून कधीही नव्हे असेच आढळून येते. याच प्रस्थापितांनी लेखकाची लेखणी समाजाच्या बेड्या तोडण्यासाठी नव्हे, तर मनोरंजनाचे साधन म्हणून वापरायाला लावली.

आज देशात नवीन वारे वाहत आहेत. मात्र समाजनिर्मितीसाठी लोकशाही लोकाभिमुख करण्यासाठी अनेक आर्थिक आराखडे तयार केले जात आहेत, वैचारिक स्वातंत्र्य जर या नवसमाज निर्मितीच्या आड येत असेल तर त्याला निर्बंध घालणे आवश्यक ठरते. या देशातील कोट्यावधि पिडित बांधवांचेही भवितव्य या नवनिर्माणाच्या कार्यात गुंतले आहे याचा आणि ज्यांनी ह्याच पिडीत बांधवाच्या वैचारिक वा कसल्याही प्रकारच्या स्वातंत्र्याचा एक शब्दही कधी बोलून दाखविला नाही त्या आजच्या वैचारिक स्वातंत्र्याचा नारा लावणाऱ्यांचा कांही संबंध आहे का हा प्रश्न विचारावासा वाटतो.

मोक्ष एकट्यानेच एकट्यासाठीच मिळवावयाचा असतो हा स्वयंकेंद्रीत करणारा विचार आणि दुःखाचे कारण पुर्वजन्म आहे हे सांगून माणसाला निष्काम करणारे तत्वज्ञान या देशात अजूनही टिकून आहे, हा पूर्वजांचा महान वारसा आहे असेही प्रौढीने सांगितले जाते. अशा परिस्थितीत वैचारिक स्वातंत्र्याचा घोष करणे हे रोम जळत असतांना फिडल वाजविण्यात रंगून जाण्यासारखे माणुसकी-शून्यतेचे व समाजद्रोहीपणाचे आहे.

वैचारिक स्वातंत्र्याचा घोष करणारे आणि गावकुसाबाहेर, झोपडपट्टीत राहणाऱ्या तमाम जनतेच्या सुखदुःखाकडे कानाडोळा करणारे एकच आहेत. म्हणून दलित लेखक या घोषणाबाज पुढाऱ्याकडे आपले नेते म्हणून कधीही बघत नाही. कारण ज्ञानाची पूजा करणाऱ्यामध्यें या विचारस्वातंत्र्यवाल्यांना श्रेष्ठवर्णीय फक्त दिसतात : पण ब्रिटिश म्युझियममध्ये एका पावावर व रात्री पापडावर राहून अहोरात्र अभ्यास करणारे डॉ. बाबासाहेब आंबेडकर दिसत नाहीं. मायकाव्होस्की या कवीची या संदर्भावर प्रकाश टाकेल अशी कविता मला आठवते ती अशी :—

"There are no fools today
to crowd, open-mouthed, round a 'maestro'
and await his pronouncement.....
give us a new form of art———
an art
that will pull the republic out of the mud".

(आज प्रवक्त्यांच्या प्रवचनासाठीं तोंड पसरुन आम्ही उभे नाही
आम्हीं तेवढे मूर्ख राहिलो नाहीत . . . . . . . . .
चिखलात रुतलेले प्रजासत्ताक उपसून वर काढण्यासाठीं
आम्हाला कलेच्या नव्या तरफा द्या ! )

लोकाभिमुख लोकशाहीला अराजकच्या चिखलातून वर काढण्यासाठी दलित लेखकांच्या लेखण्या तरफा पुढे सरसावल्या जाणार आहेत. कारण याच चिखलात शतकानुशतके दलित रुतून मृतप्राय झाले होते, फक्त दलितच.

वैचारिक स्वातंत्र्याची दुसरी बाजू म्हणजे कलेसाठी कला. कलेसाठी कला हा कंठशोष करणारेही हस्तीदंती मनोऱ्यातीलच मंडळी आहेत. टेनिसनच्या लेडी ऑफ शॅलाट प्रमाणे ही मंडळी बाहेरचे जग खिडकीतून जेवढे त्यांच्या आरशात दिसेल, तेवढेच पहात होती, व कला ही प्रतिबिंबाचेही प्रतिबिंब आहे (imitation of an imitation) असा प्लेटोचा दावा सिद्ध करीत होती. परंतु दलित साहित्यिक जेव्हां खिडकीबाहेरच्या जगात वास्तव्याच्या रुपाने अवतरला, तेव्हा ह्यांचे कृत्रिम, जादूचे विश्वच भंगू लागले. आपल्या आतापर्यंतच्या स्थिर सिंहासनाला दलित साहित्य विचाराचे जबर धक्के बसू लागले तसतसे त्यांनीच ठरविलेली सौंदर्य, साहित्यमूल्यांच्या कसोट्या ढासळतांना पाहून पांढरपेशा लेखक व समीक्षक "कलेसाठी कला" हा मंत्र अधिक जोराने ओरडू लागला आहे, सामाजिक जाणिव असलेले वाङमय हे वाङ्‌मयच नव्हे असे बडबडू लागला आहे.

"कलेसाठी कला" ह्या विचाराचा प्रारंभ हेगेलच्या तत्वज्ञानातून झाला, आणि क्रोचे (Croce) या सौंदर्यशास्त्रज्ञाने तर कलेला स्वयंशासित स्वयंपूर्ण (autonomous) मानले आहे. या परिणामातून कला व जीवन याची फारकत झाली. सौंदर्य हेच एकमेव उद्दिष्ट मानून, आकृतीबंधाला, शैलीला प्राधान्य प्राप्त झाले व आशयाला परागंदा व्हावे लागले. मी माझ्या साठीच लिहितो असा विचार वाढीला लागला. त्यांतून स्वतःसाठी लिहिणाऱ्या लेखकांचे, एकमेकाची भलावण करणारे लेखक कवींचे लहानलहान गट साहित्य-

सृष्टीत उदयास आले. लैंगिक, विकृत पलायनवादी, शून्यवादी असे लेखन ह्याच परिणामातून प्रकट झाले.

लेखन आणि लोक हे परस्परसंबंधित असूनही या एकांड्या वृत्तीमुळे लेखन आणि जनता ह्यामध्ये मोठा दूरावा निर्माण झाला. याला कारण हे सौंदर्यवादी आणि "कलेसाठी कला" या विचाराचे समर्थक होत. लेखन आणि लोक यांचा स्नेह व समन्वय घडवून आणण्यासाठी जे लेखन पुढे आले त्याचे नाव दलित साहित्य होय.

खरे म्हणजे सौंदर्य ही सापेक्ष कल्पना आहे. ते निरंतर किंवा चिरंजीव सत्य आहे असे मला वाटत नाही. सौंदर्याच्या कल्पना त्या त्या युगातील विचारांशी संबंधित असतात. एके काळी राजे महाराजे हेच साहित्याचे विषय असत. बहुजन समाजातील लोक चालत नसत. पण आज साहित्य वरिष्ठ वर्गाकडून कनिष्ठ वर्गाकडे चालले आहे. गावकुसा बाहेरील, झोपडपट्टीतील जीवन साहित्याचे विषय होऊ लागले आहेत. म्हणुनच आता सौंदर्याच्या कल्पना बदलणे जरूरीचे झाले आहे. याचे कारण स्पष्ट करण्यासाठी मी अल्बेर कामू यांचे उद्गार आपल्या पुढे ठेवीत आहे.

"What characterizes our time, indeed, is the way the masses and their wretched condition has burst upon our contemporary sensibilities. We now know that they exist, whereas we once had a tendency to forget them. And If we are more aware.... it is because the masses have become stronger and keep people from forgetting them". (**Resistance, Rebellion, anb Death** Knopf, 1961, pp. 251–52)

(आज लोकांचे जीवन आणि दुःख कलावंताच्या भावनिक विश्वाला हादरुन टाकते आहे. असे पूर्वी घडत नव्हते. हे या युगाचे वैशिष्टय आहे. या वैशिष्टयामुळेच पुर्वी जसे जनतेला कलावंत नाकारु शकत होता तसे नाकरणे त्याला आज अशक्य झाले आहे. यांचे कारण हे आहे की जनता आता पूर्वीप्रमाणे दुर्बल राहीली नसुन ती अधिक संघटीत आणि शक्तीशाली झाली आहे. व तिच्या अस्तित्वाचा विसर ती कोणालाच पडु देत नाही.

हा कालाचा महिमा सौंदर्यवादी लेखक व समीक्षकांनी विसरू नये असे मला वाटते.

जनतेची जी ताकद कामूने स्पष्ट केलेली आहे ती ताकद दलित जनतेची ताकद आहे. ही ताकद व्यक्त करण्यास दलित लेखक प्रतिबद्ध आहे.

आतापर्यंत दलित लेखकाने एक वेगळया अनुभवाने व आगळया सौंदर्याने नटलेले विश्व निर्माण केले. निराळा सामाजिक आशय, विषय, भावना शैली, व भाषा ह्या द्वारे त्याने मरगळलेल्या मराठी वाङमयात एक नवीन समृद्ध असे दालन उघडले. पण जीवन विराट असते. त्या जीवनाचे सर्व अनुभव व्यक्त करण्यासाठी दलित लेखकालाहि खूप मनन चिंतन करणे जरुरीचे आहे. म्हणजे त्याला जीवनदर्शनाच्या विचाराच्या आणि अनुभवाच्या कक्षा खूप रुंद करता येतील. भारतीय इतर भाषेतील प्रगतीशील साहित्य, विशेषतः हिंदीतील "समांतर" वाङमयाची चळवळ व ज्या ज्या लिखाणांत प्रस्थापित मूल्याविरुद्ध बंड उभारून सामाजिक जाणिवा दिसून येतात. त्या सर्वांची जवळिक दलित साहित्याने केली पाहिजे. दुसरे म्हणजे दलित साहित्यात वैचारिक वाङमयाची त्रूटी जाणवते. ही त्रुटी दुर करणे अत्यंत जरुरीचे आहे. यासाठी त्यांनी जीवनाकडे बघण्याचा योग्य दृष्टीकोन घेतला आहे अशा विचारवंत लेखकांचा अभ्यास करणे योग्य ठरेल. सार्त्र, कामू, मालरॉ, गुंथरग्रास,, हरमन हेस, नॉर्मन मेलर या विचारवंत लेखकांनी जसे ललित लेखन केले तसेच त्यांनी राजकीय प्रश्नावरचा विचार आपल्या लेखनातून केला, आणि त्यासाठी झालेल्या जन-आंदोलनात धडाडीने भाग घेतला, पुढारीपण केले. काळया वाङमयीन चळ-वळीचे नेते रिचर्ड राइट, जेम्स बाल्डवीन, लि रॉय जोन्स इत्यादींचे लेखन आणि कार्य अभ्यासण्यायोग्य आहे. बौद्ध धम्माने तर ज्ञानावर अतिशय भर दिला आहे. बौद्ध धर्माचे प्रत्येक सूत्र हे माणसाला चिंतन, मनन, वाचन करण्यास प्रवृत्त करते. धम्मपदात तर म्हटले आहे, अल्पश्रुत मनुष्य बैलाप्रमाणे वाढतो. त्याचे मांस वाढते पण प्रज्ञा वाढत नाही. हे लक्षात घेवून दलितांच्या सर्वांगिण चळवळीचे नेतृत्व करू पाहणाऱ्या साहित्यिकांनी ज्ञानोपसानेवर जोर देणे किती अगत्याचे आहे हे स्पष्ट होते.

वाङमयाचा व पुराणकथांचा (myths) घनिष्ठ संबंध आहे, व दलित लेखकाने दलितेतर वाङमय नाकारल्यामुळे त्याच्या लेखनांत जी एक पौराणिक-कतेची, परंपरेची पोकळी निर्माण झाली, ती नव्या पुराणकथा निर्माण करून भरून काढणे आवश्यक झाले आहे. पुराणकथा नव्या व जुन्या वाङमयामध्ये दुवा असते व त्यामुळे नव्याला पारंपारिक मूळ प्रवाहात अलगद एक होता येते.

पुराणकथा म्हणजे काय ? त्या दंतकथा (legend) किंवा लोककथा (folk-tale) नव्हे. पुराणकथा ही देव किंवा देवासारख्याच महामानवांची नायकांची, अदिम (primitive) माणसाच्या विचाराधारेत बसणाऱ्या शब्दांत सांगितलेली कथा. विश्व व मानव ह्यांची व्युत्पत्तीचा त्या काळाच्या साचेबंद रुढींच्या (rituals) संदर्भात अदिम मानवाने केलेला प्रयत्न म्हणजे पुराणकथा-म्हणून ह्या पुराणकथांना धर्माच्या महत्वाच्या अंगाचे स्वरुप येते.

पुराणकथा ह्या वाङमयात खोलवर रुतलेल्या असतात. कारण त्या संस्कृतीचा अविभाज्य घटक झालेल्या असतात. फेझरच्या "गोल्डन बो" (Golden Bough) ह्या मानववंशशास्त्रावर लिहिलेल्या पुस्तकापासून पाश्यात्य वाङमयात पुराणकथांचा प्रभाव व पुनर्जन्म झालेला दिसतो. मराठी वाङमयात रामायण, महाभारत यांचे पुनर्मूल्यमापन चाललेले दिसते. दलित लेखकाला राम, ओडीसस, कृष्ण यासारखे आपले नायक शोधून काढावें लागतील. निर्माण करावे लागतील. आर्यांच्या पूर्वी इथे नागलोकांची वस्ती होती. ह्यांत व आर्यांत तुंबळ युद्धे झाली. ह्याच जिंकलेल्या नांगाना, आर्यांनी दास केले. ह्या क्रूर युद्धातून दलित लेखकांना नवीन पुराणकथासाठी नायक नायिका सापडू शकतील. बुद्ध, त्याचे जीवन, त्याचे शिष्य, शिष्या, व जातककथा ह्यातूनही त्यांना नवीन myths निर्माण करता येतील, दलित साहित्याचे एक थोर समीक्षक रा. ग. जाधव ह्यांनी "दलित साहित्य पुराणकथा" ह्यावरील केलेले लेखनही वाचन मनन करणे योग्य होईल.

अमेरिकेमध्ये आज जो लोकप्रिय लेखन प्रकार सुरू झाला आहे त्याकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो. त्याचे नाव (New Journalism). राजकीय, सामाजिक अथवा जीवनसंघर्षात जे काही घडते ते प्रसंग अथवा त्या घटना आकृतीबंधाच्या बंधनात न अडकता रंजकतेने मांडणेम्हणेजे "न्यु जर्नालिझम" होय. न्यू जर्नालिझमची सुरवात ट्रमन कॅपोटच्या 'In cold blood' या पुस्तकाने झाली. नॉर्मन मेलरची "The Armies of the Night & 'A fire on the moon' ही दीन पुस्तके याच प्रकारची आहेत.

दलित लेखकाला आपले जळजळीत जीवनानुभव व्यक्त करण्यासाठी हा वाङ:मयीन फॉर्म सहज आणि सुलभ वाटण्याची शक्यता असल्यामुळे सुचविला आहे. याद्वारे अनेक सामाजिक अन्याय, अत्याचाराचे अथवा सामाजिक प्रश्नांचे सर्वांगीण दिग्दर्शन व आकलन लोकापुढे ठेवता येईल.

वैचारिक वाङ्‌मयाप्रमाणेच दलित नाटकांची ही मोठी सामाजिक गरज आहे असे मला वाटते. प्रकाशनाच्या साधनाप्रमाणेच रंगमंचही प्रस्थापितांच्या स्वाधीन असल्यामुळे तिथेही दलितांचा शिरकाव होणे कठीणच. कारण केवळ लिहूनच भागत नाही, तर ते मनःपूर्वक उभेही करावे लागते. ती मनःपूर्वकता मिळेलच असे वाटत नसल्यामुळे दलित नाटकाचे नवीन क्षेत्र आपण उपलब्ध करणे जरुरीचे आहे.

कथा, कविता, कादंबऱ्या शिक्षिताची गरज पुरी करु शकतात. पण नाटक सर्व समाजाला एकावेळी अपिल करु शकते. आपल्या समाजातील शिक्षणाचे प्रमाण लक्षांत घेऊन नाटकाला जोर देणे जरुरीचे आहे.

महात्मा फुले यांच्या सत्यशोधक समाजाच्या जलसाकारांनी अथवा तमासगीरानी आणि आपल्या चळवळीतील प्रारंभीच्या जलसाकारानी तमाशा या लोकनाट्याद्वारे फार मोठे समाज जागृतीचे कार्य केलेले आहे. अमेरिकेतील काळ्या लेखकांनी नाटकाचे हे सर्वस्पर्शी सामर्थ्य ओळखून आपल्या नाटक-मंडळ्या नटनटी निर्माण करुन काळे नाटक (Black Theater) उभे केले, आणि काळ्या वस्त्यातून, चौरस्त्यावर, लोकभाषेत लोकनाट्ये सादर केली. Black Drama Anthology (Signet, 1971) ह्या संग्रहाच्या प्रस्तावनेत संपादकांनी म्हटलेले दलित लेखकांनी नाटकप्रकारचा विचार करतांना लक्षांत ठेवावे :—

"If a black theater is to be born, sustain itself, and justify its own being, it must go home. Go home, psychically, mentally, aesthetically, and we think, physically. (जर काळे नाटक रंगमंचावर उभे राहू शकले जगूं शकले, स्वतःचे समर्थन करु शकले, तर त्या नाटकाला काळ्यांच्याच घरात, वस्तीत, अंतःकरणात गेले पाहिजे—मनाने, सौंदर्याने व शरीराने देखिल, असे आम्हाला वाटते.)

दलित समाजातील बहुसंख्य अशिक्षितांना जागे करण्यासाठी त्यांच्या वस्त्यात जाउनच नाटकाद्वारे प्रचार करणे आवश्यक आहे. त्यांना त्यांच्या जीवनाची दुःखाची दुर्दशेची व प्रश्नांची जाणीव त्यांच्याच भाषेत करून देणे गरजेचे आहे, व दलित लेखकाने ह्या प्रकारचा मोठ्या संख्येने वापर करावा असे मला वाटते.

या संदर्भात एक मूलभत प्रश्न उद्‌भवतो. तो असा की, आपण अखेर कुणासाठी लिहित आहो ? प्रस्थापित वर्गासाठी ? त्यांनी आपली वाहवा करावी,

व आपणाला त्यांच्या मंडळात बसवावे म्हणून? की, दलितातून हळहळू वर डोके काढणाऱ्या "दलित ब्राम्हणासाठी"? की, आणखी कुणासाठी?

आपण कुणासाठी लिहितो हे स्पष्ट झाले की लेखकाला कसे लिहावे हे कळते. या जाणिवेतून त्याच्या शद्बांना सामर्थ्य येते. तेव्हा हा प्रश्न महत्वाचा आहे. मला वाटते, दलित लेखकांनी दलित जनतेसाठी त्यांच्या जागृतीसाठीच, प्रस्थापितांच्या recognition च्या मागे न लागतां, लिहिले पाहिजे, दलित जनते-साठीच केवळ तिच्याचसाठी.

परंतु एक धोक्याचा इशारा द्यावासा वाटतो. सम्मोदमान जातकातील कवडे व पारधी यांची कथा दलित लेखकांनी लक्षात घेतली पाहिजे. कवड्यां-ची जोवर एकी होती तोवर पारध्याला त्यांची शिकार करता येत नव्हती. पण त्यांच्यात अहंकाराने दुही माजल्यावर मात्र पारधी एकेकाचा नायनाट करतो ही जातककथा कधी विसरु नका असे आवाहन मी करतो.

मित्रहो, आपण लढ्यात आहोत, जिथे इतर वर्गातील लेखकांना मिळतात ती सुखे, तो गौरव, सौंदर्यसुख तुम्हाला मिळणार नाही म्हणून खेद करु नका. या संदर्भात कामूचे म्हणणे लक्षात ठेवा :--
तो म्हणतो :--

"There is no peace for the artist other than what he finds in the heat of the combat."

लढाईच्या भाऊगर्दीत लेखकाला कसली उसंत? लढ्यात मिळेल तीच त्याची शांती! मित्रहो, बेजाबदार लेखकांची रुददी संपली आहे, व एका नव्या साहित्यिक युगाचा, क्रांतीचा दलित लेखक आघाडीवर शिलेदार आहे याची मला तुम्हाला व काळाला खात्री आहे.

(अध्यक्षीय भाषण, दलित साहित्य संमेलन, नागपूर दि. १७-१-७६)

